# माधव जूलियन

## : डॉ. माधवराव त्रिंबक पटवर्धन :

[ जीवनकथा ]

लेखक

गंगाधर देवराव खानोलकर

१९५१




स्वस्तिक पब्लिशिंग हाउस, मुंबई ४

प्रकाशक:
गंगाधर देवराव खानोलकर,
स्वस्तिक पब्लिशिंग हाउस,
केळेवाडी, गिरगाव, मुंबई ४.



प्रथमावृत्ति, जुलै १९५१







किंमत पांच रुपये आठ आणे



मुद्रक:
श्रीकृष्ण माधवराव दळवी,
कल्पना प्रिंटिंग प्रेस,
११०, भवानीशंकर रोड,
दादर, मुंबई २८.

अर्पण

विठ्ठल दत्तात्रय घाटे

नामदेव सदाशिव भाटे

रामचंद्र विनायक मराठे

श्रीधर रामजी शिंदे

या माधवरावांच्या जिवलग मित्रांस ...

# प्रस्तावना

कवि माधव जूलियन : डॉ. माधवराव त्रिंबक पटवर्धन यांची ही जीवनकथा आहे. त्यांचें जीवन जसें घडत गेलें आणि दिसलें तसें तें यांत यथाक्रम सांगितलें आहे. पूर्वकालीन चित्रपटकथकाप्रमाणें केवळ दिग्दर्शकाची भूमिका स्वीकारून, माधवरावांचा जीवनपट, एकेक घडी उलगडून, दाखविण्याचा मीं या कथेंत प्रयत्न केला आहे.

ही जीवनकथा, मुख्यतः श्री. रामचंद्र विनायक मराठे, श्री. श्रीधर रामजी शिंदे, श्री. दिनकर माधव पटवर्धन, श्री. गंगाधर बाळकृष्ण गरुड यांच्या व माझ्या स्वतःच्या संग्रहीं असलेल्या पत्रव्यवहाराच्या आधारानें लिहिली आहे. श्री. मराठे यांजकडील पत्रसंग्रह फार मोठा; १९११–१९३९ या दीर्घ कालांतील आहे. माधवरावांचें पूर्वायुष्य केवळ या पत्रव्यवहाराच्या आधारावरच मला चितारतां आलें. त्याचप्रमाणें श्री. दिनकरराव पटवर्धन यांच्या संग्रहांतील माधवराव व लीलाबाई यांनीं परस्परांस अकरा वर्षांत धाडलेलीं पत्रें क्रमवार वाचावयास मिळालीं. पटवर्धन पति-पत्नींचा हा पत्रव्यवहार जीवनकथालेखनाच्या दृष्टीनें अनमोल आहे. माधवरावांच्या वैवाहिक जीवनाचें सत्यदर्शन मला या पत्रांनींच करून दिलें; आणि त्यामुळेंच मला तें या कथेंत साधार सांगतां आलें. अर्थातच तें सांगतांना मला कांहीं मर्यादा पाळाव्याच लागल्या. पाश्चात्य लेखक तिकडील विशिष्ट सामाजिक उदार दृष्टीमुळें ज्या गोष्टी जितक्या निःसंकोचपणें लिहूं शकतो, त्या गोष्टी तितक्या निःसंकोचपणें माझ्यासारखा पौर्वात्य हिंदु लेखक लिहूं शकत नाहीं. कथानायकाच्या किंवा त्याच्याशीं संबंधित असलेल्या व्यक्तींच्या विशिष्ट मनोवृत्तींचें विश्लेषण त्याला केव्हां केव्हां या बंधनांमुळें करणें अशक्य होतें; अतिशय संयमानें त्याला आपली लेखणी चालवावी लागते.

श्री. मराठे व श्री. पटवर्धन यांच्या पत्रव्यवहाराप्रमाणेंच माधवरावांच्या विद्यार्थीकालापासूनच्या मैत्रिण सौ० शांताबाई कशाळकर यांनीं लिहिलेल्या व

अद्याप अप्रकाशित असलेल्या आत्मचरित्राचाहि, माधवरावांच्या पूर्वायुष्यांतील कांहीं महत्त्वाच्या घटना नीट समजून घेण्याच्या दृष्टीनें मला फार उपयोग झाला. मला आपलें हें 'आत्मचरित्र' वाचावयास दिल्याबद्दल मी त्यांचा आभारी आहें.

प्रस्तुत जीवनकथा निम्में अधिक लिहून झाल्यावर श्री. विठ्ठलराव घाटे यांस ती मीं वाचून दाखविली. त्यांनीं ती ऐकून अनेक उपयुक्त सूचना केल्या, कांहीं मंडळींच्या भेटीगांठी करून देऊन नवीन माहिती मिळवून दिली, आणि कांहीं घटनासंबंधीं मोकळेपणानें चर्चा करून त्यांच्या मांडणीबाबत मार्गदर्शनहि केलें. श्री. घाटे यांच्याप्रमाणेंच प्रो. श्रीधरपंत रानडे यांनींहि, या कथेंतील कांहीं अध्याय ऐकून घेऊन माझ्याशीं विचारविनिमय केला, विशेषतः मुंबईस जो प्रसंग घडला त्या बाबतची आपली वृत्ति काय होती हें त्यांनीं नीट समजून सांगितलें, कोणत्याहि प्रकारचा आडपडदा ठेवला नाहीं; आणि मला जें त्या प्रकरणीं सांगावेंसें वाटतें तें निःसंकोचपणें मीं सांगावें असाच आपला अभिप्राय व्यक्त केला.

मला साहित्य पुरवून व वेळोवेळीं विचारविनिमय करून ज्यांनीं हें कथाकथन सुलभ व सुकर केलें त्या वरील सर्व व्यक्तींचे मी मनःपूर्वक आभार मानतों. कथेंत जर कांहीं गुण आढळले तर त्याचें श्रेय या मंडळीला आहे, आणि जे कांहीं दोष आढळतील त्यांचा एकमेव धनी मी आहें. वेडीवांकुडी, जशी मला सांगतां आली तशी, मीं ही एकवीस अध्यायी माधवकथा सांगितली आहे. कथेचें तंत्र-मंत्र मी जाणत नाहीं. कथानायकाबद्दल मला जो जिव्हाळा वाटतो, त्यानेंच प्रेरित होऊन, मीं ही कथा लिहिली; आपण ही कथा लिहिलीच पाहिजे असें जेव्हां उत्कटतेनें वाटूं लागलें तेव्हांच ती लिहिली.

प्रस्तुत कथेंत तीन मुद्रणदोष अनवधानानें राहून गेले आहेत. ते पुढीलप्रमाणें दुरुस्त करून मग मजकूर वाचावा अशी विनंती आहे. पृष्ठ २२, ओळ १७ मध्यें २४-१-१९२५ असा उल्लेख आहे, तो २४-१-१९१५ असा पाहिजे. पृष्ठ १९२, ओळ ११ मध्यें 'आकृति' या शब्दाऐवजीं

'प्रतिकृति' असा शब्द पाहिजे. पृष्ठ २२० वरील शेवटच्या परिच्छेदांत 'मराठी बोर्डाचे' पांच सभासद होते असा उल्लेख असता चौघांचींच नांवें छापलीं गेलीं आहेत. गळलेले पांचवे सभासद प्रो. द. सी. पंगु हे होत.

कथालेखनाला प्रारंभ ता. २ सप्टेंबर, १९५० रोजीं करून तें ता. २८ मे, १९५१ रोजीं पूर्ण केलें. कथाविषयक साहित्याचा अभ्यास व लेखन नऊ महिने अखंड चाललें होतें. याचें सारें श्रेय श्री. रामभाऊ मराठे, श्री. बापुसाहेब शिंदे व माझी पत्नी सौ. कल्पना याना आहे. या कथेचा एकेक अध्याय लिहून त्यांना वाचून दाखविल्यावर, त्यापुढील अध्याय लवकर लिहिला जाऊन तो आपल्याला ऐकावयाला मिळावा याबद्दल हीं तिघेंहि जी उत्सुकता दाखवीत, तीच बव्हंशीं माझ्या कथालेखनाला प्रेरक होऊन तें संकल्पित काळांत पूर्ण होण्यास कारण झाली. या तीन श्रोत्यांचा त्याबद्दल मी ऋणी आहें.

प्रस्तुत पुस्तकाच्या वेष्टनाची योजना व त्याचें चित्रण माझा धाकटा मुलगा चि. मधुकर यानें केलेलें आहे. त्याला आपल्या माधवरावकाकांबद्दल वाटणाऱ्या आदराचें तें निदर्शक आहे. त्याबद्दल माझ्याप्रमाणेंच अनेक माधवमित्रांस त्याचें कौतुकच वाटेल.

आज ही 'जीवनकथा' माधवरावांच्या चहात्यांपुढें प्रकटपणें मी ठेवीत आहें. त्यांना माझी विनंती एवढीच कीं,

'मी बोलिलों पुरें उणें। तें तुम्ही माउलीपणें। उपसाहिजो जी ॥'

गं. दे. खानोलकर

२१ जून, १९५१,
'शिवनेरी',
४१ शिवाजी पार्क,
मुंबई २८.

# अनुक्रमणिका

# १

## मी प्रेमोद्यानांतील बुलबुल आहें

कवि 'बहार'च्या एकाहून एक बहारदार अशा कविता वाचण्यात त्याची तद्री लागली होती. बहारच्या त्या देशप्रेमाने ओथंबलेल्या कविता वाचून त्याचे चित्त थरारले होतें, हृदय उचंबळले होते. कवितेचे काही निराळेंच स्वरूपदर्शन आज त्याला होत होते. तो अगदी धुंद झाला होता.

काही वेळाने त्याने तें कविताचें पुस्तक खालीं ठेवले आणि स्वत:शींच गुणगुणावयाला सुरुवात केली :

> अय् बहारे नौझदिल् अय् शाइरे शीरीन सखुन्
> इन् तिझारत् मी कुनम् नव नग्मई आवाझ कुन्

टेबलावरील पेन्सिल घेऊन तो कागदावर या पद्यपंक्ति टिपू लागला वायुलहरींच्या हेलकाव्यांनी जलपृष्ठावर जशा एकामागून एक लहरी उमटू लागाव्या, तशा त्या इराणी कवीवरील पद्यपंक्ति कागदावर उमटू लागल्या.

> "ज्याचे हृदय कोमल व शब्द गोड आहेत, अशा बहार कवे ! मी तुझी वाट पाहात आहें, एक नवीन गाणें म्हण. तुझी कविता इराणच्या जखमा बऱ्या करित. तुझ्या तुतारीनें स्वातंत्र्य येतें आणि जुलूम पळतो. तूं तुझ्या भूमीला, हिवाळ्यांत जसा नूतन वसंत, तसा आहेस; जुलूम आणि अज्ञान यांच्या अंधारांत मध्यान्हीच्या सूर्याप्रमाणें आहेस.
>
> देशभक्तीपासून उत्पन्न होणारी तुझी कविता हृदयाला विरघळवते. अंत:करणापासून जो ती वाचील तो देशप्रतिपालनकर्ता होईल.

अरे साकी ! माझ्या हृदयांत नवी स्फूर्ति येत आहे. अग्निस्वरूपी पाण्यानें पेला भर; नाहीं का ? लाज मेली ना ? यापूर्वी मी प्रीति-नैराश्याच्या दुःखाचें वर्णन केलें. आतां मी मस्ती कां न करावी ? वेडानें मला जिंकलें आहे. तूं मला बजाविलेंस की, इसराफीलची मृतांना जिवंत करणारी तुतारी वाजीव आणि हिंदीस्तानच्या प्रेमांत सुखदुःखांना बुडव. इराणच्या बागेतील प्रभातच्या पक्ष्या, मी तुझे उपकार मानतों. तुझी कविता हृदयांत अचल आहे आणि तिचे हक्क मी जाणतों.

कवे, तुझ्या आत्म्याचे मी आभार मानतों; स्तुति आणि अमरत्व यांना तुझी गोड कविता पात्र होवो !

मी प्रेमोद्यानांतला बुलबुल आहे आणि स्वतंत्रतेचा कोंबडा आहे; वीररसाच्या आणि शृंगाररसाच्या कवितेला मी नववधूप्रमाणें शृंगारीन."

एकामागून एक उमटणाऱ्या त्या पद्यपंक्तीतून वरील आशयाचें स्तुतिगीत तयार झाले होतें. ते गीत तयार झाल्यावर त्याने तें तालसुरावर किती तरी वेळ स्वतःशीच म्हटले. त्याचे चित्त सुखावले होतें, नावीन्यामुळे मन आनंदले होतें. कवि बहारच्या बहारदार काव्याचा आनंद त्याच्या रोमरोमात स्पदत होता. हजारो मैल दूर असलेल्या एका परदेशी कवीवर आपण फिदा व्हावे आणि त्याच्याच भाषेत त्याच्यावर स्तुतिगीत आपण लिहावें, ही चमत्कृतिपूर्ण घटनाहि त्याला काहीं निराळ्याच सुखाची अनुभूति आणून देत होती.

त्याने आपल्या मायबोलींत नुकताच कुठें पद्यप्रपंच सुरू केला होता. प्रीति-नैराश्यातून, कित्येकदां एकलेपणाच्या दुःखद जाणीवेतून, त्याचे पद्य निर्माण होत होते. जिवाचा कोंडमारा झाल्यासारखे वाटून, उफाळणाऱ्या भावनाना वाट देण्याकरिता तो स्वतःचीं गाणीं स्वतःशीच गुणगुणूं लागला होता. पण कवि बहारच्या कवितेनें त्याच्या या आत्मगुंजनाला निराळीच कलाटणी दिली.

# मी प्रेमोद्यानांतील बुलबुल आहें

कौमार्य ओलांडून तो नुकताच कुठे युवावस्थेत पदार्पण करीत होता. त्याची विद्यार्थिदशा अद्याप संपलेली नव्हती. अत्यंत खडतर परिस्थितीतून वाट काढीत त्याने आपले विद्यार्जन चालविले होते. ना कुणाचा आधार, ना कुणाकडून धीर. काही निवडक मित्र दिलासा देत, त्याच्या बुद्धिमत्तेची तारीफ करीत, त्याच्या उज्ज्वल भविष्यकाळाची चित्रे चितारीत. त्यालाहि वाटे की, आप्तजन जरी आपल्याबद्दल उदासीन असले, आपल्याबद्दलची त्याची मतें जरी दूषित असली, आपले रूढीविरोधी वागणें त्याना जरी धर्मभ्रष्टतेचे वाटत असलें, तरी दुसरी अशी काही मंडळी आहे कीं, जी आपल्याशी सहानुभूतीने वागते, आपले कौतुक करते, आपलें भले इच्छिते. पण हीहि त्याची मनःस्थिति मधून मधून बदले व नैराश्याने त्याचे अंतःकरण झाकळून जाई; मादक मधुगीते उमटविणारी त्याची हृद्वीणा नैराश्यगीताचे सूर उमटवूं लागे. बहारच्या कवितेनें या त्याच्या परिस्थितीत पालट घडवून आणला. 'मृताना जिवंत करणारी तुतारी वाजीव आणि हिंदीस्तानच्या प्रेमात सुखदुःखाना बुडव', हा तिचा संदेश त्याच्या कानात घुमूं लागला. याला प्रत्युत्तर म्हणूनच कीं काय, तो स्वतःशींच पुन्हा गुणगुणला :

> "कवे, तुझ्या आत्म्याचे मी आभार मानतो, स्तुति आणि अमरत्व यांना तुझी गोड कविता पात्र होवो !"
>
> "मी प्रेमोद्यानांतला बुलबुल आहें आणि स्वतंत्रतेचा कोंबडा आहें. वीररसाच्या आणि शृंगाररसाच्या कवितेला मी नववधूप्रमाणें शृंगारीन."

स्वतःला 'प्रेमोद्यानातला बुलबुल', 'स्वतंत्रतेचा कोंबडा', असें म्हणविणारा हा युवक, हा कवि, महाराष्ट्रात थोर दर्जाचा प्रेमकवि, पंडित कवि म्हणून 'माधव जूलियन' या नावानें पुढें प्रसिद्धीला आला. त्यानें आपल्या अपूर्व शिल्पचातुर्गानें इराणी घाटाचे कुंभ घडवून ते मराठी इरेनें भरले. त्याने इराणी उमरला मराठी वेष चढवून मराठ्यांशीं त्याचा परिचय करून दिला, स्वतःच्या भाषेत घर करून राहिलेल्या इराणी शब्दाचा मराठी भाषिकाना उलगडा करून दिला, नवनव्या छंदावर विपुल व वैचित्र्यपूर्ण काव्यरचना केली व

इतरानाहि ती करतां यावी यासाठीं त्याचें शास्त्रहि सांगून टाकलें. इराणी शब्दांची त्याला काहीं काळ जी मोहिनी पडली होती, ती मोहिनी आपल्या मायबोलीला घातक आहे असें त्याला वाटूं लागलें, आणि तिच्याच नव्हे तर साऱ्या परकी भाषाच्या पकडींतून तिला सोडवून, 'स्वत्व न हारवतां ती प्रगमनशील व्हावी या दृष्टीनें तिचें संरक्षण व संवर्धन हिरीरीनें होणें' किती अत्यावश्यक आहे हे त्यानें आपल्या भाषाबांधवाना कळवळून सांगितलें व स्वतःहि त्यासाठी अपार श्रम केले.

# २

# पहिलीं पंधरा वर्षें

पुणें जिल्ह्यांतील मुळशी पेट्यातील आवळस हें माधवराव पटवर्धनांचें गांव. त्यांचा जन्म बडोदें येथें त्यांचे मामा महादेव विश्वनाथ सहस्रबुद्धे यांचे घरीं ता. २१ जानेवारी, १८९४ या दिवशीं झाला. माधवरावांचें पाळण्यांतलें नाव गजानन असें होतें. 'लहानपणीं ते दोन महिन्यांचे असतांना फार रडत असत, म्हणून त्याच्या आत्याबाईंनीं त्याची जोड्यांनीं तुला केली व त्यांच्या घराण्यांतील मूळ पुरुषाचें महादेव हें नाव त्यांना ठेवलें [१]. पुढें त्याना स्वतःला हें नांव आवडत नसल्यामुळें १९१२ सालीं कॉलेजांत असतांना ते 'महादेव'चे एक दिवस 'माधव' बनले. त्यांनीं हा बदल आपल्या सर्व स्नेह्यांस कळविला. 'रामचंद्र विनायक मराठे' यांसारखे त्यांचे स्नेही पुष्कळ वर्षांच्या संवयीमुळें पत्रांत केव्हां केव्हां अनवधानानें 'महादेव' या नांवानें त्यांना संबोधीत. मग लगेच यांची सूचना जावयाची, 'पुन्हां तूं प्रिय महादेव लिहूं लागलास. म्हण: माधव ! माधव ! माऽऽऽधव ![२]'

माधवरावांचे वडील त्रिंबकराव पटवर्धन टपालखात्यांत सुरत, भडोच, बडोदें या विभागांत 'सॉर्टर'चे कामावर होते. या कामासाठीं त्यांना नेहमींच फिरतीवर राहावें लागत असल्यामुळें आवळसलाच त्यांचीं पहिलीं आठ-नऊ वर्षें गेलीं. आवळसला त्यांचे चुलत आजोबा दिनकरअप्पा राहात असत. त्यांना मूलबाळ नव्हतें. त्यामुळें माधवराव व त्यांचीं भावंडें यावर त्यांची विशेष माया असे. माधवरावांचें प्राथमिक शिक्षण त्यांच्याच नजरेखालीं झालें. त्यांची

---

[१] आमचीं अकरा वर्षें, पृ. २.

[२] रा. वि. म. पत्रसंग्रह. क्रमांक ४६, ता. ८–२–१९१४.

मुंजहि (१९०३) त्यांनींच आवळस येथें केली. मुंज झाल्यावर अप्पाकाकानीं त्याजकडून थोडेसें संस्कृत पाठांतरहि करवून घेतलें. सबंध 'भगवद्गीता' व 'अमरकोश 'हीं त्यांस मुखोद्गत होतीं.

माधवरावांचे आजोबा विनायक नारायण पटवर्धन हे भडोचला पुष्कळ वर्षें अव्वल कारकून होते. सेवानिवृत्त झाल्यावर ते आवळस येथे येऊन राहिले. लहरी आणि स्वतंत्र वृत्तीचे असे हे गृहस्थ होते. त्याचें आणि मुलांचें विशेषसें कधीं पटलें नाही.

विनायकराव पटवर्धनांना एकंदर तीन अपत्यें. कृष्णराव, आऊताई व माधवरावांचे वडील त्रिंबकराव. कृष्णरावानीं गृहस्थधर्म न स्वीकारता संन्यासधर्म स्वीकारला. यानीं आपल्या ऐन तारुण्यात अत्यंत कष्टाची अशी नर्मदाप्रदक्षिणा केली होती. १९१८ सालीं हिमालयाचे यात्रेसाठीं ते जे महाराष्ट्रातून गेले ते पुन्हा परत आले नाहींत. आऊताई भडोचला सोहनीच्या घरीं दिल्या होत्या. त्याच्या यजमानांचा व्यवसाय उपाध्येपणाचा असे. त्रिंबकरावांचें लग्न त्यांनींच पुढाकार घेऊन केलें व पुढेंहि त्यांच्या कुटुंबाबद्दल आपल्या शक्त्यनुसार काळजी वाहिली. माधवरावाकडे त्याचा विशेष ओढा असे.

माधवरावांचें आवळस गाव आतां अस्तित्वांत नाहीं. टाटाच्या धरणासाठीं मुळशी पेट्यातील जी अनेक गावें पाण्यांत बुडविण्यात आलीं, त्यांत आवळस बुडविलें गेलें. जोंपर्यंत तें अस्तित्वांत होतें तोंपर्यंत माधवराव सुट्टींत त्या गावीं जात. या गांवाचें आणि तेथें राहात असलेले त्यांचे चुलत आजोबा दिनकर-अप्पा यांचें त्याना आकर्षण होतें. लहानपणींच नव्हे, तर पुढे मोठे झाल्यावरहि त्याना जीं तीन स्थानें खऱ्याखुऱ्या अर्थानें विश्रांतिस्थानें वाटत, त्यापैकींच आवळस हें एक होतें. दुसरीं दोन भडोच व बडोदें ही होत. त्याच्या आयुष्यातील अनेक सुखदुःखाच्या स्मृति या स्थानांशीं निगडित झालेल्या होत्या. मन अस्वस्थ झालें, एकान्ताची जरूरी भासूं लागली, आत्मपरीक्षणाची आवश्यकता वाटूं लागली की, यापैकी कुठल्या तरी एका ठिकाणीं ते जात. आवळस येथील आपल्या घराचें व लहानपणीं तेथें घालविलेल्या आयुष्याचें वर्णन, त्यानीं पुढें कित्येक वर्षांनंतर रचलेल्या,

'आमचें घर' या आपल्या कवितेंत केलें आहे. घराच्या शेजारून उथळ, नितळ थंडगार पाण्याचा ओढा वाहात असे. या ओढ्यांत कागदी होड्या सोडून त्यांची गंमत पाहण्यात, कधीं त्यांत तासचे तास डुंबण्यांत, कधीं कांठावरील कोरफड सोलून पाण्यांत भिजवून ती काचेसारखी दिसूं लागली कीं, 'कसें आहे बर्फ !' असें म्हणून मटकावीत बसण्यात त्यांनीं आपल्या बाल्यांतील कितीतरी दिवस घालविले होते. या मौजेत भाग घ्यावयास त्याच्या-इतकीच आनंदी व अल्लड अशी सोबतीण त्यास मिळाली होती. ही सोबतीण म्हणजे, नात्यानें वडील पण वयाने समान अशी त्याची आत्या येसूताई. पुण्यास त्याचे एक दुसरे आजोबा धोंडोपंत राहात असत, त्यांची ही मुलगी. लहानपणापासून निरपेक्षपणें, कोणत्याहि प्रकारे गाजावाजा न करतां, माधवरावावर प्रेम करणाऱ्या ज्या काही अगदी थोड्या व्यक्ति होत्या, त्यांपैकीं येसूताई ह्या एक होत. कुलाबा जिल्ह्यातील गोरेगाव येथील खोत गोखले यांजकडे त्या दिल्या होत्या. यानीं पुढें, स्वतःस पुत्रसंतान नसल्यामुळें, माधवरावांचे एक धाकटे बंधु केशवराव यास दत्तक घेतलें आणि दोन्ही घराण्यांचा संबंध अधिक निकटचा केला. आवळसचें घर बुडाल्यावर येसूताईंचें गोरेगांव हेंच माधवरावाना आवळसच्या जागीं वाटूं लागले.

१९०४ सालीं माधवराव आवळसहून बडोद्यास त्याचे मामा सहस्रबुद्धे यांजकडे आईसह राहावयास आले. मराठी शिक्षणाबरोबरच त्यांचें थोडेंसें इंग्रजीचेंहि शिक्षण, मधून मधून ते वडिलाबरोबर असत तेव्हां त्याच्याच नजरेखालीं झालें होतें. त्याचा फायदा त्याना बडोद्यास मिळाला. बडोद्याच्या ब्रँचस्कूलमध्यें ते जेव्हा दाखल झाले तेव्हा त्याना एकदम दुसऱ्या इयत्तेत प्रवेश मिळूं शकला. इंग्रजी शाळेंतल्या या काळातील आठवणी सांगताना माधवरावाचे एक शाळासोबती श्री. भालचंद्र विनायक दिघे हे लिहितात :[3]

"माधवराव बडोदे येथील ब्रँचस्कूलमधील दुसऱ्या इयत्तेत इ. स. १९०४ मध्यें दाखल झाले. त्या वेळीं ते आणि मी एकाच वर्गात असल्यामुळें आम्हां दोघांची मैत्री जमली. आमचे वर्गशिक्षक भिडे नावाचे गृहस्थ होते.

[3] प्रस्तुत चरित्रासाठीं खास लिहून दिलेल्या 'सहवासांतील आठवणी'.

विद्यार्थ्यांबद्दल त्याना फार कळकळ असे. कोणा विद्यार्थ्याचा अभ्यास मागें राहिला तर सुटींत अगर फावल्या वेळांत त्याला आपल्याकडे बोलावून त्याजकडून ते तो करवून घेत; ममतेनें अडेल तेथें सागत. विद्यार्थ्यांत मिळून-मिसळून वागण्याकडे त्याची प्रवृत्ति असे. सध्याकाळीं शाळा सुटली कीं, ते आमच्येबरोबर आस्यापास्या, खो खो खेळत; आणि खेळ संपल्यानंतर सर्वांशीं गप्पा मारीत घरीं जात. त्यानीं आमचेकडून इंग्रजीचा चांगलाच कसून अभ्यास करवून घेतला. वेब्स्टरचा इंग्रजी कोश पाठ केला असतां इंग्रजी चागलें येते असा त्याचा विश्वास असे. त्यानीं दिलेल्या पद्धतशीर शिक्षणामुळें आम्ही सर्व विद्यार्थी परीक्षेंत उत्तीर्ण होऊन तिसऱ्या इयत्तेंत गेलों. या उत्तीर्ण झालेल्या विद्यार्थ्यांत विशेष हुशार म्हणून गजानन कुशाबा श्रीगोंदेकर, संत, पंडित व माधवराव पटवर्धन हे मोडत.”

“१९०५ मध्यें आम्ही तिसऱ्या इयत्तेंत गेलों. या इयत्तेवर तांबे नांवाचे शिक्षक होते. गृहस्थ अतिशय रागीट व शिस्तीचे भोक्ते. ज्या दिवशींचा अभ्यास त्या दिवशीं झालाच पाहिजे असा त्याचा कटाक्ष असे. टंगळ मंगळ करणाऱ्या विद्यार्थ्यास क्षमा कधींच व्हावयाची नाहीं. त्यामुळें प्रत्येकजण आपापला अभ्यास नियमितपणें घरीं करावयाचा. माधवराव मात्र याला अपवाद असत. वर्गांत त्याचा काय अभ्यास होईल तो. ते एकपाठी [४] असल्यानें वर्गांत शिकविलेलें त्याचे नीट ध्यानीं राही आणि तेवढ्यावरच त्यांचें भागे.”

“तांबे मास्तरांची विद्यार्थ्यांवर नेहमीं सक्त नजर असे. जरासें का होईना, कोणाचें गैरवर्तन दिसलें, कीं लगेच त्याला शिक्षा व्हावयाची. आपण नजर ठेवतों हें विद्यार्थ्यांच्या लक्षात येऊं नये ह्यासाठीं ते स्वतःचेसमोर पुस्तक

[४] माधवरावांच्या या एकपाठीपणाबद्दलची एक आठवण, त्यांच्या मामाचे एक वृद्ध शेजारी श्री. कृष्णराव मराठे हे, पुढीलप्रमाणें सागतात: “माधवरावांच्या लहानपणीं बडोद्यांतील शाळा उन्हाळयाच्या दिवसांत सकाळचे वेळीं भरत, दुपारचा वेळ मोकळा असे. या मोकळ्या वेळात त्यांनीं त्याचे एक दूरचे आप्त श्री. गजाननराव सहस्रबुद्धे यांजकडे पुरुषसूक्त वगैरे शिकावें अशी त्यांच्या मामांनीं योजना केली व ते कांहीं कामाकरितां

धरून त्याजबरोबर टांचणीनें भोंकें पाडलेला कागद डोळ्यांसमोर धरीत व त्यांतून त्याजकडे पाहात. एकदा एक गम्मत झाली. आमच्या वर्गात ×××× नांवाची एक विद्यार्थिनी होती. या विद्यार्थिनीकडे माधवरावांनीं पायांत एक खडा धरून बांकाखालून फेकला. तावे यांनीं तो आपल्या छिद्रमय कागदांतून पाहिला आणि लगेच ते ओरडले, "पटवर्धन, उभा राहा." आपल्या खुर्चीवरून उठून ते माधवरावाकडे आले आणि त्यांचा कान पकडून त्यांनीं त्यांना बाकावर १५ मिनिटें उभे राहाण्याची शिक्षा फर्मावली. पटवर्धन हा बुद्धिमान् पण खोडकर मुलगा आहे असा त्याचा समज असे आणि त्याप्रमाणें ते त्याजवर नजर ठेवीत. या इयत्तेंत असतांना माधवरावांनीं आपली 'धडाड धडाड खडाड खडाड' या ओळीने सुरुवात होणारी आगगाडी ही कविता लिहिली. [५]

"तिसरी इयत्ता पास झाल्यानंतर आम्ही सर्व विद्यार्थी बडोदें हायस्कूलमध्यें गेलों. त्या वेळेस हें हायस्कूल स्टेशनाजवळ सध्यां कॉलेज इमारत म्हणून ओळखल्या जाणाऱ्या भव्य इमारतींत होतें. माधवरावांनीं दुसरी भाषा म्हणून संस्कृत घेतली होती व मी पर्शियन घेतलें होतें. चौथ्या–पांचव्या इयत्तेंत

---

बाहेरगांवीं गेले. बाहेरगांवाहून परत आल्यावर त्यांनीं श्री. गजाननराव यांजकडे माधवरावाचें कुठवर पाठातर झाले याची चौकशी केली. त्यावर त्यांनीं 'महादेव ४–५ दिवस आला व पुढें येण्याचा बंद झाला' असें सांगितलें. मामांनीं त्याबाबत माधवरावास विचारतां, "गजाननराव यांजकडे जेवढें कांहीं म्हणावयाचे होते तेवढें म्हटलें. पुढें आवश्यकता राहिली नाही म्हणून गेलों नाहीं", असें उत्तर दिलें. मामांनीं त्याची परीक्षा घेतली. तेव्हां त्यांनीं जेवढें म्हणून पाठ केलें होतें तेवढें सारे उच्चार व आरोहावरोह यात कोठेंहि चूक न करता म्हणून दाखविलें. भाच्याची ही पठनशक्ति पाहून मामा थक्कच झाले; त्याच्या तैलबुद्धीबद्दल त्याना कौतुक वाटलें.

[५] 'स्वप्नरंजन' या कवितासंग्रहांत ही कविता छापली आहे. तिचा रचनाकाल १४ सप्टेंबर, १९२७ असा तिचेखालीं दिला आहे. कदाचित् बालपणीं लिहिलेल्या कवितेची ही परिष्कृत आवृत्ती असावी.

असतांना माधवराव हजेरीपुरते शाळेंत येत; अभ्यास ते घरीच करीत. सहाव्या इयत्तेंत गेल्यावर माधवरावांनीं संस्कृत सोडून पर्शियन भाषा घेतली. आम्हां सर्वांना त्याबद्दल आश्चर्य वाटलें. मी माधवरावांना म्हणालों, 'संस्कृत सोडून पर्शियनसारखी कठीण भाषा कशाला घेतलीस, आणि तीहि इतक्या उशीरां!' माधवराव हासले आणि उत्तरले, 'त्यांत कसला आला आहे कठीणपणा. संस्कृतप्रमाणें त्यांतहि मी यश मिळवून दाखवीन.' त्याप्रमाणें त्यानीं तें दाखविलेंहि. त्यांनीं त्यावर एवढें प्रभुत्व मिळविलें, कीं आमचे पर्शियन भाषेचे शिक्षक मि. कादरी त्यांजवर निहायत खूष असत. कादरी मास्तर करीमाच्या वगैरे कविता त्यास फारच काळजीपूर्वक समजावून देत. पुढे मॅट्रिकच्या परीक्षेंत पर्शियनमध्यें त्यांनीं वरच्या दर्जाचे गुण मिळविले. हायस्कुलांत असताना पर्शियनप्रमाणें इंग्रजी उत्तम जाणणारा विद्यार्थी म्हणून त्याची ख्याती होती. इंग्रजी निबंधलेखनांत ते नेहमींच उच्चांक पटकावयाचे."

माधवराव १९०९ साली मॅट्रिक झाले. उत्तीर्ण झालेल्या विद्यार्थ्यांत त्यांचा २१४ वा नंबर आला होता. त्यांच्यासारख्या तीव्र बुद्धिमत्तेच्या विद्यार्थ्यास याहून कितीतरी अधिक स्पृहणीय यश मिळविणें शक्य होतें. कदाचित् संस्कृत विषय बदलून शेवटच्या दोन वर्षांत पार्शियन घ्यावें लागल्यामुळें त्या एका विषयावरच त्याना जे जादा श्रम करावे लागले, तेंहि एक त्याला कारण असण्याचा संभव आहे. स्वतःच्या इच्छेविरुद्ध, वडिलानी बळजबरी केल्यामुळेंच केवळ, त्याना ही भाषा शिकावी लागत होती. त्यामुळें त्या भाषेबद्दलची विलक्षण अढी त्यांच्या मनात पुढें कित्येक वर्षे राहिली. त्या भाषेत प्रावीण्य मिळवून त्यानीं उच्च पदव्या संपादन केल्या आणि आयुष्याच्या अखेरीपर्यंत ती विद्यार्थ्यांना शिकविलीहि, पण तिच्याबद्दल त्यांना आदर कधींच वाटला नाही.

माधवरावांचा, इंग्रजी शाळेंत गेल्यावर पहिलीं तीन-चार वर्षें अभ्यासापेक्षां व्यायाम, खेळ, अवातर वाचन याकडेच अधिक ओढा असावा असे दिसतें. शाळेपेक्षां तालमीच्या आखाड्याकडे त्यांचे पाय अधिक उत्सुकतेने वळत. गणितातील पेंच सोडविण्यापेक्षां कुस्तीतील पेंच सोडविण्याला ते अधिक आतुर असत. अशाच एका कुस्तींत त्यांनीं एकदा आपला हातहि मोडून घेतला. कितीतरी दिवस त्यांना या दुखण्याचा त्रास सोसावा लागला होता. पण

वाइटातूनहि कित्येकदां चांगले निघतें असें म्हणतात, त्याप्रमाणें या दुखण्यांत त्याना एक अपूर्व जोड मिळाली आणि ती म्हणजे रामचंद्र विनायक मराठे (रा. वि. म.) या मित्राची. माधवरावाचा हात बरा होण्यासाठी त्यांच्या आत्याबाईबरोबरच मराठे यानींहि बरेच श्रम घेतले. कुस्तीप्रमाणेंच मारामारींतहि एखाद्या गटाचें म्होरकेपण स्वीकारून अस्तन्या वर करावयाला ते केव्हांहि तयार असत. मराठ्यांप्रमाणेंच अत्यंत जिवलग असलेले त्यांचे दुसरे स्नेही विठ्ठलराव घाटे यांचाहि प्रथम परिचय मारामारीचें नेतृत्व स्वीकारण्यास पाचारण केले गेले असतां झाला. श्री. घाटे यानीं आपल्या आठवणींत[६] या प्रसंगाचें पुढीलप्रमाणें मोठे रंगदार वर्णन केलें आहे.

"१९०४–५ सालची गोष्ट. कदाचित् एखादें साल अधिक असेल, नक्की आठवत नाहीं. मी त्या वेळेस बडोद्यास रावपुऱ्यात मारुतीचें देऊळ असलेल्या एका घरात राहात होतों. आमच्या गल्लींतील मुलाचा गोट्या खेळण्याचा एक गोट होता. कांहीं कारणामुळें आमचें जवळच्या गल्लींतील मुलाशीं भांडण झालें. कांहीं दिवस भांडण शाब्दिकच होतें आणि त्यांत आम्ही त्याना हार जाण्यासारखे नव्हतों. पण पुढें मारामारीचा प्रसंग आला. आमच्यापेक्षा तीं मुलें वयानें मोठीं व दाडगट होतीं. त्याच्याशीं दोन हात कसे करावे असा प्रश्न पडला. आमच्याचपैकीं एकाने सूचना केली, 'शास्त्र्याच्या बोळात तो म्हाद्या पटवर्धन राहातो. नुकताच गेलाय् इंग्रजींत. त्याला आणतों आपल्या साह्याला. अंगापिंडानें तो असा तसाच आहे, पण खूप धीट आहे. तो पडेल आपल्या उपयोगीं'.

"दुसरे दिवशीं आमच्या गोटात 'म्हाद्या' आला. होता तो दहा–अकरा वर्षांचा. त्याचें व आमच्या प्रतिस्पर्ध्यांचें भांडण नव्हतें–ओळखदेखहि नव्हती. पण, 'महादेव, झुजायला तयार आहेस काय?' असें आम्ही विचारताच, कोणाशी झुंजायचें हें न पुसताहि तो तात्काळ तयार झाला. महादेव त्या दिवशीं मला कसा दिसला हें आतां मी विसरलों. मला फक्त त्या वेळचे त्याचे ओठ आठवतात. ते बोलतांना सारखे स्फुरत होते. विशेषतः

[६] माधवरावांच्या कांहीं आठवणी, लोकशिक्षण, फेब्रुवारी–मार्च १९४०.

तो खालचा ओठ क्षणभरहि स्वस्थ नव्हता ! त्याच्यामध्यें स्वतंत्र असे एक प्रकारचें जीवन होतें."

"महादेवाचा आमच्या गल्लींतील भाडणांत काय उपयोग झाला ते आज आठवत नाहीं. कदाचित् आमचे दोन हात झालेच नसतील. महादेव मात्र त्या दिवसापासून आमच्या गोटांत येऊन मिळाला आणि गोष्या खेळूं लागला."

"माधवराव पटवर्धन याची—माझी ही पहिली भेट. ते स्वतःचा अर्था-अर्थी संबंध नसताना आमचीं भांडणें भांडण्यास आले होते. पुढे आयुष्यभर त्यांजवर दुसऱ्याचीं व स्वतःचीं भाडणें भांडण्याचे जे अनेक प्रसंग आले, त्याची ही कदाचित् रंगीत तालीम असेल."

१९०७-९ चे दरम्यान महाराष्ट्रांत बंगालला साथ देण्यासाठीं म्हणून जी क्रातिकारकाची चळवळ जोरानें सुरू झाली होती त्याचें लोण बडोद्यापर्यंतहि येऊन पोंचलें होतें. या चळवळींत गुप्तपणें भाग घेणाऱ्या मंडळींत माधवरावांचे कांहीं तालीमबाज स्नेही होते. त्याच्या प्रेरणेनें कांहीं दिवस माधवरावहि त्यांत सामील झाले होते. एक दिवस कांहीं रासायनिक द्रव्यांच्या साहाय्यानें बॉब तयार करण्याचा प्रयत्न करीत असतांना माधवरावांचे दोन्ही हात भाजले. तें त्यांना एक मोठें दुखणेंच झालें होतें. आठ-पंधरा दिवस हातांनीं त्यांना अंथरुणावर लोळविलें [७]. राजकारणांत प्रारंभींच हे असे हात भाजून निघाल्यामुळें, पुढें केव्हाहि त्यानीं ते त्यात घातले नाहींत. त्या वेळेस क्रातिकारक म्हणून गाजलेल्या व तरुणांच्या मनाची विलक्षण पकड घेणाऱ्या 'कीचकवध' नाटकाचे ते एक मोठे भक्त बनले होते. त्यांतील भीमाचीं व कीचकाचीं भाषणें ते व त्यांचे स्नेही रामभाऊ मराठे ह्यांनीं पाठ केलीं होतीं. माधवराव भीम होत व रामभाऊ कीचक होत व मोठा सुंदर अभिनय करून तीं भाषणें ते दोघे म्हणत [८]. हा सारा तत्कालीन राजकीय वातावरणाचा कैफ होता. तो अल्पकालच टिकला. पुढील आयुष्यांत राजकारणाचे बाबतींत माधवरावांची भूमिका प्रेक्षकाचीच राहिली.

[७,८] आमचीं अकरा वर्षें, पृ. ३.

इंग्रजी शाळेंतील प्रारंभींच्या वर्षांतील हा बूडपणा पुढें कमी कमी होत गेला. स्वतःवरील जबाबदारीची जाणीव त्यांना तीव्रतेनें होऊं लागली. आपले पाऊल पुढें कसें पडेल; भविष्यकाळ उज्ज्वल होण्याच्या दृष्टीनें आपली ज्ञानसाधना पूर्ण कशी होईल; प्रत्यहीं अडथळा उत्पन्न करणाऱ्या प्रतिकूलतेवर मात करून आपला बौद्धिक विकास आपल्याला कसा साधता येईल, या विचारात ते गढून जाऊ लागले. त्यांच्या आयुष्यांतील तो एक संक्रमणाचा काळ होता. त्याच्या सुदैवानें तशा त्या महत्त्वाच्या घडीला एका आदर्श शिक्षकाच्या सहवासात ते आले. हे शिक्षक म्हणजे त्यांच्या शाळेचे मुख्याध्यापक मंचरशा वाडिया हे होत. त्यांचा स्वभाव, त्यांचें चारित्र्य, त्यांचा व्यासंग, याचा माधवरावाच्या संस्कारसुलभ मनावर प्रोत्साहक परिणाम होऊं लागला; त्यांच्यात नव्या उमेदी उत्पन्न होऊ लागल्या. ते हळुहळू अधिक विचारी व अभ्यासू वृत्तीचे बनत चालले. वाडिया मास्तराच्या सहवासांत त्यांना साहित्याची, विशेषतः इंग्रजी काव्याची, गोडी लागून आपणहि असेंच आपल्या मायबोलींत लिहावें असें वाटूं लागलें; कांहीं वाङ्मयीन व विद्यालयीन महत्त्वाकांक्षा त्यांच्या मनांत डोकावूं लागल्या. माधवरावांना या आपल्या गुरूनें आपल्या आयुष्यांत घडवून आणलेल्या या स्थित्यंतराचें केवढें ऋण वाटे त्याचें प्रत्यंतर त्यानीं आपल्या 'द्राक्षकन्या' या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत वाडिया मास्तरास अनुलक्षून लिहिलेल्या पुढील मजकुरावरून दिसून येईल. "ज्या माझ्या पूज्य व शिष्यप्रिय 'वाडिया मास्तर' याना हें पुस्तक कृतज्ञतापूर्वक अर्पण करण्यांत आलें आहे, त्यानींच बावीस वर्षांपूर्वी (१९०९) प्रथमतः आपल्या रसाळ शिकवणुकीनें इंग्रजी काव्यातील रमणीयता माझ्या निदर्शनास आणली, आणि आपल्या साध्या व उदात्त जीवनक्रमाच्या उदाहरणानें शेंकडो नीतिपाठांना करतां येणार नाहीं एवढा सुपरिणाम माझ्या अंतःकरणावर केला. 'द्राक्षकन्या' ही माझी अल्पशी गुरुदक्षिणा आहे."

मंचरशा वाडिया यांच्याप्रमाणेंच बडोद्यातील आणखी एका गृहस्थाच्या सहवासाचा त्यांच्या जीवनावर परिणाम झाला होता. प्रो. गणेश सदाशिव भाटे हे ते गृहस्थ होत. माधवरावाचे वर्गबंधु व लहानपणापासूनच जिव्हाळ्याचे स्नेही नामदेव भाटे याचे हे वडील बंधु. विलायतेंतील

पदवी धारण करणारे एक विद्वान् व कर्ते सुधारक म्हणून ते त्या काळीं प्रसिद्ध असून, बडोदें संस्थानच्या जमीनमहसूल खात्यात एक बडे अधिकारी होते. इंग्रज आणि त्याची संस्कृति याचे ते चाहते असत; त्याची राहणीहि विलायती पद्धतीची असे. परंतु इंग्रजाचे ते अंधभक्त नव्हते; त्याच्यातील काहीं गुण त्याना राष्ट्रहितकारक वाटत व ते आपल्यात उतरले पाहिजेत असा त्याचा आग्रह असे. इतिहास हा त्यांचा विशेष आवडीचा विषय होता. त्याच्या सूक्ष्म अभ्यासामुळें, राष्ट्राच्या उत्कर्षापकर्षा-संबंधीचे त्याचे कांहीं सिद्धान्त ठरून गेले होते. या सिद्धान्तानुसार राष्ट्राराष्ट्रांतील घडामोडींकडे ते पाहात. स्वराष्ट्राच्या उद्धारासंबंधींच्या त्याच्या कल्पना तत्कालीन राजकारणी मंडळींहून स्वतंत्र, शास्त्रशुद्ध व उदार होत्या. भोंवतालच्या मंडळींत ते त्या निर्भीडपणें बोलून दाखवीत त्याची वृत्तीहि मानी व स्वतंत्र होती. त्यामुळे संस्थानी वातावरण त्याना फार दिवस मानवलें नाहीं. काही वर्षांनीं बडोदें सोडून ते पाटण्यास गेले. तेथील विद्यापीठात इतिहासाच्या अध्यापनाचे काम त्यानीं केलें. आयुष्याच्या अखेरीपर्यंत ते तेथेंच होते.

माधवरावाचें, नामदेव भाट्यांमुळें, भाटे कुटुंबांत जाणें येणें फार असे. त्याच्या सुधारणाप्रिय वृत्तीला या कुटुंबातील वातावरण उत्तेजक वाटे. प्रो. दादासाहेब भाटे यांजविषयीं त्याना अतीव आदर वाटे. दादासाहेबांचेंहि माधवरावावर तसेंच प्रेम होते. त्याची हुशारी, त्यांची शीघ्रग्रहणशक्ति, त्यांचा चुणचुणीतपणा, नवें नवें शिकण्याकडे असलेला त्याचा ओढा याबद्दल माधवरावांचें ते कौतुक करीत. साऱ्याच भाटे कुटुंबाला त्यांच्याबद्दल आपलेपणा वाटे. आणि माधवरावहि इतक्या सहजपणें या कुटुंबांत मिसळून गेले होते कीं, त्यांनाहि तीं आपली आप्तमंडळीच वाटे. नामदेव भाट्यांवर तर त्याचें गाढ प्रेम होतें. बडोद्याला असताना दोघे एकमेकांना कधीं विसंबले नाहींत. अभ्यास, खेळ, करमणूक, प्रवास हीं त्यांचीं सारी एकत्र व्हावयाचीं. नामदेवांचा दिलखुलास, खेळकर, आनंदी, किंचित् शिपाईबाण्याचा व धाडसी स्वभाव माधवरावांना आवडे. पुढे प्रौढ वयांतहि, दोघांचेहि व्यवसाय भिन्न असतां व भेटीगांठी वर्षानुवर्षें पडत नसतांहि, परस्परांची परस्परांबद्दलची ओढ कायमच राहिली.

माधवरावानीं आपल्या आयुष्यात 'नामस्मरण' कधीं केलें नसेल, पण या 'नामा'चें स्मरण झालें नाहीं असा त्यांच्या आयुष्यांत कधीं एक दिवसहि गेला नसेल. त्याच्या सर्व जिवलग मित्रांत नामदेवांचें त्याच्या अंतःकरणांतील स्थान कांहीं वेगळेंच होतें. त्यांचा जीवींचा जिवलग असे जर कोणाबद्दल यथार्थतेनें म्हणता येईल तर ते नामदेवाबद्दलच. नामदेवावरील या प्रगाढ प्रेमामुळें, त्याच्या ज्येष्ठकनिष्ठ भगिनींचीहि माधवरावावर माया जडली. नामदेवराव व माधवराव हे त्याना अभिन्न वाटत. माधवरावांच्या भावजीवनात भाटे कुटुंबाचें स्थान फार महत्त्वाचें होतें. माधवरावाच्या अनेक महत्त्वाकांक्षांचें व ध्येयाचें बीजारोपण या मंडळीच्या सहवासांत झालें.

माधवरावाच्या मनात डोकावणाऱ्या या वेळच्या महत्त्वाकांक्षांपैकीं अत्यंत तळमळीची कोणती महत्त्वाकांक्षा असेल तर ती आपण पदवीधर व्हावें ही होय. पण ती साध्य होणें महाकठीण काम होतें. घरच्या मंडळीचा या गोष्टीला तीव्र विरोध होता. मॅट्रिकची परीक्षा पास झाल्यावर ताबडतोब नोकरीत शिरून मार्गाला लागावें असा त्याच्या वडिलाचा आग्रह होता; परंतु थोरले मामा महादेवराव सहस्रबुद्धे याच्या प्रोत्साहनानें आणि स्वतःच्या (कदाचित् आनुवंशिक) आग्रही व महत्त्वाकांक्षी स्वभावामुळें त्यानीं पदवीधर होण्याचें ठरविलें.

# ३

# बडोद्यांतील महाविद्यालयीन आयुष्यक्रम

मनाशीं निश्चय केल्याप्रमाणें मॅट्रिक होतांच माधवरावानीं आपलें नांव बडोदें कॉलेजांत नोंदविलें. त्यांच्या मामानीं जरी आर्थिक साहाय्य करावयाचें त्याना आश्वासन दिलें होतें, तरी सर्वच खर्च त्याना झेपण्यासारखा नव्हता. यासाठीं, त्यांनीं शिकवण्या वगैरे मिळवून आणि काटकसरीनें वागून घरच्या मंडळीवरील भार जितका कमी करता येईल तितका कमी करण्याचें ठरविलें. त्याचे गणित व इंग्रजी हे दोन विषय चागले होते. त्यामुळें त्याना शिकवणी मिळणें कठीण गेलें नाहीं. बडोद्याचे त्या वेळचे उद्यानाधिकारी कोठावाला या पार्शी गृहस्थाकडे त्याना शिकवणी मिळाली व ती बरींच वर्षे चालली. त्याच्या मुलाला व मुलीला ते शिकवीत. त्याच्याकडे पहिल्या वर्षी २० रुपयांची शिकवणी होती. पुढें तेथेंच त्याचा ३०, ४०, ४५ रुपये असा तनखा वाढला. कांहीं दिवस तेथील एका शाळेत काही तास शिकविण्याचेंहि काम त्यानी पत्करलें होतें.

कॉलेजांतील पहिलीं दोन वर्षे त्याचीं अत्यंत कष्टाचीं गेलीं. तरी पण अभ्यासाच्या बाबतीत त्यानी त्याची झळ स्वतःस पोंचूं दिली नाही. प्रिव्हिअस व इंटर या दोन्ही परीक्षात ते द्वितीय श्रेणीत उत्तीर्ण झाले. इंटरच्या परीक्षेत फार्शी भाषेमध्यें त्याना पहिल्या वर्गाचे गुण मिळाल्यामुळे, कॉलेजातील फरीदुद्दीन अहमद पारितोषिक त्यास मिळालें. केवळ दोन गुण कमी मिळाल्यामुळें कॉलेजातील शिष्यवृत्ति त्यांना मिळूं शकली नाहीं. पण फीमध्यें तीन चतुर्थांश माफी मिळाली.

माधवरावाचें कॉलेजातील आयुष्य जितकें कष्टाचें तितकेंच क्रांतिपूर्ण होतें. त्याच्या आचाराविचारात झपाट्यानें बदल घडून येत होता. त्याच्या मामांच्या

घरची राहाणी अगदीं जुन्या वळणाची व वृत्ति कर्मठ, कुटुंबांतील व्यक्तींच्या परस्परसंबंधांविषयींच्या कल्पना परंपरागत, रुढीविरोधी वागणूक म्हणजे पुरेपुर धर्मभ्रष्टता ही घरच्या मंडळीची भावना. याच्या उलट स्थिति, कॉलेजांतील मित्र-मैत्रिणींमुळें त्यांचा ज्या कुटुंबाशी संबंध येऊं लागला त्या ठिकाणीं त्याना आढळून येऊं लागली. ज्या मोकळ्या वातावरणासाठीं, खेळीमेळीच्या वागणुकीसाठीं, विचारांतील ताजेपणासाठीं त्यांचा जीव आसुसलेला असे, तें सारें त्यांना या कुटुंबांत आढळूं लागलें. त्यामुळें त्यांचा घराकडचा ओढा दिवसेंदिवस कमी कमी होत चालला. केवळ घरच्या मंडळीचें मन मोडूं नये यासाठीं त्यांना आपल्या मनाविरुद्ध ज्या गोष्टी कराव्या लागत होत्या, त्या तशाच चालू ठेवणें ही स्वतःचीच फसवणूक आहे असें त्यांना वाटूं लागलें. केवळ दुसऱ्याच्या दाबामुळे जेव्हां एखादी व्यक्ति कृती करीत असते, तेव्हां ती स्वतःला खुरटवून टाकीत असते, स्वतःच्या हातानेंच स्वतःच्या वाढीला विरोध करीत असते, स्वतःभोंवतालचीं खिडक्यादारें बंद करून ताजी जीवनदायी हवा आणि चैतन्यपूर्ण प्रकाश यांना मज्जाव करून स्वतःचा मृत्यु लवकर घडवून आणीत असते. माधवरावाना याची जाणीव हळुहळू होऊं लागली होती. या नवजागृत जाणिवेमुळें त्याचें मन पारंपरिक आचारा-विरुद्ध मधून मधून बंड करूं लागलें; घरच्या मंडळीपासून शक्य तितकें दूर राहावें असें त्यांना वाटूं लागलें. या विचाराची अंमलबजावणी त्यांनी १९१२ पासून केली. बी. ए.चा अभ्यास घरीं राहून होणार नाहीं ही गोष्ट मामांना पटवून देऊन, ते कांहीं महिने कॉलेजच्या वसतिगृहांत राहिले. या वसतिगृहाच्या स्क्वेअर ब्लॉकमधील १२ नंबरच्या खोलींत ते राहात असत आणि जेवावयाला मामाकडे जात. पण पुढें त्यांत फार वेळ जातो असें आढळल्यामुळें, ते त्यांच्या मामाच्या घरापासून जवळ असलेल्या देवांच्या चाळींत, त्यांचे एक स्नेही नीळकंठ श्रीधर कर्वे यांचे खोलींत कांहीं दिवस व नंतर स्वतंत्र खोली घेऊन राहूं लागले. घरच्या मंडळीशीं असलेला संबंध त्यांनीं जवळजवळ तोडलाच होता. या देवांच्या चाळींत, त्यांच्या आयुष्यांतील १९१३–१६ हीं तीन अत्यंत महत्त्वाचीं वर्षें गेलीं. त्यांच्या कवितेला पहिला बहर या ठिकाणींच आला; त्यांच्या आयुष्यक्रमावर कायमचा ठसा उमटविणाऱ्या अनेक घटना येथेंच घडल्या; महादेव पटवर्धनाचे माधव

पटवर्धन ते येथेंच झाले; ‘जूलियन ॲंडरले’ आणि नंतर ‘माधव जूलियन’ हें नामधारण येथेंच घडलें.

माधवराव, देवांच्या चाळींत राहावयास आले, तेव्हां त्यांच्या मनांत अनेक उमेदी खेळत होत्या. अभ्यासाला मनाजोगी स्वतंत्र जागा, उत्तेजक असें मित्र–मैत्रिणींचें खेळकर मोकळें वातावरण, आस्थेनें व वात्सल्यपूर्वक विचारपूस करणारी काशीताई हेर्लेकर यांच्यासारखी मंडळी, हा सर्व योग त्यांच्या दृष्टीनें एकपरी उपकारकच होता. पण त्याच्या आयुष्यातील तीं तीन वर्षे अशीं कांहीं चमत्कारिक गेलीं, कीं कोणालाहि त्याबद्दल त्याची कींवच वाटावी. १९१३ व १९१४ हीं दोन वर्षे, भावनाच्या आहारीं जाऊन, अस्थिर, अशांत, कित्येकदा प्रक्षोभक अशा स्थितीत त्यानीं घालविलीं. त्याचा परिणाम त्याच्या मनावर व शरीरावर झाला; तीं दुबळीं बनलीं. अभ्यासाचे मातेरें झालें. घरात आणि बाहेर निंदा, हेटाळणी होऊं लागली. अध्यापक आणि सहाध्यायी यांजकडून अनादर होऊं लागला. आप्तेष्ट मंडळी भलभलत्या कंड्या पिकवूं लागली. खुद्द त्यांचाच स्वतःवरील विश्वास उडत चालला. गणित हा ऐच्छिक विषय घेऊन बी. ए.ची पदवी, उच्च श्रेणींत येऊन आपण सन्मान-पूर्वक संपादूं अशी महत्त्वाकांक्षा प्रारंभी व्यक्त करणारे माधवराव, आत्म-विश्वास नष्ट झाल्यामुळें कांहीं दिवस गणित, कांहीं दिवस इंग्रजी, कांहीं दिवस इतिहास असे विषय बदलतांना आढळूं लागले; परीक्षेच्या मंडपात गेल्यावर डोकें भणभणावें, कांहीं सुचूं नये आणि कोरे कागद देऊन बाहेर पडावें अशीहि त्याची एक–दोनदां अवस्था झाली.

माधवरावांची ही अशी अवस्था होण्यास, इतर कोणाहीपेक्षां त्यांचे तेच अधिक कारणीभूत होते. सत्यसृष्टीपेक्षां स्वप्नसृष्टींतच ते स्वतःला भ्रमवीत; वास्तवतेकडे लक्ष न देतां काल्पनिकाकडे ते धांव घेत. कदाचित् काव्याची मखमली हिरवळ त्यांतून निर्माण झाली असेल, पण प्रत्यक्ष जीवितांत ‘सहारा’ निर्माण झाला त्याचें काय ? त्यांना हें कळत नसे असें नाहीं. रा. वि. म. यांना ते लिहितात, “स्वप्नसृष्टींत विहार करणें मला जात्या आवडतें. त्यानें झालें काय ? इकडे कर्तव्याचा समुद्र कोरडा होत चालला ना ? कर्तव्याशिवाय

मला गती नाहीं. कर्तव्यावाचून मी जगणार नाहीं. इतकें असूनहि माझें आहे ते आहेच. I see my faults and yet I faults persue."

कॉलेजांत एक गरीब पण बुद्धिमान् विद्यार्थी म्हणून प्रारंभीं त्यांजकडे अनेकांचें लक्ष्य वेधलें गेलें होतें. गणित आणि इंग्रजी या विषयावरील त्यांचें प्रभुत्व, वादविवादसभेंत मोठ्या धिटाईनें पुरोगामी विचार बोलून दाखवून प्रतिकूल वातावरणातहि सभा जिंकण्याचें त्याचें कौशल्य, पोषाखाचा दिमाख नसतांहिं छाप पाडणारें त्याचें व्यक्तिमत्व, यामुळें ते बऱ्याच जणाच्या कौतुकाचा विषय बनले. वर्गांत विषयस्पष्टीकरणाच्या वेळीं दुसऱ्या एखाद्या लेखकाचे विचार स्वतःचेच म्हणून दडपून सागणाऱ्या प्रोफेसराला, 'सर, हे तुमचे विचार नव्हेत, अमुक अमुक लेखकानें अमुक अमुक ठिकाणीं ते प्रदर्शिले आहेत', असें चट्दिशी उठून खटकावणारा विद्यार्थी म्हणूनहि त्याची ख्याती होती. जी पुस्तकें परीक्षेला असतील, त्यावर जेथें जेथे जें जें काहीं लिहिलेले असेल तें तें वाचून काढून त्याचीं टिप्पणें लिहून ठेवण्याची त्याना संवय होती. त्यामुळें प्रोफेसरापेक्षाहि त्या त्या पुस्तकाचा त्यांचा अभ्यास अधिक सूक्ष्म झालेला असे. या गोष्टीचें काही प्रोफेसरांकडून कौतुक व्हावयाचें बाजूलाच राहून, त्यांच्यात मत्सराग्नि मात्र भडकूं लागला; त्याना जाणूनबुजून त्यांजकडून मागें ठेवण्यांत येऊं लागलें. अशा तऱ्हेच्या प्रसंगामुळें, त्याचप्रमाणें त्यांच्या लहरी व काहीशा विक्षिप्त वृत्तीमुळेंहि, ते विद्यार्थीसमाजांत चर्चेचा विषय बनले होते.

देवांच्या चाळींत राहावयाला आल्यावर त्यांचा एका सहाध्यायिनीशीं गाढ स्नेहसंबंध जुळून आला. ही सहाध्यायिनी त्या वेळच्या विद्यार्थीमंडळींत बुद्धिमती, रसज्ञ, साहित्य-संगीतकलेची भोक्ती, शिष्टाभिरुचिसंपन्न, सुधारणाप्रिय व वाक्चतुर म्हणून वाखाणली जाई. तिच्या चाहत्यांचें तिच्याभोंवतीं एक मंडळच निर्माण झालें होतें. तिच्या एका स्नेह्याच्याच शब्दात बोलावयाचें, तर तिचा तो एक ' दरबारच ' होता. या दरबारांतील माधवराव हे एक मानकरी होते. जूलियन अँडरले हें नामाभिधान त्यांना येथेंच प्राप्त झालें. या सहाध्यायिनीनेंच तें त्याना बहाल केलें होतें. पुढील काळांत, जुन्या स्नेहाची स्मृती म्हणून या नांवांतील जूलिअन हा भाग आपल्या नांवाला जोडून ते आपली कविता प्रसिद्ध करूं लागले. या दरबारांत

माधवरावांचा ज्या कांहीं व्यक्तींशीं—स्त्री व पुरुष—परिचय घडून आला त्यापैकीं कांहींशीं त्यांचे पुढें जिव्हाळ्याचे संबंध जडले. अपार्थिव, निरपेक्ष, निःस्वार्थी, विशुद्ध अशा प्रेमाच्या तत्त्वज्ञानाची संथा या दरबारांतच माधवरावांना पहिल्यानें मिळाली. स्त्री-पुरुषांमधील मैत्री, स्वामित्व व हक्क यांपासून जितकी अलिप्त असेल तितकी ती चिरंतन व चिरमधुर राहील; आणि अशा मैत्रींतच खऱ्या सुखाचा आस्वाद घेतां येईल, चैतन्यपूर्ण जीवन जगतां येईल, या विचारसरणीचें बीज माधवरावाच्या मनांत या काळींच पेरलें गेले. स्त्री ही पुरुषाची माता व मैत्रिण आहे; ही दुहेरी भूमिका जी स्त्री उत्तम रीतीनें पार पाडूं शकते तीच पुरुषावरील प्रेमाची पूर्तता करूं शकेल, या तत्त्वाचें दर्शन त्यांना येथेंच घडलें. माधवराव ज्या सहाध्यायिनीच्या दरबारांतील एक मानकरी बनले होते, ती सहाध्यायिनीहि या तत्त्वज्ञानाला प्रेरक झाली होती. तिनें त्यांना आपल्याकडे ओढून कांहीं दिवस प्रेयसी, तर काहीं दिवस भगिनी, तर काहीं दिवस माता, या नात्यांनीं प्रयोग केले. पण ही सहाध्यायिनी बुद्धिमान् असली तरी थोडीशी लहरी, अस्थिर, ज्याचा ज्या काळीं जसा प्रभाव पडेल तसें वळण घेणारी असल्यामुळें यापैकीं कोणतेहि प्रयोग यशस्वी होऊं शकले नाहींत. या सहाध्यायिनीवर त्या काळीं शेलीचें काव्य आणि मेरी कॉरेलीच्या कादंबऱ्या यांचा पगडा बसला होता. अपार्थिव प्रेमाचें गुणगान व त्याचे प्रयोग या पगड्याखालींच ती असताना घडत होते. माधवरावांच्या १९१३-१४ सालांतील कांहीं सुनीतांत या काळातील कांहीं पडसाद उमटलेले आहेत. 'आई हें पहिलेंच चुंबन तुझें कीं जे मला आठवे', हें एक अशा सुनीतांपैकीं आहे. 'तुटलेले दुवे' या सुनीतसंग्रहांतून, कथासूत्राला तें पोषक नसल्यामुळें असेल कदाचित्, तें गाळलें गेलेलें आहे. हें सुनीत खालीलप्रमाणें :

**आई, हें पहिलेंच चुंबन तुझें कीं जें मला आठवे,**
**याची शांत सुखानुभूति न कधीं जाईल चित्तांतुनी**
**डोळे उत्सुक आणि तोंड रडवें माझें बघोनी तुवां**
**खालीं वाकुन ओठ ते भिडविले डाव्या कपोलावरी.**
**"आशीर्वाद असे मदीय तुजला जा, बाळ जा त्या स्थळीं**
**जेथें अन्नऋणानुबंध असतो, जावेंच लागे तिथें;**

नेकीनें पण चाल नित्य; अमुची कांहीं नको काळजी
सर्वत्र प्रभु हा, तया जवळ घे ज्याला न आपंगिता."
ऐसें बोलुन तूं पुन्हां वठविलें भाळीं कृपाचुंबन,
अन् कांहीं तरि वर्णनीय न असें नेत्रांत तूझ्या दिसे;
माझे हात करून उंच तुझिया आई गळ्याभोंवतीं
प्रीतीचा विळखा, सुटो न कधिंही, ऐसा तदा घातला.
"देवा रे, म्हटलें मनीं, बिलगुनी मी घट्ट राहीं असा!
आईच्या पदराशिवाय जगिं या कोठें दुजा कोंवसा."

ही सहाध्यायिनी आणि माधवराव यांनीं या काळीं 'आई व मूल' हें नातें घेतलेलें होतें.[1] पुढें ती व तिच्या मैत्रिणी 'प्रेमयोगा'नें मोक्ष साधून देणाऱ्या एका तरुण, झोंकदार, आंग्लविद्याविभूषित नवयुगीन स्वामीच्या[2] कक्षेंत ओढल्या गेल्यामुळें निराळेच प्रयोग सुरू झाले. माधवरावांच्या मनावर त्यामुळें फारच मोठा आघात होऊन ते कांहीं काळ पूर्ण निराशाग्रस्त झाले. बाह्यतः ते शांत, गंभीर असे दिसत, पण त्यांच्या अंतःकरणांत विलक्षण अस्वस्थता माजलेली असे. त्यानीं आपल्या एका गजलांत वर्णिल्याप्रमाणें

स्वारस्य न तें राही, हो लुप्त जिगीषा ही,
नैश्चित्य नुरे कांहीं, गेलाच गमे मग्दूर.

अशी त्यांची अवस्था झाली होती. या अवस्थेंतून ते पुढें हळूहळू बाहेर पडूं लागले. आपण आपलें व्यक्तित्व व विवेकबुद्धि गमावून प्रवाहपतित बनलों आहों, याची जाणीव या वेळेस त्यांना तीव्रतेनें होऊं लागली. आपण ज्यांना आजवर आपले म्हणवीत होतों ते सर्व सखे-सोयरे, गुरुजन दूर दूर होत चालले आहेत; आपण सर्वांना नकोसे झालों आहोंत, ही काळीज करपून टाकणारी वस्तुस्थिति त्याचे नजरेस येऊं लागली; त्यांचें मन पस्तावूं लागलें. १९१४ च्या डिसेंबरांत,

---

[1] खानोलकर पत्रसंग्रह : माधवरावांचें पत्र, १७ जुलै, १९३१.

[2] या स्वामीजींचें दर्शन 'सुधारक' काव्यांत 'ॐकार स्वामी'च्या रूपानें त्यांनीं घडविलें आहे.

त्यांच्यामागें एक वर्ष असलेल्या शाताबाई हेर्लेकर बी. ए. ऑनर्स झाल्या. त्यांच्या या यशाबद्दल त्यांना आनंद झाला, परन्तु त्याच वेळीं, बेवकुफाप्रमाणें वागून आयुष्यांतील दोन अमूल्य वर्षें उधळून टाकल्याबद्दल मला पश्चात्ताप होत आहे,' [3] असे उद्गार त्याच्या तोंडून निघल्याशिवाय राहिले नाहींत. त्यानीं मनाचा निश्चय केला, कीं या परिस्थितीला आता आपण कलाटणी दिलीच पाहिजे. त्यांत काहीं कसूर झाली तर सर्वनाश ठरलेलाच. आपलें मनच आपले शत्रु बनले आहे; त्याला आपण आपलें मित्र बनवून आपल्या ध्येयसिद्धीचे कामीं निग्रहपूर्वक राबविलें पाहिजे.

देवाच्या चाळींतील त्याच्याभोवतालची मंडळी हळूहळू पांगूं लागली होती. तेथें भरणाऱ्या दरबाराचें, मुख्य अधिष्ठात्री देवता दूर गेल्यामुळें, विसर्जन झालें होतें. मनाच्या एकाग्रतेला बाध आणणारी प्रलोभनें जवळ जवळ नाहींशीं होऊं लागली होतीं. रेव्हरंड जॉन टॉडला त्यानी आपला मार्गदर्शक बनविलें; त्याचें 'स्टुडंट्स् मॅन्युअल' हें त्याचें बायबल बनलें. या 'मॅन्युअल' मधील सूचनांप्रमाणे त्यानीं आपला आयुष्यक्रम आखला आणि अभ्यासाशिवाय दुसऱ्या कसल्याहि गोष्टीकडे लक्ष द्यावयाचें नाहीं असा निश्चय केला. या निश्चयाचा भंग होण्यासारखे कांही प्रसंग मधूनमधून घडत. रा. वि. म. याना ता. २४–१–१९१५ रोजीं लिहिलेल्या एका पत्रात ते लिहितात, "गेले पंधरवड्यांत चित्ताचें स्वास्थ्य पार पळालें होतें. कोणाची कृतघ्नता, तर कोणाची अहृदयता, कोणाची स्वार्थपरायणता, तर माझा मी एकटा आहें ही भावना इत्यादि गोष्टींमुळें मानसिक वातावरण क्षुब्ध होऊन दररोजचा क्रम बिघडला होता." असे प्रसंग आले तर ते स्वतःच स्वतःला शिक्षा देत. वेताच्या काठीनें ते कित्येकदां स्वतःच्या शरीराला झोडपून काढीत. 'माझें जीवित म्हणजे एक कधींहि न संपणारी रात्र आहे" असा निराशाजनक विचार मनांत डोकावूं लागला कीं, अभ्यासाच्या टेबलावर टांगलेल्या रा. वि. म. चित्रित 'Not Failure but low aim is a Crime' या फलकाकडे ते पाहात, आणि तेथून खालीं टेबलावर असलेल्या, त्यांची मैत्रिण

[3] रा. वि. म. पत्रसंग्रह, क्र. ७६, ता. २० डिसेंबर, १९१४.

शातावाई हेर्लेकर यांनीं दिलेल्या, ‘ Time is money ’ हीं अक्षरें कोरलेल्या पेपरवेटकडे नजर टाकीत. आणि मग तो निराशेचा क्षण संपुष्टांत येई. ‘ छे, छे, निराशेच्या विचारांना मजकडे थारा मिळणार नाहीं. आपलें ध्येय कोणतें? तें साध्य करण्यासाठीं हा सोन्याच्या मोलाचा क्षण आपण वेंचला पाहिजे. रात्र काय अशीच राहाणार आहे? ती केव्हां तरी संपणार आणि सूर्योदय होणार. आपण झपाझप पाऊल टाकून मुक्काम गांठण्याचा प्रयत्न केलाच पाहिजे, ’ अशा विचारांचें प्राबल्य सुरू होऊन ते उद्योगाला लागत. त्यांनीं ‘ १९१४ सालच्या डिसेंबर महिन्यांत, फार्सीचे मराठीवर काय संस्कार झाले, या विषयावर पदवीधरीनंतर काम करावयाचें असें ठरवून, फार्सी हा ऐच्छिक विषय घेऊन पुनश्च अलिफ् बे पे पासून सुरुवात केली; आणि व्याकरण-कोशादि ग्रंथांना गुरु करून’ ते स्वावलंबी व्यासंग करूं लागले. याच सुमारास त्यांच्या गणित विषयाचे अध्यापक प्रो. पेंडसे यांना फार्सी भाषा शिकविण्याची त्यांजकडे कामगिरी आली. ती निर्दोषपणें पार पाडतां यावी यासाठी त्यांनीं अरबी भाषेचाहि व्यासंग सुरू केला. या सर्व परिश्रमांचें फळ त्यांना उत्तम प्रकारचें मिळालें. १९१६ च्या जूनमध्यें द्वितीय श्रेणींत ते बी. ए. ची परक्षिा उत्तीर्ण झाले.

माधवरावांचें मन आतां निरामय व सुस्थित होऊं लागून भावी आयुष्य-क्रमाबद्दल विचार करूं लागलें होतें.

# ४

# बडोद्यांतील काव्यसाधना व कविसहवास

"भद्रासनीं चित्ताचिया ही शोभते भक्तिप्रिया ;
सारें हिला अर्पूनिया मी पूजितों माझ्या घरीं."

माधवरावांच्या काव्यसाधनेला सुरुवात १९०९ पासून झाली. ते नुकतेच मॅट्रिकच्या वर्गांत गेले होते. त्यांचा आवडता हैमकोश–पाल्ग्रेव्हज् गोल्डन ट्रेझरी–वर्गांत शिकविला जात होता. वाडिया मास्तर या हैमकोशांतील कविता शिकवीत. कवितेचें विवरण ते सावेश व साभिनय करीत. वर्गांतील वातावरण त्यामुळें काव्यमय होऊन जाई. माधवराव तल्लीन होऊन जात. त्याच्या मनावर या विवरणाचा व तज्जन्य वातावरणाचा एवढा परिणाम झालेला असे, कीं शाळेंतून घरीं आल्यावर तशी पद्यरचना इंग्रजींत केल्याशिवाय त्याना चैन पडत नसे. वर्गांत, एकदा वाडिया मास्तरांनीं 'Pro Patria Mari' ही कविता शिकविल्याबरोबर त्यांनीं त्याच वृत्तांत, त्यांना उद्देशून, खालील ओळी रचल्या :

The Seed of my Muse was implanted in me
It was you that it cherished with care.

या वेळच्या आपल्या पद्यरचनेबद्दल त्यांनीं 'माझ्या आयुष्याचा माझ्या लेखनावर परिणाम'[1] या आपल्या लेखांत म्हटलें आहे कीं, "अनुकरणशीलता हा मनुष्याचा स्वभावच आहे. अभ्यासक्रमांतील सयमक पद्य वाचून थोडेंफार अनुकरण करण्याची स्फूर्ति बहुशः होते. मला प्रथम स्फूर्ति अशीच

---

[1] साप्ताहिक सकाळ, १५ मे, १९३४.

झाली. कविता ही चंद्राची बाधा असते असें म्हणतात; मी पहिली कविता मुख-चंद्रावर नव्हे, तर आभाळांतील खऱ्याखुऱ्या चंद्रावर केली. रात्रीच्या वेळीं मी एका संवगड्यासंगें बडोद्यास राजमहाल मैदानावर हिंडत होतों. गप्पा कशाविषयीं चालल्या होत्या तें आतां स्मरत नाहीं. परंतु मध्येंच मला पुढील ओळी स्फुरल्या :

Ah ! the Moon that shines bright
And gives in all our days delight,
... ... ... ... ... ... ... ... ... ... ... ...

"त्या वेळची माझी सारी रचना मी कितीहि नादावून केलेली असली तरी ती व्यर्थ, पोकळ प्रतिध्वनिरूप होती. ती अनुकरणात्मक होती. म्हणूनच इंग्रजींतून होत होती. त्यांतून मराठी ही मायबोली असली तरी तिच्याकडे स्वाभाविकपणेंच दुर्लक्ष होई. वर्गांत शिकावयाचे वामन–मोरोपंती वेंचे दुर्बोध असत आणि नीरस वाटत. मराठी विषय सरस करून विद्यार्थ्यांत चटक उत्पन्न करण्याचें सामर्थ्य त्या वेळच्या शिक्षकांत नसावें. मातृभाषेविषयीं अभिमान वाटण्याचें तें वय नव्हतें. त्यामुळें कुतूहलानें, समजो न समजो, जें कांहीं आम्ही वाचीत असूं तें इंग्रजी असे."

"इंग्रजींत पद्यरचना करण्याचा हा अस्वाभाविक छंद फार दिवस टिकला नसता. तशांत माझ्या एका मित्रानें, मराठींत पद्यरचना करणें हें माझें कर्तव्य आहे असें मला सांगितलें, आणि मित्राचें सांगणें म्हणून तें मला तत्काळ पटलें आणि मी उत्तर दिलें,

**माझ्या मित्रा, आतां माझ्याविषयीं धरूं नको शंका,**
**आपण एकमतानें एकबलें वाजवूं जगीं डंका.**

माझ्या कवितेंत टिमकीचा ध्वनि कां नसेना, पण सयमक रचनेच्या प्रभावानें तेव्हां अलौकिक आत्मविश्वास वाटे आणि तींत मला स्निग्ध गंभीर घोषणा ऐकूं येई. कविता नारायण वामन टिळकांच्या कवितेसारखी, सरळ, सुबोध असेल

तेवढीच वाचूं लागलों. 'मति–लता'[2] 'मुलें आणि फुलें,'[3] 'सृष्टी जेथें सुमनोहर'[4] या कविता तेव्हां रचिल्या. जाति 'चंद्रकांत' नाहींतर 'केशवकरणी' अशी सोपी गी घेई."

मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण होऊन महाविद्यालयांत (१९१०) गेल्यावर तर त्यांचे इंग्रजी कवितेचे वाचन विशेषच वाढलें. शेक्सपिअरच्या सुनीतांचीं त्यांनीं पारायणेंच केली होती. आणि जेव्हां एकदा वाडिया मास्तरांनीं सुनीताचें स्वरूप व त्याची रचना नीट समजावून दिली, तेव्हां तर त्यानी सुनीतरचनेचा तडाखाच लावला. ते इंग्रजीत व मराठींत सुनीतें रचूं लागले. याच वेळेस वयपरत्वें निर्माण होणाऱ्या एका मधुर हुरहुरीने त्याना पछाडलें. तिचें प्रकटन त्यांतून होऊं लागलें. त्याच्या अंतःकरणातील सारी तळमळ, साऱ्या नवांकुरित प्रणयभावना त्यांत ओतल्या जाऊं लागल्या. एका व्यक्तीविषयी त्यांच्या अंतःकरणांत जी मूक प्रीति वयाच्या तेराव्या वर्षापासून वसत होती, तिला वाचा फुटून ती त्यांतील काही सुनीतातून व्यक्त होऊं लागली. या व्यक्ती-बद्दलची त्याची भावना रामचंद्र विनायक मराठे यांना ता. ४ सप्टेंबर, १९१४ रोजी लिहिलेल्या एका पत्रांत त्यांनीं पुढीलप्रमाणें व्यक्त केली आहे: "वयाच्या तेराव्या वर्षी जिनें आपल्या विनयशील, सहज कोमल भावानें व हळूहळू उमलणाऱ्या बुद्धिमत्तेनें व निर्मल व प्रेमळ वर्तनानें माझ्या हृदयांत प्रेमजागृति केली त्या तुला ×× मी कसा विसरेन ? प्रियकराचें प्रियकरणीवर

[2] ही कविता उपलब्ध नाहीं.

[3] ही कविता रा. वि. म. याच्या पत्रसंग्रहात रक्षून ठेविली आहे. ती तयार झाली तेव्हां 'आनंद' मासिकाकडे पाठविली होती. 'सवडीप्रमाणें प्रसिद्ध होईल' असें मलपृष्ठावरील 'पोंचीं'त संपादकानीं आश्वासिलें असताहि ती पुढें कधीं प्रसिद्ध झाली नाहीं.

[4] ही कविता, चंद्रशेखरांशीं परिचय झाल्यावर त्यानीं नीट सुधारून 'मासिक मनोरंजन' मासिकाकडे पाठविली होती. पण तेथें वशिला लागला नाहीं.

प्रेम असतें त्या प्रकारचें तुझ्यावरचें माझें प्रेम नाहीं. तुला आज चार वर्षें आठ महिन्यानीं मा पुन्हा पाहात आहें. तूं मोठी दिसूं लागली आहेस; तुझें लग्न झालें आहे, तथापि तूं व मी दोघेहि अजून लहानच आहोंत असें मला वाटते. ×××× च्या मेळ्यांत रात्री आपण एकमेकांचा हात धरून पुस्तकातल्या आता क्षुल्लक वाटणाऱ्या गोष्टी त्या वेळीं किती आवडीनें सांगत हिंडत होतों तें मी कधींच विसरणार नाही. या जीवितसागरांत लाटाबरोबर वहावत चाललों असतां काहीं दिवस आपण बरोबर होतों. आतां आपली ताटातूट झाली आहे. पुन्हा कधी तरी, कुठें तरी आपण भेटूं. तोंपर्यंत तुला सुख, शांति, आरोग्य, प्रेम हीं मिळोत !" वर्णानें श्यामल, नाकाडोळ्यांनीं नीटस, बुद्धीचे तेज डोळ्यात विलसत असलेली, अत्यंत प्रेमळ व स्मितवदना अशी ही व्यक्ति होती. एका सुशिक्षित, वाङ्मयाभिरुचिसंपन्न अशा कुटुंबातील ती होती. माधवरावाना ती आपली जीवनसखी व्हावी असें फार वाटे. पण द्रव्याभाव व भिन्न पोटजात हीं त्या सख्याच्या आड आलीं. आणि माधवरावाच्या साऱ्या प्रेमभावना अंतःकरणातल्या अंतःकरणातच राहिल्या. त्या केव्हा तरी उसळी घेऊं लागल्या कीं, खालील सुनीतासारख्या सुनीतातून त्या व्यक्त होत.

**लागावें सुख थोडकें तरि मला × × तुझ्यापासुनी**<br>
**यासाठींच रहस्य मी हृदयिंचें नाहीं तुला सांगत;**<br>
**मूकप्रीति धरी न काय फुसक्या शब्दांहुनी योग्यता ?**<br>
**आहे काय नफा ? कशास उघडा ही मूठ जी झांकली ?**<br>
**पाणी येथ असे, नसे, समजती भूगर्भशास्त्रज्ञ ते**<br>
**माझी प्रीति कळावया बहु तुला आहेत रस्ते तसे;**<br>
**डोळ्याच्या कधिं कोपऱ्यांत लपला अर्धा तुला दीसतो**<br>
**प्रेमस्मारक अश्रुबिंदु ? कुठुनि ? तूं अज्ञ, भोळी प्रिये ?**<br>
**जेव्हां मी तुज पाहिलें प्रथम त्या वेळीं मला वाटलें**<br>
**जन्मींचें गत आपुल्या खचित गे नातें असे शाश्वत;**<br>
**मी राहीन मुका परंतु अजुनी; कैशी पुन्हां पेटवूं**<br>
**ती ज्वाला भडका जिनें करुनियां केली पहा राख ही !**

**थंडी फार पडून छेडिल तुला वारा यदा चावरा**
**घे माझ्या हृदयांतली प्रियतमे, ही शेगडी तूं तदा ! [५]**

माधवरावांचें कवितालेखन स्वयंप्रेरणेनें सुरू झालें; कोणा तत्कालीन कवीच्या कविता वाचून किंवा एखाद्या कविश्रेष्ठाचा सहवास घडून तें झालेलें नाहीं. प्रा. रा. श्री. जोग [६] "मराठी कवितालेखनाबद्दलची त्यांची आवड अंकुरित होऊन तिचें संवर्धन होण्यास चंद्रशेखर कवीच प्रामुख्यानें कारणीभूत झाले असावे, असें त्यांनीं स्वतःच 'चंद्रशेखरा ! तव कवितारति परी मला झुकवी' असें जें म्हटलें आहे त्यावरून वाटतें;" असा जो तर्क करतात तो बरोबर नाहीं. चंद्रशेखरांशीं त्यांची ओळख १९११ त केव्हांतरी झाली. तत्पूर्वींच ते कविता लिहूं लागले होते. १९०९–१० सालांत त्यांनीं लिहिलेल्या कविता त्यांनीं स्वतःच, त्या पूर्णपणे व्यक्तिविषयक असल्यामुळें, नष्ट केल्या. पण त्याचे उल्लेख रा. वि. म. यांस त्यांनीं लिहिलेल्या कांहीं पत्रांत आढळतात. ता. २१ जानेवारी, १९१२ च्या एका पत्रात ते लिहितात, "माझ्या कांहीं कविता मला नकोत. तुला हव्या असल्यास जवळ ठेव. 'कवीची संक्रांत', 'कवीची भाऊबीज' व 'सुखाची जागा' या त्या होत. शिवाय तुला 'गोपीचें गाणें', 'चंद्रास', 'प्रियेस' पाठवीत आहें. शेवटच्या दोन लवकर परत पाठविणें. पहिलीवर आपलें मत स्पष्ट कळीव. कविता प्रसिद्ध होण्यासाठीं पाठवूं नकोस. जी प्रसिद्ध करावयाची ती कविता असली पाहिजे. ती म्हणजे लोकांना आवडेलच असें नाहीं. मी लोकासाठीं लिहीत नाहीं — कोणासाठीं लिहितों तें मी मेल्यावर कळेल. माझ्या अनेक कविता व्यक्तिविषयक आहेत. पैकीं माझीं जीं रहस्यें तुला माहीत आहेत त्यांतील 'कवीची भाऊबीज' ही एकच होय. माझ्या ×× च्या आत्म्यास प्रेरणा

---

[५] 'तुटलेले दुवे' यांत हें सुनीत बराच बदल करून (क्र. ११) देण्यांत आलेलें आहे. 'आशान्तक्षण दूर दूरच असो तो माझियापासुनी' या ओळीनें या सुनीताची सुरुवात होते.

[६] अर्वाचीन मराठी काव्य, पृ. १७७.

कल्पून गेल्या वर्षी भाऊबीजेच्या दिवशीं संध्याकाळीं ७ वाजतां मी ती कविता लिहिली ! बाकी कविता यथातथाच आहे."

माधवरावांनीं स्वतःच स्वतःच्या काव्याला प्रेरक कोण होत असतें, हे एका सुनीतांत पुढीलप्रमाणें सांगितलें आहे.

"होई वस्तु असंख्य सुंदर जरी काव्यकृतिप्रेरक
होई प्रेरक गे स्मृतीच मजला तूझी मनोवेधक;
त्या पुण्यस्मृतिभोंवतीं विरचितों शृंगार रंगीत मी
लोभे पाहुनि थाटमांड जन, मी गौरीच चित्तीं नमीं."

माधवरावांची काव्यप्रेरणा स्वतंत्र असली तरी, त्यांच्या विपुल कविता-लेखनाला त्यांच्या काहीं मित्रांचें प्रोत्साहन हें मात्र विशेष कारण झालेलें आहे. रामचंद्र विनायक मराठे (रा. वि. म.), श्रीधर रामजी शिंदे व विठ्ठलराव घाटे हें मित्रत्रय त्यांपैकी मुख्य होय. मराठे पुण्यास व घाटे इंदुरास शिक्षणाकरितां असत, परंतु परस्परांत नियमितपणें पत्रव्यवहार चाले; एकमेकांस एकमेकांच्या कविता धाडल्या जात, त्यांवर परस्परांत चर्चा होई. मराठे व घाटे कविता लिहीत, पण त्या कधीं तरी, सटींसामासीं. माधवरावानाच अधिकत्वानें कविता लिहावयाला लावावयाच्या व त्याच्या रसग्रहणांत आनंद मानावयाचा ही वृत्तीच प्रामुख्यानें या दोघाची असे. शिंदे त्या वेळेस बडोद्यासच असत. त्यांना त्या वेळेस नुक्तीच न्यायखात्यांत नोकरी लागली होती. तेहि 'सरस' या टोपण नांवानें कविता लिहीत. केवळ हौसेखातर त्यांचें हें कवितालेखन असे. ते बडोद्यातच असल्यामुळें माधवरावांचा आणि त्यांचा नित्य सहवास घडे. माधवरावांनीं नवीन कविता लिहिली कीं, तिचें पहिलें वाचन शिंद्यांकडेच व्हावयाचें. भावनेच्या भरांत माधवरावांचें कित्येकदा भाषेकडे दुर्लक्ष होई. जें कांहीं सांगावयाचें, प्रगट करावयाचें तें अर्धवट सांगितलें जाई किंवा प्रगट केलें जाई. शिंदे या गोष्टी त्यांच्या नजरेला आणून देत, कवितेचें परिष्करण करावयाला लावीत आणि दोघांचेंहि समाधान झालें म्हणजे तिला पूर्णत्व येई.

शिंदे यांच्याशीं माधवरावांचा परिचय १९१२ सालीं झाला. हेर्लेकर कुटुंबाशीं शिंदे यांचे जिव्हाळ्याचे संबंध होते. सौ. काशीताईंना ते आपल्या आईप्रमाणें मान देत. माधवराव देवांचे चाळीत राहावयास आले त्याच सुमारास एल्.एल्. बी. ची परीक्षा देऊन ते चार वर्षांच्या मध्यंतरानंतर बडोद्यास राहावयास आले होते. हेर्लेकर कुटुंबाच्या जागेच्या शेजारींच त्यांची खोली होती. माधवरावाशीं त्यांची पहिली ओळख सौ. शांताबाई कशाळकर (हेर्लेकर) यांच्यामुळें झाली. "आमच्या कॉलेजांतील एक स्कॉलर आणि प्रतिभावान् कवि", असा त्यांचा त्यांच्याशी परिचय करून देण्यात आला. शिंदे सांगतात, "गोरागोमटा, सतेज, पाणिदार डोळयांचा तो मुलगा पाहून प्रथमदर्शनीच माझें त्याच्याबद्दल चांगलें मत झालें; आणि पुढें त्याच्या कविता वाचून, त्याच्या आणि माझ्या प्रेमविषयक कल्पनांत आणि त्या मांडण्याच्या पद्धतींत साम्य आढळल्यामुळें, आम्हीं एकमेकाशीं अधिक जवळ आलो. ते माझ्याहून जवळ जवळ नऊ-दहा वर्षांनीं लहान असतां समान विचारसरणीमुळें त्याच्यामाझ्यांत ज्येष्ठ–कनिष्ठ असा भाव राहिला नाहीं. परिचय अधिकाधिक वाढत गेल्यानंतर ते आमच्या कुटुंबांतीलच एक बनले. माझ्या आईची त्यांच्यावर माझ्याइतकीच माया होती आणि माझ्या मुलांना ते आपले खरोखरीचेच काका वाटत. एरव्हीं संकोची स्वभावाचे असलेले माधवराव, आमच्या घरीं पूर्ण मोकळेपणानें वागावयाचे. बडोद्यास असतांना एखादी नवीन कविता लिहिली की ते लगेच माझ्याकडे येत; वेळाकाळाचेहि त्यांना भान नसे. प्रारंभीं माझ्या पत्नीचा यामुळें त्याजवर एक वेळ घुस्साहि झाला होता; पण पुढें त्यांची बालकवृत्ति तिच्या लक्षांत येऊं लागताच ते केव्हांहि घरीं आले, तरी तिला किंवा घरांतील कोणाहि माणसाला कांहीं वाटेनासें झालें; उलट सर्वांना त्याचें कौतुकच वाटूं लागलें. माधवराव हे कधीं वृद्ध होतील असें मला त्या वेळेस तरी वाटलें नाहीं. त्यांची ती शुद्ध, निरागस बालवृत्ति अखेरपर्यंत तशीच राहणार असा माझा विश्वास असे. पण या विश्वासाला पुढें डेक्कन एज्युकेशन सोसायटीनें सुरुंग लावला व तो पार उध्वस्त केला. एके सकाळीं डोक्यावरचे सारे केस पिकून माधवराव मनानें व वृत्तीनें वृद्ध झाले. खऱ्या यौवनावस्थेंतून ते गेलेच नाहींत. ह्या यौवनाची मत्त, मादक माधुरी त्यांना कधींच चाखतां आली नाहीं, नव्हे ती तशी चाखावयाला त्यांना अवकाशच मिळाला नाहीं."

## बडोद्यांतील काव्यसाधना व कविसहवास

माधवरावाच्या बडोद्यातील काव्यसाधनेच्या काळात शिंदे यांनीं त्यांच्या मनावर व काव्यप्रतिभेवर जे संस्कार केले त्याचें महत्त्व खुद्द माधवरावांना किती वाटे, याची कल्पना त्यानी आपलें 'सुधारक' काव्य त्याना अर्पण करताना जे उद्गार काढले आहेत त्यावरून येते.

माधवरावांचे जें एक विशिष्ट प्रेमविषयक तत्त्वज्ञान होतें तें स्थिर आणि पक्कें होण्यास शिंदे यांचें बौद्धिक साहचर्यच बव्हंशीं कारण होतें. माधवराव ज्या ज्या वेळी आपल्या तत्त्वज्ञानापासून च्युत झालेले त्याना आढळत, त्या त्या वेळीं गोरोबा कुंभाराप्रमाणें, डोक्यातील कच्चेपणा घालविण्यासाठीं टीकेच्या थापट्या त्याजकडून बसावयाच्या. अशाच एका प्रसंगीं त्यांनीं खालील कविता लिहिली.

### To M. T. P.

प्रीतिचारण प्रीतिभक्त तुज म्हणती प्रीतीचा वेडा ।
वेड कोणत्या परिचें हें परि, तुझा स्वभावच हा तेढा ॥
प्रेमा उपमा दिल्यास कसल्या हिणविलेंस तूं प्रीतीला ।
विसरुनि कृतज्ञता, दुर्गंधी वाहिलींस कुसुमें तिजला ॥
जात कोणती या भक्तीची ही तव विरोध-भक्तिच ना ।
राम-रावणीं पुराणींच ती शोभे, आतां मान्य कुणा ? ॥
देव न पावे म्हणुन सजावा भक्तच मूर्ति भंगाया ।
कृती तुझी ही तशिच भासते न दिसे दुसरी उपमा या ॥
विलोल भंगुर समुद्रवीची मिथ्या आकृति नभांतल्या ।
क्षण-तेजस्वी चंचल विद्युत् उपमा कोठुन या सुचल्या ॥
स्थिर शाश्वत सत्य प्रीतीला दिधली त्वां तेजोनिधीला ।
दूषणमाला ही बघ माझ्या पोळितसे गा हृदयाला ॥
जें जें गेलें नाश पावलें कधिं न तेंच परतुन आलें ।
यांत काय तूं नवें कथियलें! प्रेम परि कधीं विनाशलें ? ॥
नाश पावतो प्रेमाभासच प्रेमाला नाहीं नाश ।
होता नुसता जर आभासच होऊं दे त्याचा नाश ॥

# माधव जूलियन

प्रेम खरें जर असेल तें निष्कारण हो न उदास ।
नच नभ उजाड उल्कापातें न खपेच सुपुष्प-सुवास ॥

क्षमा माग तर तूं प्रीतीची मिळेल ती तुजला खास ।
स्तुतिपाठक, गा पुन्हां स्तुतीला, येऊं दे तुज उल्हास ॥

२७–५–१९१३

माधवरावांनीं नैराश्याच्या कोणत्या तरी एका क्षणीं प्रेम हा निव्वळ भ्रम आहे, तें निव्वळ स्वप्न आहे, तो केवळ आभास आहे, विद्युल्लतेप्रमाणें क्षणिक दिपवून नाहींशी होणारी ती आहे, क्षणांत उमटून नष्ट होणारी ती एक केवळ भावनेची लहर आहे, असे उद्गार एका कवितेंत काढलेले होते. ती कविता वाचून, त्यांना वळणावर आणण्यासाठीं शिंदे यानीं लिहिलेली ही कविता आहे. माधवरावांनीं लिहिलेली कविता उपलब्ध नाहीं. कदाचित् ती नष्टहि करण्यांत आली असेल. शिंदे यांनीं खरी प्रीति कोणती या संबंधींच्या आपल्या कल्पना 'प्रीतीचा शोध' या आपल्या कवितेंत खालील-प्रमाणें व्यक्त केल्या आहेत.

शशि पावे उच्च पदातें
कुमुदिनि सौख्यभरें हसते;
अधोगती त्याची बघतां
तन्मुख कोमेजुनि जातें. १

चंद्रागमनीं सुख झालें
हृदय उदधिचें उचंबळे;
विधुगमनीं त्या दुःख अती
शोकरसाची ये भरती. २

चंद्र तयाचा कोण असे ?
मनीं अपेक्षा काय वसे ?
निर्हेतुक आहे सगळें
कां, कसें, न हें मुळीं कळे. ३

क्वचित् उपजुनि ही वृत्ती
हृदयें अन्योन्यीं जडती,
भिन्नत्वाला आंचवलीं,
जशा नद्या संगमकालीं. ४

बंधुभगिनी हा भाव नको
आर्द्रत्वाचें नांव नको.
लग्नविधि तिथें कशा हवा ?
युक्तायुक्त विचारहि वा ? ५

निज सुखाभिलाषा लपली
अन्योन्यसुखीं लोलुपलीं
सात्त्विक प्रेमरसें भिनलीं
निरपेक्षत्वें शुद्ध भलीं. ६

**अगम्य दैवी शक्तिच या**
**एकवटवि गमते हृदया**
**या वृत्तीला म्हणूं जरी**
**अल्पनाम हें प्रीति खरी. ७**

**परमावधि ही प्रीतीची**
**त्यांत तिच्या सत्यत्वाची.**
**जोड न इजला जगिं दुसरी,**
**प्रीति खरी ही प्रीति खरी. ८**

माधवरावाचीं स्फूर्तिस्थानें, काहीं टीकाकार फार्सी, इंग्रजी आणि गुजराती वाङ्मयात पाहाण्याचा प्रयत्न करीत असतात. हा प्रयत्न फोल आहे. माधवरावांचीं स्फूर्तिस्थानें निर्जीव ग्रंथांत सांपडणार नाहींत, तीं सर्व दृष्टीने जिवंत असें ज्याना म्हणतां येईल, अशा काहीं व्यक्तींतच पाहावीं लागतील. इंग्रजी काव्याची गोष्ट सोडून दिली, तर फार्सी किंवा गुजराथी काव्याबद्दल त्यांना आकर्षण असे कधींच नव्हतें. ते फार्सी भाषेचे पदवीधर व अध्यापक होते, त्याचप्रमाणें त्याचें गुजराथेत प्रारंभींचें आयुष्य गेलें, यावरूनच केवळ काहीनीं हा सुतानें स्वर्ग गांठण्याचा प्रयत्न केला आहे. आमच्या विद्वानांना, एखादी व्यक्ति आपल्या स्वतंत्र प्रज्ञेने कवि, कादंबरीकार, कथाकार, नाटककार होऊं शकेल असा विश्वासच वाटत नाही. त्यांच्या वाङ्मयवैशिष्ट्याचा अभ्यास करण्यापेक्षां त्याच्या लेखनाचे 'उद्गम' आणि 'स्फूर्तिस्थानें' धुंडाळण्यांतच त्यांची बुद्धि अधिक खर्ची पडते. डॉ. केतकरांसारख्या स्वतंत्र प्रज्ञेच्या व विशाल बुद्धिमत्तेच्या व्यक्तीला 'महाराष्ट्राचा डॉ. जॉन्सन' म्हटल्यानें आपण त्याचा केवढा मोठा गौरव केला असें वाटून यांची छाती अभिमानानें फुगते. पण तेंच एखाद्या, इंग्रजीचें दडपण स्वतःवर पडूं न दिलेल्या स्वतंत्र दृष्टीच्या टीकाकारानें, 'मोठमोठी सैन्यें हालविणारा आणि लढाया मारणारा नेपोलियन अगर शिकंदरासारखा सेनापती आणि आपल्या गल्लींतील आखाडा चालविणारा आणि बक्षिसाच्या कुस्त्या खेळणारा पेशा पहिलवान यांत जे अंतर तेंच केतकर आणि जॉन्सन यांत होतें. जॉन्सन हा केतकरांच्या पासंगालाहि पुरणार नाहीं', असें म्हणतांच हे मूर्च्छा येऊन पडतात. आमच्या विद्वानांची ही अशी अवस्था आहे. यांचे 'दृष्टिकोन', यांचीं 'मूल्यें', यांच्या 'कसोट्या' या परक्यांकडून घेतलेल्या उसनवार चीजा असतात. यासाठी नवीनानी, यानीं लढविलेल्या तर्कांचा, प्रतिपादलेल्या सिद्धान्तांचा आणि केलेल्या भाष्यांचा स्वीकार स्वतंत्रपणें छाननी करून, मगच केला पाहिजे.

माधवरावांची बडोद्यातील काव्यसाधना ही आत्मप्रकटीकरणाच्या तळमळीमुळें सुरू झाली, आपण कवि व्हावें या आकांक्षेनें नव्हे. योगायोगानें समान छंद असलेली मित्रमंडळी त्याना लाभली, चंद्रशेखरासारख्या ईश्वरोपासनेइतकीच काव्योपासना 'पवित्र व अगत्याची' मानणाऱ्या काव्योपासकाचा सहवास त्यांना घडला. या योगायोगामुळें त्याची प्रतिभा अधिकाधिक पल्लवीत झाली.

चंद्रशेखरांचा प्रथम परिचय विठ्ठलराव घाटे याजमुळें झाला. विठ्ठलराव, चंद्रशेखराचे जिवलग स्नेही दत्त कवि याचे चिरंजीव; त्यामुळे त्यांज-विषयींचें चंद्रशेखरांना अगत्य अधिक. चंद्रशेखरांचें त्या वेळचें बडोद्यातील जीवन जवळ जवळ एकाकी असें होतें. क्वाचितच ते समाजात मिसळत. त्याचा परिचय फारसा कोणाला नसे. आणि ज्याना तो थोडासा असे त्याना ते 'आहे एक तऱ्हेवाईक काव्यवेडा इसम' असेंच वाटे. अशा या काव्यवेड्याच्या एकाकी आयुष्यात घाटे, माधवराव आणि त्याची मित्रमंडळी पहिल्यानेंच आली. श्रद्धापूर्वक त्याच्याबरोबरच काव्यानंदात डुलणारे श्रोते त्यांना मिळाले; समानशील, समव्यसनी व्यक्तींच्या सहवासाच्या अभावीं कित्येक वर्षें दडपून राहिलेली त्याची वाक्गंगा दुथडी भरून वाहू लागली. श्रोते अवाक् होऊन त्यात निमज्जन करूं लागले. या श्रोत्यांनी त्याची आणि तत्कालीन लेंभे, मोगरे, टिळक, दत्त, विनायक, गडकरी, बालकवि इत्यादि कवींची कविता उत्सुकतेनें वाचली होती, पण ती रचणाऱ्या कवींचें मन कसें संस्कारक्षम व रसिक असतें हें प्रत्यक्ष पाहिलेलें नव्हतें, अनुभविलेलें नव्हतें; चंद्रशेखरांच्या रूपानें त्याना तें पाहावयाला मिळालें, अनुभवितां आलें.

चंद्रशेखराचा माधवरावाना अविच्छिन्न असा तीन वर्षें सहवास घडला. या काळात त्यांच्या ज्या बैठकी झाल्या त्यांत त्यांनीं त्याच्या तोंडून संस्कृत व मराठी कविता बरीच ऐकली; काव्यकला, काव्यशास्त्र यावरील विचार ऐकले, कवितेचें रसग्रहण कसें करावें हें त्यांजकडून समजून घेतलें; प्रत्यक्ष त्यांच्या कवितेच्या वाचनानें व त्यावरील चर्चेनें 'रचना निर्दोष व सफाईदार असावी, आणि शब्दाची योजना करितांना त्याच्या नादमाधुर्यापेक्षा अर्थानुकूलतेकडे

अधिक लक्ष असावें', या दोन गोष्टी त्याच्या मनावर बिंबल्या. चंद्रशेखराच्या सहवासाचें त्याच्या काव्यसाधनेंतील महत्त्व एवढ्यापुरतेंच आहे.

चंद्रशेखराच्या कवितेचें वास्तविक स्वरूप काय आणि अर्वाचीन कवितेंत तिचें स्थान कोणतें हें त्यानी त्या काळांतहि नीट ओळखलें होतें. रा. वि. म. यांना १९ फेब्रुआरी १९१३ रोजीं लिहिलेल्या एका पत्रात ते लिहितात :

"रा. चंद्रशेखर हे जुने कवि व नवे कवि याना जोडणारा दुवा आहेत; आणि हा संबंध लक्षात आल्याशिवाय त्याच्या कवितेंतलें पूर्ण रहस्य आत्म्यावर प्रतिबिंबित व्हावयाचे नाही. शब्दलालित्य, साधे पण उन्नत विचार, नाद व अर्थ याचा संयोग, प्रौढी, गंभीरता यांनी याची कविता 'वाचनीय' झाली आहे. आपले पुरातन आचार, विचार, धर्म, महात्मे, थोरवी, सुधारणा, तीर्थे, स्थलें इत्यादिकाविषयी वाटणारा पूज्य अभिमान याच्या कवितेत जितक्या जोरानें व नव्या शब्दात दाखविला गेला आहे तितका, मला दुसरीकडे कोठेंच दिसत नाहीं. दिक्कालानीं अप्रतिहत अशी याची कल्पना नसो, पृथ्वीवर प्रगतिपर क्राति घडवून आणण्याचें सामर्थ्य याच्या तुतारींत नसो; परंतु याच्या वाणींत कधीं न मरणारें हृदय आहे, आत्मिक ओज आहे."

माधवराव चंद्रशेखर या व्यक्तीचे व त्यांच्या कवितेचे चाहते होते, अंधभक्त कधींहि नव्हते. त्यामुळें ते कित्येकदां स्पष्टपणें आपले विचारभिन्नत्वहि त्याचे-पाशीं बोलून दाखवीत. चंद्रशेखराना तें तितकेसे रुचत नसावें असें दिसतें. आणि त्यामुळेंच कांहीं काळ त्यांच्यात आणि माधवरावात द्वैत उत्पन्न झालें. हें द्वैत जाऊन पूर्ववत् सख्यत्व राहावें यासाठीं माधवरावानीं अनेक प्रयत्न केले. ता. ८ सप्टेंबर, १९१४ रोजीं त्यानीं त्याना अत्यंत नम्रतापूर्वक पुढीलप्रमाणें पत्र लिहिलें. या पत्रांत चंद्रशेखरांबद्दलच्या त्यांच्या सर्व भावना व्यक्त झाल्या आहेत :

"पूज्य बापूसाहेब, मी आपल्या येथें येऊन भेटून गेल्याला १५ महिने होऊन गेले. या अवधींत आपण दोन-तीनदा मला रस्त्यांत भेटलां. दोन्ही तिन्ही वेळां मी आपणांस सहजस्फूर्तीनें व अत्यादरानें प्रणाम केला. त्या त्या वेळच्या चमत्कारिक तोंड करण्यानें व तुम्हांला माझा वीट आला आहे असें

दाखविण्यानें मला — राग मुळींच नव्हे, कारण आपण वडील आहां – किती वाईट वाटलें असेल याची आपणाला कल्पना तरी होते काय ? तुमची कविता मी चाहून गुणगुणावी व तुमची आठवण मला होऊं नये हें शक्य तरी आहे काय ? आपण दोघानी कविता वाचण्यात व वाद करण्यात जे दिवस व ज्या रात्री घालविल्या त्यांचे स्मरण नष्ट कसें होईल ? उत्पन्न झालेला स्नेहभाव असें होऊं देईलच कसें ? बापूसाहेब, एका थोर पुरुषाशीं माझा दाट परिचय झाला व तदनंतर त्याचें व माझें पटेनासें झालें ही गोष्ट माझ्या काळजाला लागून राहिली आहे. माझी चूक असल्यास क्षमा करा म्हणून मी आपणांस विनंती केली; परंतु आपला मजवरचा राग अजून कमी झाला नाहीं हें दुर्दैव म्हणावयाचें; दुसरें काय ? तुमच्या विषयीं माझ्या मनांत कधींहि पापविचार आले नाहींत हें आपणास शपथेवर सांगतों. तथापि माझें म्हणणें आपणास खरें वाटत नसल्यास आपण मला लहान समजून माफी करा, असें माझें पुन्हां सांगणें आहे."

"बापूसाहेब, मी आपली खुशामत करीत नाहीं. आपला मजविषयींचा गैरसमज दूर व्हावा या हेतूनें मी आपणास हें पत्र लिहीत आहें. मृत्यूच्या दारीं देखील मी असेंच म्हणेन कीं, चंद्रशेखराशीं मी कपटानें, वाईट हेतूनें कधींच वागलों नाहीं. सर्वथैव जरुरी अशी कुणाचीच कुणाला नसते; परंतु खऱ्या भावानें जोडलेला दुवा तुटला म्हणजे जो विषाद होतो तो मरेपर्यंत तरी कमी होत नाहीं हे खास ! मलाहि अशाच प्रकारची रुखरुख लागून राहिली आहे. आपण थोर मनानें मला बरोबरीच्या नात्यानें वागवूं लागला; पण मी आपणांशीं बरोबरीच्या नात्यानें वागावयाचें नव्हतें, परंतु हें मला आज कळत आहे. पूर्वी कळतें तर मजकडून प्रमाद घडते ना व आपला मजवरचा लोभहि उडता ना ! यापुढें मात्र मी ही गोष्ट विसरणें शक्य नाही."

"आपले दोघांचे आचारविचार काहीं बाबतींत भिन्न आहेत; असेत ना बापडे ! आपल्या दोघात जर सहिष्णुता आहे तर त्या भिन्नतेचें चालणार तरी काय ? कवितेसंबंधी आपलें अगदीं एकमत नाहीं. नसेना, तेवढ्यानें आमच्या स्नेहसंबंधास बाध यावा काय ? मी म्हणतों, कधींच येऊं नये."

"आपणाविषयीं व आपल्या कवितेविषयीं मला फार आदर वाटतो. पूर्वी वाटत होता तितकाच, कदाचित् आज अधिक वाटत आहे, पुढेंहि वाटत

राहील. मजकडून नकळत निघालेल्या शब्दांनीं तुम्हाला दुखविलें आहे, हें मी कबूल करतों. या चुकीची दुरुस्ती आपलें क्षमाशील मन करील अशी मला आशा आहे. तर बापूसाहेब, आपण राग कमी करा व माझ्याशीं पूर्वींप्रमाणें व्यवहार ठेवा; याप्रमाणें आपल्या मनाची प्रवृत्ति झाल्यास आपण मला वर लिहिलेल्या पत्त्यावर मेहेरबानी करून कळवाल ना?"

चंद्रशेखरांनीं या पत्राचें उत्तर पाठविलें नाहीं. त्यांच्या मनांतील अढी बराच काळपर्यंत राहिली. माधवरावांवर झालेल्या अनेक आघातांत या आणखी एका आघाताची भर पडली.

माधवराव अशा रीतीनें चंद्रशेखरांच्या प्रत्यक्ष सहवासाला कांहीं काळ मुकले, तरी त्यांना त्यांच्याबद्दलचा वाटणारा आदर केव्हांहि कमी झाला नाहीं. १९२२[1] सालीं डेक्कन कॉलेजांत शारदोपासक मंडळापुढें प्रो. श्री. नि. चाफेकर यांच्या अध्यक्षतेखालीं त्यांनीं 'चंद्रशेखर आणि त्यांची कविता' या विषयावर दिलेलें व्याख्यान हें त्याचें प्रत्यक्ष उदाहरण होय. हें व्याख्यान पुढें निबंधरूपाने 'नवयुग' मासिकात आणि 'काव्यचर्चा' या पुस्तकांत प्रसिद्ध झाले. चंद्रशेखरांच्या कवितेकडे नव्या पिढीचें त्यामुळें बरेंच लक्ष वेधलें. हें व्याख्यान दिलें त्याच्या आदल्या वर्षीं 'चंद्रशेखर व गोदागौरव' या नांवाचा त्यानीं एक लेख तयार केला होता. त्या वर्षीच्या ऑक्टोबर महिन्यांत ते हा लेख घेऊन चंद्रशेखरांच्या भेटीस गेले होते. बडोद्याहून रा. वि. म. यांना लिहिलेल्या[2] पत्रांत त्यांनीं या भेटीसंबंधानें पुढीलप्रमाणे लिहिलें आहे: "बडोद्यास गेलों त्याच्या दुसऱ्या दिवसापासून कविवर्य चंद्रशेखरांची भेट घेण्यासाठीं जोराचा प्रयत्न केला. अगोदर त्यांच्या राहात्या घराचा कोणी पत्ता देईना. अखेर सकाळीं दुपारीं असे तीन-चार हेलपाटे झाल्यावर सलाटवाडा व कुंभारवाडा यांच्या नाक्यावर एका घरीं त्यांची भेट झाली. 'चंद्रशेखर व गोदागौरव' या मथळ्याचा मी जो लेख लिहिला आहे, त्याचा उल्लेख करून, ज्या ६०-६५ ओळी मला मुखोद्गत आहेत त्या शुद्ध करून देण्याची व त्या छापण्यास

[1] ११ सप्टेंबर, १९२२.  [2] १ नोव्हेंबर, १९२१.

परवानगी देण्याची मी त्यांस सविनय विनंती केली. दुसऱ्या दिवशीं शुद्ध करून देण्याचें त्यांनीं कबूल केलें. माझा लेख त्यानीं वाचला आणि त्या लेखांतील सकारण स्तुती व गुणदोषविवेचन हें पाहून ते खूष झाले. त्यांच्या आठवणीप्रमाणें मला येत असलेल्या ओळी त्यांनीं शुद्ध करून दिल्या. नंतर 'वनवासांतील सुखें' हें आपलें अगदीं अलीकडलें काव्य सविवेचन वाचून दाखविलें. 'काय हो हा चमत्कार' या, मागें नवयुगांत प्रसिद्ध झालेल्या, कवितेसंबंधीं महत्त्वाची माहिती दिली. चहापान झालें. मजा आला! 'वनवासांतील सुखें' याची स्वतःजवळची एकुलती एक प्रत अत्याग्रहामुळें 'विविधज्ञानविस्तारा'च्या ज्युबिली ग्रंथासाठीं त्यांनीं दिली. पुढें ग्रंथ प्रसिद्ध झाल्याचें त्यांना कळलें नाहीं. विविधज्ञानविस्ताराच्या व्यवस्थापकांनीं ग्रंथाची प्रतहि त्यांस पाठविली नाहीं. पाठविलेल्या पत्रास जबाब नाहीं. तेव्हां आपली कविता गहाळ झाली असें वाटून ते फार कष्टी झाले आणि आठवून आठवून त्यांनीं पुन्हां एक प्रत तयार केली. त्या प्रतीवरून त्यानीं तें काव्य मला वाचून दाखविलें."

१९२१ सालीं झालेल्या या भेटीमुळें व पुढें १९२२ सालीं दिलेल्या व्याख्यानामुळें चंद्रशेखरांचे माधवरावासंबंधीं झालेले गैरसमज दूर झाले. आपण समजत होतों तसे माधवराव आपले विरोधी टीकाकार नाहींत याबद्दल त्यांची खात्री झाली आणि हळूहळू त्यांची त्याविषयींची मनांतील अढी गेली. पूर्वीच्या मोकळेपणानें दोघेहि एकमेकांशीं वागूं लागले. या नंतर आठ वर्षांनीं, १९२९ सालीं माधवराव आपल्या पत्नीसह बडोद्यास गेले असतां चंद्रशेखराच्या भेटीला मुद्दाम होऊन गेले. 'माधवरावांना पाहून चंद्रशेखरांना फार आनंद झाला. व ते जागेवरून धांवतच माधवरावांच्या जवळ आले व त्याचे दोन्ही हात धरून त्यांनीं त्याना आपल्याजवळ मोठ्या प्रेमानें बसवून घेतलें.' माधवरावांनीं आपल्या पत्नीची ओळख करून दिली व 'लीलाबाईंना तुमचा गोदागौरव ऐकण्याकरितां मी येथें घेऊन आलों आहें' असें म्हटलें. त्यावर चंद्रशेखरांनीं 'गोदागौरवां'तील कांहीं भाग मोठ्या आनंदानें म्हणून दाखविला. चंद्रशेखर तो म्हणत असतां इतके तन्मय झाले होते कीं, त्यांच्या डोळ्यांतून एकसारखा अश्रुप्रवाह चालला होता. चंद्रशेखर माधवरावांना म्हणाले,

'माधवराव, तुम्ही आणि घाटे गेलां आणि तेव्हांपासून बडोद्याची मजा गेली.'[3] १९३२ साली चंद्रशेखराचा 'चांद्रिका' हा काव्यसंग्रह मुंबईच्या भारतगौरव ग्रंथमालेतर्फे नरसिंह चिंतामण केळकर यांच्या अध्यक्षतेखालीं मोठ्या समारंभानें प्रसिद्ध करण्यात आला. या समारंभास माधवराव व विठ्ठलराव घाटे हे मुद्दाम उपस्थित राहिले व दोघांनींहि आपली आदरांजलि त्याना अर्पण केली. चंद्रशेखराना त्या दिवशीं कृतार्थता वाटली; ते सद्गदित झाले. आपल्या दोन पूर्वसंबंधि चाहत्याना तेथें उपस्थित पाहून त्याचा ऊर अभिमानानें भरून आला.

चंद्रशेखरानीं माधवरावांची कविता बरीच उशीरा वाचली असावी असें दिसतें. त्यांचें 'विरहतरंग' त्यानीं १९३४ सालीं वाचलें. या काव्यांतील वर्णनांवर ते खूष असत. माधवरावांना त्यानीं त्यासंबंधीं स्तुतीपूर्ण असें पत्रहि लिहिलें होते. माधवरावांच्या अंगावर त्यामुळें मूठभर मांस चढावें यांत काय नवल ! [४]

माधवरावाचा बडोद्यातील काव्यसाधनेचा काळ १९०९–१६ हा होय. या आठ वर्षांत त्याच्या हातून विपुल कवितालेखन झाले. 'मी व माझे टीकाकार'[५] या आपल्या लेखात या कालातील आपल्या कवितालेखनासंबंधीं माधवरावानीं पुढीलप्रमाणें हकिगत सांगितली आहे.

"टीकाकाराशीं माझा संबंध फार उशीरा, म्हणजे मी कविता करूं लागल्या-नंतर १२–१३ वर्षांनीं आला. तोंपर्यंत मी माझ्या कविता माझ्या दोन तीन

[3] आमची अकरा वर्षें, पृ. ८८.

[४] माधवराव, प्रस्तुत लेखकाला कोल्हापुराहून ता. ११–४–१९३४ रोजीं धाडलेल्या पत्रात लिहितात: "श्रीयुत चंद्रशेखर लवकरच मुंबईला येणार आहेत. ते तुम्हाला भेटतीलच. त्यांनीं मला सहकुटुंब त्यांना भेटण्यासाठीं मुंबईस बोलाविलें आहे. परंतु सध्यां तरी आमचा पाय कोल्हापुरांतून निघूं शकत नाहीं. त्यानीं आपल्या पत्रांत 'विरहतरंगां'तील वर्णनांविषयीं जे गुणग्राहकतेचे शब्द लिहिले आहेत त्यांकरितां मी फार आभारी आहें. त्यांच्या प्रशंसेनें मूठभर मास आलें."

[५] ज्योत्स्ना मासिक, एप्रिल, १९३७.

स्नेह्यांना दाखवीत असें; आणि ते सहनशीलतेनें जें माझें थोडेंबहुत कौतुक करीत तेवढें माझ्या उत्तेजनाला पुरें होई. स्नेह्याचे साहित्यदोष दाखविण्याचें काम मोठें बिकट नि हळवें असल्यानें ते आपला अभिप्राय स्थूलमानानेंच प्रगट करीत. अर्थात, माझ्यांत दोष कोणते आहेत आणि वाङ्मयांत सुंदर नि परिणामकारक काय असतें हें माझें मलाच इतर ललित कृतींशी तुलना करून ठरवावें लागे. याप्रमाणें पहिला टीकाकार माझा मीच झालों. माझे मीच दोष दाखवीत असल्यानें लिखाणाचें शुद्धीकरण नि परिष्करण करण्यांत मला एक प्रकारचें समाधानच वाटे. या परिश्रमाची उपयुक्तताहि मला अनुभवानें पटली."

"नवलेखकाला, आपलें लिखाण मुद्रित स्वरूपात लोकापुढे यावें अशी स्वाभाविक इच्छा असते, तशीच ती मलाहि होती. नवकवीला त्याचे लिखाण प्रकाशित करून उत्तेजन दिल्याचें श्रेय घ्या अशा विनंतीचीं पत्रें मी संपादकांना लिहिलीं नाहींत असें नाहीं. पण माझ्या सुदैवानें त्या पत्रांना चिंध्यांच्या टोपलींत स्थान मिळालें. १९१२ मध्यें काहीं कविता मी मनोरंजनादि मासिकाकडे पाठविल्या, त्या साभार परत आल्या. मासिकांतून सामान्यतः प्रकाशित होणाऱ्या कविताहून वाईट त्या मुळींच नव्हत्या. परंतु संपादकाशीं माझी ओळख नव्हती; आणि केवळ पत्रद्वारा कार्यभाग व्हायला मी काहीं स्त्री म्हणजे विदुषी नव्हतों; मी कांहीं पदवीधर वकील किंवा प्रोफेसर नव्हतों. मी तेव्हां केवळ एक अज्ञात विद्यार्थी होतों. तथापि संपादकांनीं माझ्याकडे दुर्लक्ष केलें तें परिणामीं हितकारकच ठरलें. प्रकाशनापेक्षां परिष्करणाचें महत्त्व मला अधिक वाटूं लागलें. १९१६ मध्यें माझी 'निशिगंधाची फुलें' ही कविता काहीं कारणानें 'काव्यरत्नावलीं'त प्रकाशित झाली तेव्हाहि अशा कविताचा जनतेला आतां कंटाळा आला आहे, असें जें संपादकांनीं मला स्पष्ट लिहिलें तें माझ्या पथ्यावरच पडलें. आपल्या महाविद्यालयाच्या नियतकालिकांत कांहीं थोड्या कविता देण्यापलिकडे माझी प्रकाशनपिपासा उरलीच नव्हती."

माधवरावाचें कवितालेखन, आत्मरंजन आणि आत्माविष्कार यासाठींच प्रामुख्यानें होत असल्यामुळें, प्रकाशनाची संधी मिळत नाहीं म्हणून तें कधीं

थांबलें नाहीं. कोकिळेचें कूजन, मयुराचें नृत्य, पुष्पाचा सुवास, निर्झराची नादमधुर खळखळ हीं जितकीं स्वाभाविक तितकेंच माधवरावाचें कवितालेखन स्वाभाविक होतें. श्रोत्याची आणि रसिकाच्या आग्रहाची वा प्रशंसेची त्याला आवश्यकता कधीं भासली नाहीं. ते जसे स्वतःच स्वतःचे टीकाकार असत, तसेच ते स्वतःच स्वतःच्या कविताचे श्रोतेहि असत. त्यांनीं स्वतःच आपल्या एका कवितेंत म्हटल्याप्रमाणें:

> मनांत गाणें स्वयेंच जागें; न सूर मागें, न ताल लागे;
> प्रफुल्ल व्हावें नवानुरागें, स्फुरूनि गावें खगाप्रमाणें.

अशी त्याची वृत्ति होती.

# ५

# रात्र संपत चालली

बी. ए. च्या परीक्षेनंतर एक-दोन महिने, एप्रिल-मे, त्यांनीं पारडी, गोरेगांव, महाड, भोर, पुणें वगैरे ठिकाणच्या प्रवासांत घालविले. अभ्यासाचा काच आता थोडा कमी होऊन त्यांच्या डोक्यावरचा बऱ्याच वर्षांचा भार हलका झाला होता. प्रवासात टॉलस्टॉयची 'ॲना कॅरेनिना' ही कादंबरी, 'सुखावरोहण' हें फार्सी काव्य आणि मोर्लेनें लिहिलेलें 'ग्लॅडस्टनचें चरित्र' ही त्यांनीं वाचलीं. कवितालेखनहि थोडेंसें झालें. स्नेही व नातेवाईक यांच्या सहवासात त्यांचे हे दोन महिने सुखाचे गेले; त्यांचें मन उल्लसित व आशामय बनलें.

जून महिन्यांत परीक्षेचा निकाल लागून आपण पास झाल्याचें कळतांच ते पूर्वनिश्चयाप्रमाणें एम्. ए. च्या अभ्यासास लागले. कुठें तरी नोकरी पत्करून त्यांना हा अभ्यास करावयाचा होता. बऱ्याच खटपटीनंतर बडोद्यास महाराणी चिमणाबाई हायस्कूलमध्यें त्याना द. म. ५० रुपये पगाराची शिक्षकाची नोकरी मिळाली. मॅट्रिक्युलेशनच्या वर्गाला फार्सी व पाचव्या इयत्तेला इंग्रजी व गणित असे विषय ते शिकवीत. वयाच्या मानानें ते त्यावेळेस थोडेसे पोरसवदा दिसत, त्यामुळें शाळेच्या मुख्याध्यापकांना 'ते मुलांना शिकवितील कसें' यापेक्षां 'मुलावर त्याचें वजन पडेल कसें' याचीच काळजी प्रारंभीं अधिक वाटत होती. त्यांनीं माधवरावांना त्यासाठी, 'तुम्ही टोपी बदलून रुमाल अगर पागोटें घालाल काय?' असें विचारलेंहि. माधवरावानीं त्याला नकार दिला, पण तडजोड म्हणून सुचविलें कीं, 'आपण वाटल्यास टर्किश फर कॅप वापरूं' आणि 'शिघ्र दिसावयाचें आपल्याकडे लागलें', असेंहि आणखी आश्वासन दिलें. आपल्या वर्गावर त्यानीं चांगलीच छाप बसविली होती. पण एक दिवस

त्यांना मॅट्रिकच्या वर्गावर जाण्याची पाळी आली. ते लिहितात [१] : "वर्गांत माझ्या वामनमूर्तीचें वजन कसें पडावें? मी घाबरलों; मुलें गडबड करूं लागलीं. दोन-तीन मिनिटें गेल्यावर मी कविता शिकवूं लागलों. माझ्या मतें मला नीटसें साधलें नाहीं. परंतु मुलांनीं मात्र सबंध तासात हूं का चूं केलें नाहीं. माझें काम झालें." या शाळेंत येणाऱ्या मुलांचा बौद्धिक दर्जा फारसा समाधानकारक नसावा असें दिसतें. ते या नंतरच्या एका पत्रात लिहितात, "माझ्या वर्गांतील बहुतेक विद्यार्थी दगड आहेत. टाकीचे घाव मारल्यास कांहींतून साधारण बरी अशी मूर्ति निघेल अशी मला उमेद आहे. कांहींवर टाकीचा परिणाम होईल कीं नाहीं याची शंका आहे. कांहीचा टाकीच्या घावानें चुराडा होण्याचीच मला भीति वाटते." या शाळेत त्यांचें मन फारसें रमलें नाहीं असें दिसते. एक वर्षभर त्यांनीं कशीबशी येथें नोकरी केली. मध्यंतरीं सुरतेच्या कॉलेजांत फार्सीच्या प्राध्यापकाच्या जागेसाठीं त्यांनी खटपट चालविली होती, पण ती यशस्वी झाली नाहीं.

१९१७ च्या उन्हाळयांत, त्याना आत्मनिरीक्षण करावयाला लावणाऱ्या दोन घटना घडल्या. शाताबाई हेर्लेकर याचा विवाह आणि लक्ष्मीबाई चौधरी यांचा आजार. शांताबाई या त्याच्या अनेक वर्षांच्या सहविद्यार्थिनी व मैत्रीण. दोघानीं मिळून एकत्र अभ्यास केलेला. इंटरमीजीएट परीक्षेंत गणित विषय कच्चा राहिल्यामुळें त्या जेव्हां एक वर्षी नापास झाल्या, तेव्हां माधवरावांनीं अतिशय परिश्रमानें त्याजकडून तो विषय तयार करून घेतला व पुढील वर्षी त्यांना त्यांत यश मिळवून दिलें. शांताबाई त्यांना थट्टेनें 'गणितज्ञ' कवि म्हणून संबोधित. माधवरावांना शांताबाईंची बुद्धिमत्ता, त्यांची उदार व मोकळी वृत्ति याबद्दल विशेष कौतुक असे. शिक्षण आणि समाजसेवा यासाठींच त्या आपलें पदवीधरीनंतरचें आयुष्य, अविवाहित राहून घालवितील अशी त्यांच्या आईची व पुष्कळ सुधारकाची अपेक्षा होती. त्याचा या उन्हाळयांत सिव्हिल मॅरेज ॲक्टप्रमाणें कशाळकर या गृहस्थाशीं विवाह झाला. हा आंतरजातीय विवाह होता. या विवाहानें त्या

[१] रा. वि. म. पत्रसंग्रह, क्र. १५, ता. ९ आगष्ट, १९१९.

काळीं बरीच खळबळ उडाली होती. माधवरावांना मात्र साभिमान आनंद वाटला. आपल्या मैत्रिणीनें सुधारणेचीं तत्त्वें प्रत्यक्ष आचरणात आणलीं याबद्दल त्याना कौतुक वाटलें. मात्र शांताबाई एवढी मोठी उडी घेतील असें त्यांना वाटलें नव्हतें. त्याच्यासंबंधींच्या त्यांच्या अपेक्षा कांहींतरी वेगळ्या प्रकारच्या होत्या असें दिसतें. रा. वि. म. यांना लिहिलेल्या पत्रात ते म्हणतात : ‘ आपल्या इच्छा कांहीहि असल्या तरी दुसऱ्याच्या सौख्याचा हेवा करणें हीनतेचें लक्षण आहे. सर्वसाधारणपणें मला या विवाहामुळें संतोषच वाटतो व वधुवराना सुख व समृद्धि लाभो असें मी इच्छितो ’. या विवाहानिमित्त चहापानाचा जो समारंभ झाला त्याला ते अगत्यपूर्वक हजर राहिले. आज या गोष्टीचें कोणाला फारसें महत्त्व वाटणार नाहीं. पण, ज्या काळांत, पोटजातींतील विवाहसुद्धां भयंकर रूढिभंजक वाटत, त्या काळांत एका सुशिक्षित ब्राह्मण मुलीनें एका सुवर्णकार तरुणाशीं विवाहबद्ध होणें ही रूढीप्रिय समाजावर कमी आघात करणारी गोष्ट नव्हती.

याच सुमाराला, जिला ते वडिलकीचा मान देत आणि जिचें सागणें त्यांनीं कधींहि अवमानिलें नाहीं, अशा त्यांच्या मैत्रीण व सहाध्यायिनी लक्ष्मीबाई चौधरी ह्यांना क्षयाची भावना झाली. शांताबाई आणि लक्ष्मीबाई या एकमेकींच्या जिव्हाळ्याच्या मैत्रिणी. एकमेकी एकमेकींना कधींहि न विसंबणाऱ्या. पण पुढें एकमेकींत द्वैत उत्पन्न झालें. त्यात आणखी प्रेमनिराशेची भर पडली. लक्ष्मीबाईंच्या मनावर व शरीरावर त्याचा झालेला परिणाम पाहून माधवराव खिन्न होत. एक मैत्रीण नव्या आशादायी आयुष्यक्रमाला सुरुवात करते व दुसरीच्या आयुष्याची, आशेला स्थान न राहिल्यामुळें ‘ जिवींची साद घालावी, कुणीहि साथ ना द्यावी ’ अशी स्थिति झाल्यामुळें, अखेर होण्याची पाळी येते हीं दृश्यें पाहून ते बेचैन होत, आणि नियतीच्या अतर्क्य लीलेबद्दल विचार करूं लागत. त्याच्या कांहीं तत्कालीन सुनीतावर या विचाराची अस्पष्ट अशी छाया पडलेली आढळते.

लक्ष्मीबाई माधवरावाना आपला धाकटा भाऊ समजत, त्याचीं सुखदुःखें आस्थेनें समजून घेत, भावनेच्या भरात त्यांच्या हातून कांहीं चुका झाल्या तर त्या त्याना न दुखवितां त्यांच्या दृष्टीला आणून देत, किंवा त्यांचा लहरीपणा

मर्यादेबाहेर जाऊं लागला तर तो आटोक्यांत ठेवण्याचा प्रयत्न करीत. माधवरावांना त्यामुळें लक्ष्मीबाईबद्दल फार आदर वाटे. आणि या वाटत असलेल्या आदरामुळेंच, १९१७ च्या उन्हाळ्यांत, कांहीं दिवस आपला अभ्यास बाजूला ठेऊन, कार्ला येथील आरोग्यनिवासात लक्ष्मीबाई रुग्णाइत होऊन पडल्या असतां, त्याच्या शुश्रुषेला ते जाऊन राहिले.

कार्लें येथें ते जवळ जवळ दीड महिना होते. तेथील निसर्गरम्य व शात वातावरण त्याना आवडलें. पण त्यांच्या मनाला मात्र स्वस्थता मिळाली नाही. कार्ल्याच्या एकान्तांत, आपण मिळविलें काय आणि गमविलें काय याचा ते विचार करूं लागले. ‘मिळविण्यापेक्षा गमावलेंसच फार. आरोग्य, तडफ, तीन बहुमोल वर्षे, महाविद्यालयीन मानसन्मान, जीवनांतील आनंद उपभोगण्याची उत्कट इच्छा, ही सारीं गमावलींस. थोडीशी वरवर आपुलकी दाखविणारी मित्रमंडळी मिळविलीस, पण जिवाचा सखा असा कोणी जोडला नाहींस. आयुष्याची उधळपट्टी केलीस. मृगजळामागून तूं धावत होतास. ओलावा मिळेल असे तुला वाटलें होतें. पण तो तुला मिळाला नाहीं. सारी माया. सारा भ्रम. पण हें तुला कळायला सात वर्षांचा काळ जावा लागला. तुझे मित्र काय किंवा तुझ्या मैत्रिणी काय, आपापल्या मार्गाला लागलीं, आयुष्यात स्थिर झालीं आणि तूं अजूनहि अस्थिर, अशात, अनिकेत असा भ्रमत आहेस.’ त्याचें मन त्याना असें सागूं लागे. रा. वि. म. यांना कार्ल्याहून लिहिलेल्या एका पत्रांत ते म्हणतात: “समाजांत सर्वसामान्य माणसाप्रमाणें वागावयाचें असेल तर, काहीं वर्षे पूर्ण एकान्तात घालवून मनाला कसल्या ना कसल्या तरी उद्योगांत गुंतविलें पाहिजे. घर किंवा संसार थाटण्याची कल्पनाच तूर्त सोडून दिली पाहिजे. गृहसुख हें आपल्या नशीबीं नाहीं. त्याची अपेक्षा करणें चुकीचें आहे. कित्येकदां वाटतें कीं, आपल्या असाधारण महत्वाकांक्षाच आपल्याला असुखी करीत आहेत. त्या सोडल्या तर कदाचित् सुख लागेलहि. पण मग मन कशावर पोसलें जाईल? वेड किंवा आत्महत्त्या यांचा विचारहि शिवूं नये, यासाठीं केवढे जबरदस्त प्रयत्न मला करावे लागतात!” [२]

[२] रा. वि. म. पत्रसंग्रह, क्रमांक १००, १५ मे, १९१७.

कार्ले येथील मुक्कामात त्यांच्या मनांत हे असें आंदोलन चाललें होतें.

*　　　*　　　*

१५ जूनच्या सुमारास ते कार्ल्याहून वसईस गेले. तेथें त्यांचे स्नेही नीळकंठ कर्वे यांचे वडील मामलतदार होते. त्याजकडे एक आठवडाभर राहून ते बडोद्यास गेले. अभ्यासाला त्यांनीं पुन्हा जोराने सुरुवात केली. मनाला आतां दुसरी कसलीहि व्यग्रता नको म्हणून अन्य कोणत्याहि गोष्टीचा विचार करावयाचा नाहीं या निर्धारानें त्यांनीं वाचनाला सुरुवात केली. पण त्यांना स्वास्थ्य कुठलें मिळावयाला ! घरच्या मंडळींनें, विशेषतः त्यांच्या आत्याबाईंनीं, त्यांच्या लग्नाचा प्रश्न उपस्थित केलाच. ते बी. ए. झाले होते. आणि नोकरीहि करूं लागले होते. आता त्यांच्या कसल्याच सबबी चालण्यासारख्या नव्हत्या.

आत्याबाईंची इच्छा अशी कीं, त्यानीं लग्न करून कुटुंबांत येऊन राहावें. माधवराव कुटुंबाच्या पोषणाची जबाबदारी घ्यावयास तयार होते, पण कुटुंबांत राहावयाला तयार नव्हते. पूर्वानुभवावरून, कुटुंबात राहिल्यानें आपल्यालाहि सुख लागणार नाहीं आणि कुटुंबातल्या माणसांनाहि लागणार नाहीं, अशी त्यांची ठाम समजूत होती. ते म्हणत, ‘ आपण लग्न करूं. पण तें आपल्या विचाराने व पसंतीनें करूं. आपल्याला पसंत असलेली मुलगी कदाचित् विधवाहि असेल किंवा परजातीचीहि असेल. ’ आत्याबाईंना हें पसंत कसें पडणार ! मग माधवरावानीं त्यातून एक तोड काढिली; ‘ आपण ब्राह्मणाची मुलगी निवडूं पण ती कोकणस्थच असावी असा आग्रह कोणी धरता कामा नये. ब्राह्मणातील पोटजातींपैकीं कोणत्याहि पोटजातींतून आपण निवड करूं. ’ याहि तडजोडीला आत्याबाई किंवा घरातील मंडळी तयार होईना. ‘ कुलाला कलंक लागण्यासारखी ही गोष्ट होईल , आम्हीं आमची संमति देऊंच शकत नाहीं ’ असाच सर्वांचा जबाब आला. ‘ मग हा लग्नाचा लकडा मी माझ्या मागें लावून घेऊं इच्छित नाहीं. तुमच्याबद्दलचीं माझीं जीं कांहीं कर्तव्यें आहेत तीं मी तुमच्यापासून दूर राहिलों तरी बजावीन. त्यात कसूर करणार नाहीं. पण आतापर्यंत ज्या सामाजिक वा धार्मिक विचार-सरणीचा मी पाठपुरावा करीत आलों, तिला विसंगत असें वर्तन करणार

नाहीं" माधवरावानीं त्यांना असें स्पष्टपणें सागितलें. आणि अशा रीतीनें, वारंवार उपस्थित होणारा त्याच्या लग्नाचा प्रश्न कांहीं काळ स्थगित झाला.

* * *

ते दिवस पहिल्या महायुद्धाच्या ऐन धामधुमीचे होते. 'तरुणांनो, लष्करात शिरा, लष्करी शिक्षण घेण्याची आलेली संधी साधा', अशा घोषणा पुढाऱ्यांकडून होत होत्या. पुष्कळ तरुणानीं त्या संधीचा फायदा घेतलाहि. माधवरावाच्या मनांत आपण कांहीं काळ, अभ्यास बाजूला ठेवून लष्करात शिरावें असें येत होतें. "मी अशक्त आहें, तथापि जर सरकार सहा महिनेपर्यंत युद्धशिक्षण देऊन लढाईस पाठवील तर मी आनंदानें रणांगणावर देह ठेवण्यास तयार होईन' असें ते म्हणत.

माधवराव बडोद्यास यानंतर फार दिवस राहिले नाहींत. लक्ष्मीबाई चौधरी यांचे एक मेहुणे ठाकूर बलदेवप्रसाद कोटा संस्थानात कस्टम्स सुपरिंटेंडेंट होते; त्यांच्या आग्रहावरून त्याच्या मुलाचे शिक्षक म्हणून ते त्याजकडे आक्टोबर महिन्यात गेले. डिसेंबर अखेरपर्यंत ते कोटा येथें होते.

कोटा येथें असतां, पंडित शिवप्रसाद या नांवाच्या एका गुर्जर साहित्यिकाशीं त्याचा परिचय झाला. चरित्रवाङ्मयाचा अभ्यास आणि चरित्रलेखन याची त्याला आवड होती. 'भारतनो स्त्रीरत्नो' या नावाचें त्याचें पुस्तक, 'सस्तुं साहित्य कार्यालया'नें प्रसिद्ध केलें होतें. अर्वाचीन काळातील थोर व प्रसिद्ध स्त्रियांविषयीं काळजीपूर्वक माहिती मिळवून त्यानें हे पुस्तक सजविलें होतें. या पुस्तकाप्रमाणेंच गेल्या दीडशें वर्षांतील थोर भारतीय पुरुषाचीं चरित्रें संकलित केलेला ग्रंथ रचण्याची त्याची मनीषा होती. कस्टमखात्यातील आपली नोकरी संभाळून तो आपला व्यासंग निष्ठेनें चालवी. त्याचा बंगाली भाषेचा आणि वाङ्मयाचा अभ्यास चांगला होता. शिवप्रसादाच्या व्यासंगी वृत्तीचें माधवरावाना फार कौतुक वाटे; आणि आपल्यातहि अशी वृत्ति बाणेल तर आपण अनेक मानसिक त्रासांतून मुक्त होऊं असे त्यांना वाटूं लागे. 'शिवप्रसादासारखेंच असें एखादें काम आपण हातीं घ्यावें कीं, ज्यांत आपले

सारें चित्त अनेक वर्षेपर्यंत गुंतवून ठेवितां येईल" असा विचार त्यांच्या मनांत येऊं लागला होता.

पंडीत शिवप्रसादाच्या सहवासांत माधवरावाचे कोटा येथील दिवस बरे गेले. दोघेहि रोज एकत्र फिरावयास जात. त्याच्या साहित्यविषयक अनेक गप्पा होत. विशेषतः बंगालमधील प्रसिद्ध व्यक्तींविषयीं शिवप्रसाद जेव्हां गोष्टी सांगे तेव्हां या गप्पांना विशेषच रंग चढे.

शिवप्रसादाच्या संगतींत कोटा, त्याचप्रमाणें त्याच्या सीमेवरील संस्थानांतील अनेक ऐतिहासिक स्थळें त्यांनीं पाहिलीं. पूर्ववैभवाची साक्ष देणारीं तीं स्थळें पाहून माधवरावांच्या वृत्ती थरारून जात. त्या त्या स्थळांशीं निगडीत असलेल्या अनेक भूतकालीन घटनांच्या स्मृतींत त्यांचें मन दंग होऊन जाई.

कोटा येथें असताना माधवरावानीं बरींच प्रेमगीतें लिहिलीं. जुन्या मराठी शब्दाचा उद्धार करून ते कवितेंत वापरण्याला यावेळेपासूनच त्यांनीं प्रारंभ केला. या आपल्या प्रेमगीतासंबंधीं व त्यात वापरलेल्या जुन्या शब्दांसंबंधीं ते रा. वि. म. याना लिहितातः "माझ्या प्रेमगीतावर अभिप्राय देण्याचें तूं का टाळीत असतोस तें मला कळत नाहीं. मी हीं गीतें रिकामपणाचा उद्योग म्हणून किंवा वाङ्मयक्षेत्रात झळकावें या हेतूनें काहीं लिहीत नाहीं. मला जेव्हां लिहावें असें वाटते तेव्हांच लिहितों. या गीतांतून माझे काहीं अनुभव, माझीं काही निरीक्षणे आणि ध्येयें मी व्यक्त करीत असतों. ही प्रेमगीतें निदान शुष्क, निःसत्व तरी तुला वाटणार नाहींत खास ...... मी हल्लीं कवितातून फार्सी शब्द वापरूं लागलों आहें, हें तुला तसेंच अनेकजणांना आवडणार नाहीं. हल्लीं, आवश्यकता असो वा नसो प्रत्येकजण–अर्धशिक्षितसुद्धां–संस्कृत शब्दांची जी गर्दी करीत आहे तें मला निषेधार्ह वाटतें. या लोकांना संस्कृत भाषा अवगत असावी, पण स्वतःच्या मराठी भाषेशीं मात्र यांचा नीट परिचय नसावा याबद्दल त्यांची मला कींव येते. आणि त्याची प्रतिक्रिया म्हणून मी फार्सी शब्द वापरूं लागलों आहें. अर्थात् हे शब्द अस्सल नाहींत. मराठी बोलींत कित्येक शतकें दृढमूल झालेले व महाराष्ट्राच्या कांहीं भागांत अद्यापहि वापरांत असलेले, पण सुशिक्षितांना, जुन्या मराठी वाङ्मयाचा त्यांचा अभ्यास नसल्यामुळें

अज्ञात असलेले हे शब्द आहेत. किती साधे, सुटसुटीत, सुलभतेनें भावार्थ व्यक्त करणारे असे हे शब्द आहेत! मला ते झांकलेल्या रत्नाप्रमाणें वाटतात."

कोट्याला माधवराव डिसेंबरअखेर राहिले. मलेरियाची सांथ तेथें जोरानें सुरू होती. बडोद्यासहि प्लेग वाढत्या प्रमाणावर होता. त्यामुळें यांपैकीं कोणत्याहि ठिकाणीं न राहातां ते १९१८ चे जानेवारींत मुंबईस आले. एम्. ए. च्या परीक्षेला आतां अवघे तीन महिने राहिले होते. कोठेंतरी एका ठिकाणीं स्थिर होऊन एकचित्तानें अभ्यास करणें भाग होतें. एल्फिन्स्टन कॉलेजांत त्यांनीं यापूर्वींच आपलें नांव नोंदलें होतें. या कॉलेजांतील फार्सी भाषेचे अध्यापक प्रो. सर्फराज व मौलवी आब्बास यांनीं त्यांना अभ्यासांत मदत करण्याचें आश्वासन दिलें होतें.

मुंबईस कोळ्याचे वाडींत, रामभाऊ मराठे यांचे थोरले बंधु भगवंतराव बिऱ्हाड करून असत, त्यांजकडे ते येऊन राहिले. भगवंतराव, त्यांच्या पत्नी अनसुयाबाई व त्यांच्या मातोश्री यांनीं त्यांची त्या दिवसांत अतिशय काळजी घेतली. त्यांच्या स्वास्थ्याच्या दृष्टीनें त्यांनीं केव्हांहि त्यांचें कांहीं कमी पडूं दिलें नाहीं. आजपर्यंतच्या कोणत्याहि परीक्षांच्या वेळीं, या खेपेइतकें मनाला समाधानांत ठेवणारें स्वास्थ्य त्यांना मिळालेलें नव्हतें. माधवराव, या मंडळीनें घेतलेल्या श्रमांचा पुढच्या काळांत नेहमीं कृतज्ञतापूर्वक उल्लेख करीत. ज्या खोलींत ते अभ्यासाला बसत असत त्या खोलीबद्दलहि त्यांना प्रेम वाटे. भगवंतरावांचें बिऱ्हाड या वाडींत असेपर्यंत, ते ज्या ज्या वेळीं मुंबईस येत त्या त्या वेळीं या खोलीला एकदां तरी भेट दिल्याशिवाय राहात नसत.

एप्रिलच्या पांच तारखेस त्यांच्या परीक्षेचा निकाल जाहीर झाला. ते एम्. ए. दुसऱ्या वर्गांत पास झाले. त्या वर्षीं फार्सी विषय घेऊन एम्. ए. ला तीनच विद्यार्थी बसले होते, त्यांपैकीं माधवराव हे एकटेच पास झाले. त्यांच्या परीक्षकांनीं आपल्या अहवालांत त्यांच्या फार्सी भाषेच्या प्राविण्याविषयीं अनुकूल अभिप्राय नमूद करून ठेविला होता. या अभिप्रायाचा त्यांना पुढें फर्ग्युसन कॉलेजांत फार्सीच्या प्राध्यापकाची जागा मिळविण्याचे कामीं चांगला उपयोग झाला.

## माधव जूलियन

माधवरावांच्या आयुष्यग्रंथाचें एक पर्व संपून, नव्या पर्वाला आतां प्रारंभ होऊं घातला होता. रात्र संपत आली होती. तांबडें फुटूं लागलें होतें. उत्सुक अंतःकरणानें ते प्रकाशाकडे पाहात होते. अंगाखांद्यावर खेळूं लागलेल्या प्रभात-किरणांबरोबरच, त्यांच्या अंतःकरणांत आशेचे नवे किरण चमकूं लागले होते. आंत आणि बाहेर उल्हासाचें कोवळें ऊन्ह पसरूं लागलें होतें.

# ६

## पुण्यांत

चार वर्षांपूर्वी अभावितपणें मनांत उद्‌भूत झालेली ती आकांक्षा आज खरोखरच फलद्रुप होत होती. रा. वि. म. ना १९१४ सालीं त्यांनीं, ‘ फर्ग्युसन कॉलेजांत फार्सी भाषेचा अध्यापक होण्याची माझी आकांक्षा आहे ’, असें एकदां सहजच पत्रांतून लिहिलें होतें. त्यावेळेस केवळ एक स्वप्नवत् वाटणारी ती आकांक्षा आज सत्यस्वरूपांत अवतरली होती. माधवरावांना पुण्याच्या डेक्कन एज्युकेशन सोसायटीनें अध्यापक म्हणून स्वीकारलें होतें.

१९१८ च्या जून महिन्यांत ते पुण्यास आले. प्रारंभीं त्यांना न्यू इंग्लिश स्कूलमध्यें अध्यापनाचें काम देण्यात आलें होतें. सोसायटीच्या नियमांप्रमाणें, त्यांचा उमेदवारीचा काळ संपतांच, मार्च १९१९ मध्यें त्यांची आजीव सभासद म्हणून निवड करण्यांत आली आणि ते जूनपासून फर्ग्युसन कॉलेजांत शिकवूं लागले. बी. ए. ऑनर्स व इंटरमिजिएट या वर्गांना फार्सी शिकविण्याचें काम त्यांजकडे सोपविण्यात आलें; न्यू इंग्लिश स्कूलमध्येंहि ते आठवड्यांतून अकरा तास शिकवीत. १९२० सालीं या शाळेचे उपप्रमुख व १९२२ सालीं तिच्या वसतिगृहाचे प्रमुख म्हणून त्यांची योजना झाली.

फर्ग्युसन कॉलेजांत फार्सीच्या अध्यापनाचें काम जरी त्यांजकडे प्रामुख्यानें सोपविण्यांत आलें होतें, तरी १९२२ च्या जूनपासून एफ्. वाय्. आर्टस्‌ला इंग्रजी काव्य शिकविण्याचें कामहि त्यांजकडे आलें. त्यांच्या अध्यापनकौशल्याची येथें कसोटीच लागावयाची होती. फार्सीचे विद्यार्थी थोडे आणि विषयहि तयार, त्यामुळें सहज लीलेनें ते या विषयाच्या अध्यापनाचें काम पार पाडूं शकत. पण एफ्. वाय्. आर्टस्‌च्या वर्गाची तशी स्थिति नव्हती. जवळ जवळ दीडशें विद्यार्थ्यांचा वर्ग आणि तोहि

मुलांमुलींचा, मिश्र स्वरूपाचा. त्यामुळें आपण ही कामगिरी कितपत यशस्वीपणें पार पाडूं शकूं, याबद्दल सुरुवातीस त्यांना धाकधुकच वाटत होती. पण थोड्याच दिवसांत त्यांनीं आपला जम बसविला. ते वर्गात चांगलीच तयारी करून जात. रा. वि. म. ना ते लिहितात [1] : " विद्यार्थी लक्षपूर्वक ऐकून घेतात. एफ्. वाय्. ए चे वर्गात १६ मुली आहेत. पुढेंच बसतात. त्यांत दोन ओळखीच्या आहेत – परांजप्यांची शकुंतला व करमरकरांची इरावती – यामुळें त्या वर्गात बराच संकोच वाटे. तो आतां लुप्तप्राय होऊं घातला आहे. कांहीं दिवसांपूर्वी 'काव्यांतर्गत प्रेम' [2] या विषयावर दोन व्याख्यानें मी मुलांच्या गळीं उतरविलीं."

फार्सी शिकणाऱ्या विद्यार्थ्यांच्या बाबतींतहि ते फार श्रम घेत. भाषाज्ञानाबरोबरच, मुसलमान विद्यार्थ्यांना त्यांच्या पवित्र ग्रंथाचा नीट परिचय होऊन, त्यांच्यांत सत्यप्रीति व विभूतीनिष्ठा हीं विकसित व्हावींत, यासाठीं स्वतः कुराणाचा अभ्यास करून त्यांनीं निवडक वेंचे काढले होते. हे वेंचे शिकविण्यांत, 'विद्यार्थ्यांना स्वतंत्र व उदार दृष्टि येऊन धर्मवेडाचीं पडळें नाहींशीं व्हावींत,' असा त्यांचा हेतु असे. फार्सी व्याकरण त्यांना नीट कळावें, त्यांचा भाषेचा अभ्यास पायाशुद्ध व्हावा याकरितां विशिष्ट पाठ्यपुस्तकावर अवलंबून न राहातां, विद्यार्थ्यांच्या अडचणी आणि गरजा लक्षांत घेऊन त्यांनीं त्यासाठीं स्वतंत्र तयारी केली होती. फार्सी वृत्तशास्त्राचा अभ्यासहि त्याच हेतूनें त्यांनीं केला. अध्यापनाला सतत अध्ययनाची जोड असल्याशिवाय तें कधींहि यशस्वी व्हावयाचें नाहीं या तत्त्वाचे ते निष्ठावंत पुरस्कर्ते होते. या निष्ठेमुळेंच ते विद्यार्थ्यांना प्रिय होत, त्यांची निष्ठा ते जोडीत.

माधवरावांचीं डेक्कन एज्युकेशन सोसायटींतील पहिलीं दोन वर्षें साधारण बरीं गेलीं. अध्यापनाव्यतिरिक्त, त्यांच्या कांहीं सहकाऱ्यांच्या संगतीमुळे, कांहीं समाजसुधारणेच्या चळवळींत ते थोडें थोडें लक्ष घालूं लागले होते.

---

[1] २१ जुलै, १९२२.

[2] याच सुमारास माधवरावांनीं शोपेनहौरचा 'Metaphysics of love' हा लेख वाचला होता.

सोलापुरास १९१९ सालीं 'मागासलेल्या वर्गाची परिषद्' भरली असतां, सोसायटींतील कांहीं सुधारक सभासदांबरोबर ते तेथें गेले होते. सार्वजनिक चळवळींत भाग घेण्याचा त्यांचा हा पहिलाच प्रसंग असावा. सोलापूरहून परततांना ते पंढरपुरास गेले. त्यांनीं विठोबाचें दर्शन घेतलें आणि 'अनाथ बालकगृह' हि पाहिलें. यासंबंधींची हकीगत आपल्या पत्रांतून त्यांनीं रा. वि. म. ना पुढीलप्रमाणें लिहिली आहे: "सोलापुरीं मागासलेल्यांपुढें आमच्या मंडळीचीं व्याख्यानें झालीं. त्यांच्यांत उत्पन्न केलेला ब्राह्मणद्वेष पुष्कळच कमी होण्यास आम्ही कारणीभूत झालों. आमच्यांतले कांहीं लोक कऱ्हाडास भरणाऱ्या सत्यशोधक समाजाच्या परिषदेला उद्यां हजर राहाणार आहेत. द्रव्याच्या अभावीं मी फक्त शाब्दिक सहानुभूति व्यक्त केली आहे. सोलापूरच्या परिषदेंत विषयनियामक कमिटींत आम्हीं होतों. अस्पृश्य जातीं-संबंधींचा ठराव महाराष्ट्रापुरता नसावा व गुजराथला तो लागू करून त्याची व्याप्ति वाढवावी ही माझी सूचना पास झाली. परत येतांना आम्हीं तिघां-चौघांनीं पंढरपुरची यात्रा केली. ज्या नदीच्या पाण्यांत नामदेव--तुकारामां-सारखे संत स्नान करून स्वतःस कृतार्थ मानीत, त्या चंद्रभागेंत आम्हीं पोहलों. पुढें विठोबाच्या देवळांत शिरलों. आत जातांना मी नारळ, हार, खडीसाखर खरेदी केलेली पाहून आमच्या मंडळीस मौज वाटली. माझ्या भाविक जिवलगांतर्फे (काशीबाई हेर्लेकर, आत्याबाई, रमाकाकू वगैरे) मी तो हार, नारळ अर्पण केला व पायांवर डोकें ठेवून सर्वांचे नमस्कार प्रविष्ट केले. नंतर पुजाऱ्यानें देवावरचा एक हार माझ्या गळ्यांत प्रसाद म्हणून घातला. देवाच्या गळ्यांतील हार पुजाऱ्यानें माझ्या गळ्यांत प्रसाद म्हणून घालावा, हें मला अनुचित व अवनतिद्योतक वाटलें. पुढें त्या पुजाऱ्यानें रुपया दोन रुपये मागितले. आम्हीं त्यास साफ नाहीं म्हटलें व बाहेर आलों. देवळांतल्या जुन्या कोरीव कामांत, एक माणूस दोन बायांचे दोन्ही हातांनीं स्तन दाबीत आहे असें कोरीव चित्र पाहून विषाद वाटला. पुढें नामदेव व चोखामेळा यांच्या समाधींस वंदन करून, 'अनाथ बालकगृहा'कडे गेलों. मधल्या दालनांत ओळीनें पाळणे मांडलेले असून त्यांत वीस--बावीस दीन बालकें--ईश्वराचीं अर्भकें--पाहून मला तर भडभडून आलें. आणि मी

संस्थापक रा. ब. लालशंकर उमीयाशंकर यांची आठवण काढीत सर्व गृह पाहून शेजारील धंदेशिक्षणाची शाळा पाहिली."

पुण्यास आल्यापासून माधवरावांचें मन नास्तिक्याकडून आस्तिक्याकडे वळूं लागलें होतें. पंढरपुरास विठोबाच्या पायांवर डोकें ठेवून त्यांनीं जो नमस्कार केला, तो आपल्या 'भाविक जिवलगांतर्फे' केला असला, तरी तो अगदींच कोरड्या अंतःकरणानें केला असें म्हणतां येणार नाहीं. अनेक वर्षांच्या आघातांनीं त्यांचें मन अत्यंत हळवें बनलें होतें. त्यावर पुन्हा आकस्मिकपणें आघात झाले म्हणजे तें हादरे आणि आधारासाठीं, समर्थपणें टिकाव धरण्यासाठीं आजूबाजूला आशेनें पाहूं लागे. अशाच कांहीं प्रसंगीं त्यांनीं रा. वि. म. ना लिहिलें आहे कीं, "अखेर मनुष्याचे सर्व उपाय हरले म्हणजे तो गुण येण्यासाठीं मंत्रतंत्रादि तोडगे करून पाहतो, त्याप्रमाणें मन नास्तिक असताहि ईश्वरभक्ति करून कांहीं गुण आल्यास पाहावा म्हणून मी प्रयोग करून पाहात आहें व प्रार्थनासमाजातल्या सामाजिक प्रार्थनेला मी नेमानें हजर असतों. त्यामुळें माझ्या मनाला थोडी शांति वाटते. तो प्रयोग माझ्या बाबतींत थोडासा यशस्वी झाला; तूंहि तो करून पाहावास हें इष्ट आहे." [3] ... "धार्मिक बाबतींत संत तुकारामाचे अभंग रोज एकप्रमाणें वाचून त्यावर मनन करावें असें वाटतें. गीतेसारखा ग्रंथ वाचून फार तर ज्ञान होईल, परंतु तप्त हृदयास गारवा कसा मिळणार? त्यापेक्षां अनुभवजन्य भक्त्यालाप गाणें अधिक उपयोगाचें होईल. सकाळीं उठतांना व रात्रीं निजतांना परमेश्वराची प्रार्थना करणें इष्ट आहे. त्याप्रमाणें आत्मसंयमनाच्या वाढीसाठीं कांहीं विचारास पटतील अशीं व्रतवैकल्येंहि करावयास पाहिजेत, हे माझे विचार आहेत." [4]

माधवरावांनीं, ईश्वरभक्ति व प्रार्थना यांना 'मंत्रतंत्रादि तोडगे' आणि 'आत्मसंयमनाचे प्रयोग' याच्या पंक्तीस बसविलेलें पाहून हांसूंहि येतें आणि कींवहि येते. 'भक्ति' काय किंवा 'प्रार्थना' काय, 'संमोहन', 'वशीकरण' अशांसारखेच ते मानसिक उपचार असावेत अशी कांहीं तरी त्यांची समजूत

[3] १९ मार्च, १९२०. [4] २२ जानेवारी, १९२१.

होती असें दिसतें. भक्तिभावनेला, मनाला समाधान देणारी विशिष्ट प्रकारची भावनोर्मि यापलीकडे ते फारसें महत्त्व देत नसावेत. 'अज्ञात नाथास', 'पोरक्या पोराचा धांवा' या गीतांसारखीं त्यांचीं गीतें अशा उर्मीतूनच निर्माण झालीं. 'प्रीतीनें तुडुंब परंतु एकान्तांतून रडत वाहणाऱ्या मनाचीं तीं शोकगीतें' आहेत. त्यांत भक्ति-जिज्ञासा आहे. परंतु ती तृप्त करून घेऊं पाहाण्याचा त्यांत निर्धार नाहीं. नास्तिक्य काय किंवा आस्तिक्य काय, त्यांच्या अनेक मनोलहरींपैकींच त्या लहरी असत. समुद्रावरील लाटांप्रमाणें त्या कधीं प्रचंड उसळी मारीत, तर कधीं मंद मंद उमटत, तर कधीं अगदींच लुप्त होऊन जात. जात्या अंतर्मुख वृत्तीचे असूनहि, खरें आत्मसंशोधन त्यांजकडून कधींच घडलें नाहीं. खरी शांति, खरें समाधान, खरा आनंद अहंकाराची राख करण्यांत आहे, तो राखण्यांत नाहीं हें त्यांच्या लक्षांत कधींच आलें नाहीं. त्यामुळें ते आमरण अस्वस्थ, अशांत, असमाधानी असेच राहिले.

फर्ग्युसन कॉलेजांत अध्यापक म्हणून काम करीत असतां, प्रारंभीं प्रारंभीं त्यांचा ज्या सहकाऱ्यांशीं संबंध आला, त्यापैकीं बरेचसे स्वतःस सुधारक, नेमस्त व एकेश्वरी पंथाचे म्हणविणारे होते. त्याच्या सहवासांत माधवरावांचीं सामाजिक व राजकीय मतें एकांगी व पक्षदुष्ट होऊं लागलीं होतीं. १९१९ सालीं लोकमान्य टिळकांच्या मानपत्राला विरोध दर्शविण्याचें त्यांनीं केलेलें धाडस हें एक त्याचें उदाहरण आहे. लहानपणीं अर्थाअर्थी कांहीं संबंध नसतां, विठ्ठलराव घाट्यांनीं 'महादेव, झुंजायला तयार आहेस काय ?' असें विचारतांच ते जसे त्यांच्या प्रतिस्पर्धी पोरांशीं झुंजायला तयार झाले, तसेच ते यावेळेसहि, स्वतः आखाड्यांत न उतरतां, 'खूप लढो'ची घोषणा करीत दुरून गंमत पाहाणाऱ्या कांहीं टिळकद्वेष्ट्या व्यक्तींनीं, 'पटवर्धन, टिळकांच्या मानपत्राला भर सभेंत विरोध करावयाला तुम्ही तयार आहांत का ?' असें विचारतांच तयार झाले. या प्रसंगासंबंधीं अनेकांनीं अनेक तऱ्हेच्या आठवणी प्रसिद्ध केल्या आहेत. त्यांतील कांहीं कल्पित, तर कांहीं अतिरंजित आहेत. माधवरावांच्या शब्दांतच तो प्रसंग ऐकलेला बरा. तत्पूर्वी या प्रकरणाची नीट कल्पना येण्यासाठीं न. चिं. केळकर यांनीं टिळकचरित्रांत यासंबंधींची जी हकीगत दिली आहे, ती येथें उध्दृत करितों.

 

"टिळक विलायतेहून परत आल्यावर शहर नागरिकांतर्फे जें मानपत्र द्यावयाचें ठरलें होतें त्या संबंधांत टिळकांच्या प्रतिपक्षियांनीं विरोध करण्याचा विचार केला. त्याचें म्हणणें असें कीं, टिळकांना मानपत्र द्यावयाचें तर त्यांचे मित्र, भक्त व चाहते यांनीं आपल्यापुरतें द्यावें, पण सर्व शहराच्या नागरिकांचें नांव त्यांत कां घालावें? आम्हांला हें मानपत्र मंजूर नाहीं म्हणून आम्हाला समक्ष तेथें येऊन विरोध करावा लागेल. पण असें करण्यापेक्षां सर्व नागरिकांतर्फे हे शब्द त्यांतून काढून टाकले तर मग आमचें कांहींच म्हणणें नाहीं. या प्रतिपक्षियांत शहरांतील नेमस्त व ब्राह्मणेतर चळवळीचे पुढारी असे दोन वर्ग होते. ता. ४ डिसेंबर रोजीं रात्रौ जेधे मॅन्शनमध्यें विरोधी मंडळीची सभा होऊन मानपत्राच्या सभेंत विरोध करण्याचा ठराव त्यांनीं मंजूर केला व त्याची एक प्रत प्रि. परांजपे व गुप्ते वकील यांच्या सहीनें स्वागतमंडळाकडे पाठविण्यांत आली. त्यांना उलट स्वागतमंडळाकडून असें लिहिण्यात आलें कीं, 'मानपत्र सर्व नागरिकांतर्फे आहे ही गोष्ट खरी आहे. त्याचा उपक्रम म्युनिसिपालिटीनें यापूर्वींच केला आहे. तुमच्यासारखे कांहीं लोक या गोष्टीला विरुद्ध असतील. पण असल्या गोष्टींना कोणत्याहि शहरांतील एकूण एक लोकांची संमति असणें शक्यच नाहीं. शहरांतील बहुजनसमाजाला एखादी गोष्ट मान्य असली म्हणजे ती शहराला मान्य आहे असेंच म्हणतात. पण आपली समजूत या कामीं वेगळी असल्यास बहुजनसमाजाची तशी खात्री करून देण्याकरितां तुम्ही सभेला या. तुमच्याकरितां जागा ठेवूं आणि विरोध करण्याला कायदेशीर, सनदशीर संधी देऊं. उगीच बखेडा न व्हावा म्हणून जागा तुमच्यासाठीं वेगळी राखून ठेवूं. तरी किती लोक बसण्याची सोय पाहिजे तें आगाऊ कळवावें. पण ही व्यवस्था स्वीकारण्यास परांजपे वगैरे पुढारी तयार नसल्यानें, त्यांनीं ता. ७ च्या 'ज्ञानप्रकाशात' असें प्रसिद्ध केलें कीं, 'मानपत्र हें स्नेही व चाहते लोक यांच्यातर्फेचेंच आहे अशी आमची समजूत झाल्यामुळें आम्हीं आपल्या अनुयायांना सभेला कोणीहि हजर न राहाण्याची सूचना दिली आहे.' पण त्यांची तशी समजूत व्हावी असें खरोखर कोठेंच कांहींहि घडलेलें नव्हतें. पण 'आमची तशी समजूत झाली' असें लिहून सभेला हजर राहाण्याचा अवघड प्रसंग

त्यांनीं टाळला इतकाच त्याचा अर्थ. कारण उघडच आहे कीं, विरोध करणारे लोक आधीं फारच थोडे होते व त्यांतूनहि सभेला येऊन विरोध करण्याचें धैर्य फारच थोडक्याना होतें. तेव्हां खोट्या समजुतीची बतावणी पुढें करून विरोधकांनीं पाऊल मागें घेतलें इतकेंच, दुसरें काय ? पण त्यांची ही भोळी व सोयीची समजूत टिकूं देऊं नये व विरोध करावयाचा असेल तर या असें उघड आव्हान द्यावें म्हणून स्वागतमंडळानें त्यांना पुन्हा लिहून कळविलें कीं, 'आम्हीं तुम्हांला फिरून सांगतों कीं, मानपत्र सर्व नागरिकांतर्फे म्हणून आहे. तुमची समजूत चुकीची आहे. तुम्हीं आमच्याकडे ठराव पाठविला नसता आणि सभेला आला नसतां तर मग कांहींच हरकत नाहीं. बसल्या जागीं कोणी काय वाटेल तें समजावें — पण ठराव आमच्याकडे पाठविला, तुमच्या बसण्याची आम्हीं व्यवस्था केली आणि आतां जर तुम्ही सभेला न याल तर तुम्हीं आपला विरोध परत घेतला असें आम्हीं समजूं.' हें उत्तर सभेच्या वेळेपूर्वी चांगले सहा–सात तास परांजपे यांजकडे पाठविण्याची खबरदारी घेतली होती. परंतु या राखून ठेवलेल्या जागेंत कोणाचीच भरती झाली नाहीं. इतर समाज मात्र त्या विस्तीर्ण पटांगणांत न मावे इतका मोठा होता. सभेचें अध्यक्षस्थान लक्ष्मणराव आपटे वकील यांना दिलें होतें. त्यांनीं लहानसें भाषण करून अभिनंदन व स्वागतपर संदेश वाचून दाखविले. मुख्य मानपत्र लक्ष्मणराव भोपटकर वकील यानीं वाचून दाखविलें व त्यावर इतर काहीं भाषणें झाल्यावर अध्यक्षानीं सहजच विचारलें कीं, कोणास उलट बोलावयाचें असल्यास मी संधी देतों. तेव्हां एक ब्राह्मणेतर मुलगा पुढें आला आणि म्हणाला, 'आणखी कांहीं दिवसांनीं आम्ही अस्पृश्य वर्गाचें सहभोजन करणार आहों त्याला टिळक येतील तर मग माझा या मानपत्राला विरोध नाहीं !' याशिवाय दुसरा कोणी वक्ता पुढें आला नाहीं. शेवटीं मतें घेतां 'एक विरुद्ध सर्व' असें अध्यक्षांनीं जाहीर केलें आणि सुंदर रुप्याच्या करंड्यांत घालून मानपत्र टिळकांना अर्पण करण्यांत आलें ."

टिळकांच्या मानपत्राला विरोध दर्शविणारा 'एक' हात माधवरावांचा होता. त्यांनीं या प्रसंगींची रा. वि म. यांना कळविलेली हकीगत पुढील-प्रमाणें आहे. :[५]

---

[५] ता. ९ डिसेंबर, १९१९.

"सोसायटीच्या कांहीं मंडळींनीं झालेला प्रकार (मानपत्राला विरोध करण्याबाबत केलेला ठराव) सर्व नेमस्तांतर्फें नाहीं असें प्रसिद्ध करण्याचें ठरविलें. मी स्वतः समारंभ पाहाण्यासाठीं तटस्थ वृत्तीनें हजर राहाणार होतों. पुढें दुपारीं चार वाजतां सोसायटीच्या आठ प्रोफेसरांनीं सोसायटीच्या सुरक्षिततेसाठीं सभेला हजर राहाण्याचें ठरविलें व त्याप्रमाणें ते वर्तले. रा. नारायणराव कर्वे यांनीं मजसाठीं निमंत्रिताचा एक पास आणविला होता. परंतु त्या दिवशीं वादाचें स्वरूप आव्हानामुळें बदलल्यामुळें मला काय करावें हें सुचेना. तटस्थांसाठीं जागा राखून ठेवण्यांत आली नव्हती आणि कैवाऱ्यांत बसल्यास गैरसमजास जागा दिल्यासारखें होणार. इकडे आड तिकडे विहीर अशी गत झाली. अशा स्थितींत मी सभेला गेलों व नारायणरावांबरोबर मनाच्या अनिश्चित स्थितींत कैवाऱ्यात जाऊन बसलों. परंतु बेचैन झालों. सद्सद्विवेकबुद्धीचा आपण खून करीत आहों असें वाटलें. तेव्हा उठून बाहेर जाऊन रीतीप्रमाणें सही देऊन विरुद्धपक्षीयांत जाऊन बसलों. त्या जागेंत जागा रिकामी आहे असें पाहून कित्येक कैवाऱ्यांनीं सह्या देऊन आंत प्रवेश करून घेतला. मतें घेण्याच्या वेळीं त्या सर्वांनीं अनुकूल मतें दिलीं. माझ्या शेजारीं कित्येक पुंड, गांवगुंड बसले होते. त्यांनीं थोडासा दंगा केल्यावर ते निघून गेले. विरोधाचें भाषण करण्यास पुढें सरसावलेला मुलगा हा त्यातलाच होय. 'सहभोजनाला हजर राहाण्यास टिळक तयार असल्यास मानपत्र द्यावें नाहींतर देऊं नये' इतकेच शब्द बोलून, तो मतें घेण्याची वाट न पाहातां चालता झाला. मी माझ्या विद्यार्थ्यांच्या पोशाखात असल्यामुळें कोणी—विद्यार्थ्यांखेरीज—मला ओळखलें नाहीं. नावानें आव्हान केल्याशिवाय उठून भाषण करावयाचें नाहीं हें मी ठरविलें होतें. मी पुढारी नव्हतों व नाहीं. विरुद्ध कोण आहेत असें विचारतांच मी निःशब्द विरोधाचा हात वर केला व अध्यक्ष व रा. घासवाला माझ्याकडे लक्षपूर्वक पाहूं लागले. शेवटीं एक खेरीज सर्व अनुकूल असा निर्णय दिला गेल्यावर मला कळलें कीं, एवढ्या समूहसागरांत मीच तेवढा एक विरोधी बिंदु होतों. शेवटीं रा. घासवाला आपल्या भाषणात माझ्याकडे पाहून म्हणाले, 'When the votes were taken I saw one boy stubbornly keeping his hand raised in protest. I admire the courage of the boy.'

'बॉय' असें म्हणतांक्षणींच कांहीं विद्यार्थी ओरडले, 'No ! Professor.' पुढें सभा बरखास्त झाल्यावर मी स्वस्थपणें घरीं आलों. तों आधींच कर्व्यांनीं मी मार खाल्ल्याची बातमी (अर्थात् खोटीच) ऐकली होती. सभा उत्तम रीतीनें पार पडली. टिळकांचें जोरदार व उत्तेजक परंतु नजरबंदीचें असें भाषण झालें."

"मानपत्राची भाषा सरळ आहे. त्यांत विरोध करण्यासारखें जवळजवळ कांहीं नाहीं. परंतु टिळक म्हणजे पुण्यांतला राष्ट्रीय पक्ष व राष्ट्रीय पक्ष म्हणजे टिळक अशी खरी परिस्थिति असल्यामुळें, व त्या पक्षांतल्या बहुजनसमाजाचीं मतें खऱ्या स्वातंत्र्याला विघातक असल्यामुळें, (ज्या कार्यांत, जुलुमाचें मंडण केल्याचीं कांहीं उदाहरणें आहेत) मला जाहीर रीतीनें विरोध करणें भाग पडलें. टिळक या व्यक्तीशीं माझा विरोध नाहीं, हें दाखविण्याची उद्यां संधी आहे. रा. कर्व्यांकडे त्यांना पानसुपारी आहे व त्या समारंभाला मी निमंत्रित असल्यामुळें हजर राहाणार आहें. त्यांच्या व्याख्यानावर टीका लिहून मी तुझ्याकडे पाठविणार आहें. परंतु आजच त्यांच्या अप्रामाणिकपणाचें एक उदाहरण दाखवितों. 'लोकसंग्रहांत' 'मागासलेल्यांविषयीं मला पूर्ण सहानुभूति वाटत आहे,' हे मी कानांनीं प्रत्यक्ष ऐकलेले महत्त्वाचे शब्द नाहींत. 'नुसत्या जेवणांत संतोष नाहीं, अडलेंच तर तेवढेंहि करण्यास मी तयार होईन,' हें वाक्य 'लोकसंग्रहांत' आहे तर 'केसरींत' वगळलें आहे. तर मुंबईस भरलेल्या अस्पृश्यतानिवारण परिषदेंत केलेल्या भाषणासंबंधीं 'केसरींत' एक अवाक्षरहि कां आलें नाहीं, हें यावरून कळेल. ती नजरचूक होती हें आतां कोणासहि खरें वाटेल का ? शिवाय मी सामाजिक बाबतींत कांहीं केलें नाहीं, असें बाहेरून प्रांजलपणाचा आव आणून खोटें कां बोलतां ? पटेल बिलाला, संमति बिलाला, बसु बिलाला विरोध करण्यांत, 'शेतकऱ्यांनीं काउन्सिलांत काय नांगर धरावयाचे आहेत' असें बोलण्यांत, स्वतः ब्राह्मण असूनहि विद्यादानाचें कार्य अंगावर घेऊन केवळ व्यक्तिस्पर्धेमुळें वचनभंग करूनहि तें टाकून देण्यांत, आणि स्वयंनिर्णयाचें तत्त्व एका तोंडानें पुकारीत असतां दुसऱ्या तोंडानें लगेच धर्मासाठीं 'बाबांनो, वर्णाश्रमधर्माप्रमाणें आपल्या पूर्वजांचींच कार्यें करीत राहा', असा साळसूद उपदेश करण्यांत, आपण

स्वस्थ, तटस्थ बसलों असें का टिळकांना वाटतें ? त्यांनीं केलेलें कार्य अप्रागतिक, धर्माच्या नांवाखालीं चाललेल्या जातीजुलमाचें समर्थनपर असें झालें आहे. आणि म्हणूनच रा. केळकर यांच्याशीं माझा विरोध नाहीं, तर टिळकांशीं विरोध, अंतःकरणांत जळणारा असा विरोध आहे."

माधवरावांचा हा विरोध प्रामाणिकपणाचा असला तरी, तो दर्शविण्याचें तें स्थळ किंवा तो प्रसंग नव्हता. आणि ज्या लोकांच्या बैठकींत बसल्यामुळें त्यांना ही स्फूर्ति झाली होती, त्यांनीं शिस्तीनें माघार घेतल्यानंतर तरी हा उपटसूळ त्यांनीं खांद्यावर घ्यावयाला नको होता. पण मग माधवरावांचा माधवरावीपणा तो काय राहिला ? एकदां आपण विरोध करावयाचें ठरविलें ना, मग माघार कशी घ्यावयाची ? न का येईनात बाकीचे लोक. आपण आपल्या उक्तीप्रमाणें कृती केलीच पाहिजे, मग त्याचे परिणाम कांहींहि होवोत. आपल्या वागण्याला व्यवहाराची मुरड घालणें म्हणजे पळवाट काढणें असें त्यांना वाटे. यामुळें त्यांनीं पुढील आयुष्यांत नसतीं संकटें आपल्यावर ओढवून घेतलीं; त्यांचे सहकारी मित्र, शत्रू बनले.

माधवरावांनीं मानपत्राला केलेल्या विरोधामुळें, वर्तमानपत्रांतून त्यांना बरीच कुप्रसिद्धी मिळाली. सणसणाटीसाठीं नेहमींच टपून बसलेल्या 'संदेश'ला तर रेवडी उडवायला तो एक चांगलाच विषय मिळाला.

या प्रसंगामुळें एक गोष्ट मात्र घडली. माधवराव ज्या नेमस्त मंडळीच्या गोटांत वावरत असत, त्यांची तत्त्वनिष्ठा काय दर्जाची आहे याची त्यांना थोडीशी कल्पना या वेळेस आली. त्यांचेवरील विश्वास व श्रद्धा मात्र आणखी कांहीं काळ राहिलीं.

मानपत्राच्या या प्रसंगानंतर नेमस्ताच्या राजकारणात प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष ते कधींच पडले नाहींत. पुढें लवकरच टिळक वारले ( १९२० ) आणि हिंदी राजकारणाचीं सर्व सूत्रें महात्मा गांधींच्या हातीं गेलीं. त्यांनीं राजकारणाचा चेहरामोहराच पार बदलून टाकला. त्यांच्या कार्यक्रमात राजकीय सुधारणेइतकेंच सामाजिक सुधारणेला महत्त्व देण्यांत आलें होतें. त्यामुळें एके काळीं टिळकांच्या राष्ट्रीय चळवळीपासून दूर असलेले, पण

राष्ट्रोद्धाराबद्दल कळकळ बाळगणारे अनेक लोक त्यांत सामील झाले. नेमस्त पक्षसुद्धां, गांधीजींची राजकीय विचारसरणी पटत नसली तरी त्यांजबद्दल आदर बाळगी व त्यांच्या सामाजिक कार्यक्रमांत सहकार्य करण्यासहि तयार असे. गांधीजींची पक्षातीत वृत्ति, त्यांची सत्यनिष्ठा, भेद नष्ट करून समत्व स्थापण्यासंबंधींची त्यांची कळकळ, अखिल मानवजातीबद्दल त्यांना वाटणारें प्रेम, तत्त्वासाठीं सर्वस्वाचा होम करण्याची त्यांची तयारी, निःस्पृह राहूनहि कोणाचाहि अनादर होऊं न देण्याबद्दलची त्यांची दक्षता, या साऱ्या गुणांमुळें माधवरावांना त्यांजबद्दल थोर आदर वाटूं लागला. १९२०–२१ सालांत गांधीजींच्या 'यंग इंडिया' चें वाचन तुकोबाच्या अभंगांइतकेंच ते भक्तिभावानें करीत. गांधीजींच्या चरित्राचें मनन करण्यानें त्यांना एक प्रकारचें समाधान मिळे. घरच्या मंडळीकडून त्याना पुष्कळदां त्रास होई, आणि ते चिंतामग्न होऊन जात. अशा वेळीं ते गांधीजींच्या चरित्राकडे वळत. त्यांतील त्यांचीं आवडतीं प्रकरणें ते वाचीत आणि मनाला शांत करीत. अशाच एका प्रसंगीं रा. वि. म. ना ते लिहितात: "हल्लीं घरच्या बाबतींत जी अत्यंत चिंताजनक अशी परिस्थिति उत्पन्न झाली आहे, तींतून मी माझी वाट अत्यंत शांतपणानें काढीत आहें. एखादे वेळीं मला वाटतें कीं, माझी आत्मिक उन्नति व्हावी, ज्या गुणांची माझ्यांत उणीव आहे त्यांचा विकास व्हावा म्हणून तर हें दिव्य उत्पन्न झालें असावें. तसें असल्यास मी चिच्छक्तीचा आभारी आहें व फक्त 'आघात सोसण्याचें सामर्थ्य मात्र द्यावें,' असें प्रार्थितों. शांततेनें व सुखासमाधानानें राहावें, परपीडा करूं नये, दुरुत्तरें करूं नयेत वगैरे नियम दिसण्यांत अगदीं साधे, परंतु त्यांचा उपयोग समजूं लागल्यापासून मरेपावेतों आहे. महात्मा गांधींच्या मननीय चरित्राचें मी मनन करीत असतों. त्यांच्याशीं कांहीं बाबतींत माझा मतभेद आहे. परंतु माझ्या दृष्टीनें अनुकरणीय लोकोत्तर साधुत्व (तीची भगवंताची मूर्ति) जर कोठें असेल तर त्यांच्यांत आहे. धन्य हिंद देवी कीं जिची कूस अखिल जगाला आदर्शभूत अशा पुत्राला प्रसवली." त्यानंतरच्या आणखी एका पत्रांत ते लिहितात: "माझा काळ असह्य एकान्तांत जातो. नाहीं म्हणायला महात्मा गांधींचे 'यंग इंडिया' मधील लेख वाचतांना मात्र मन उच्च भावनांनीं प्रदीप्त

होऊन डोळयांतून अश्रु वाहूं लागतात." महात्माजीबद्दल त्यांना वाटणाऱ्या या आदरामुळेंच ते १९२१ च्या जूनमध्यें कॉंग्रेस–क्रीडवर सही करून सभासद झाले.[६] गांधीजींबद्दल वाटणारा आपला आदर त्यांनीं १९२१ व १९२२ सालीं लिहिलेल्या, अनुक्रमें 'महात्मा काय करिल एकला!' व 'दोन विभूति' या कवितांत व्यक्त केला आहे.

माधवरावांचीं पुण्यांतील पहिलीं दोन वर्षें स्वतःचा जम नीट बसविण्यांत व वारंवार उपस्थित होणाऱ्या कौटुंबिक भानगडी मिटविण्यांतच बहुतेक गेलीं. त्यांच्या पूर्वसंकल्पाप्रमाणें, लेखन–वाचन करण्यास त्यांना फारशी सवड मिळाली नाहीं. तरी पण त्यांतल्या त्यांत वेळ काढून त्यांनीं नागरी लिपीसुधारणेसंबंधीं, ते व त्यांचे मित्र रा. वि. म. यांच्यांत कांहीं वर्षे जे विचार चालत त्यावर अधिक विचार करून सुधारणा सुचविणारा एक निबंध लिहिला; फार्सी वृत्तशास्त्राच्या अभ्यासाला प्रारंभ करून त्यांतील जीं वृत्तें मराठींत आणतां येतील असें वाटलें, त्यांवर पद्यरचना करावयास सुरुवात केली; इतिहाससंशोधक साने यांनीं संपादिलेल्या 'भाऊसाहेबांची बखर' या पुस्तकांतल्या फार्सी शब्दांचा कोश व कवि चंद्रशेखर यांच्या कवितेचें यथार्थ दर्शन करून देणारा विस्तृत विवेचनात्मक निबंध तयार केला. एम्. ए. ची परीक्षा आटोपल्यानंतर सुरू केलेला कुराणाचा अभ्यास पुरा केला. जर्मन भाषेच्या आपल्या ज्ञानाला, अरबी–फार्सीचें व्याकरण व फार्सी वृत्तशास्त्र हीं अभ्यासित असतां त्यांवरील जर्मन ग्रंथ, त्याचप्रमाणें 'सेन सुख्ट्' सारखी कादंबरी वाचून उजाळा दिला; प्रासंगिक काव्यलेखनहि केलें. या दोन वर्षांत कॉलेजांतील आपल्या सहकाऱ्यांव्यतिरिक्त इतर कोणाकडे त्यांचें जाणें येणें फारसें नसे. सहकाऱ्यांतसुद्धां डॉ. गुणे व प्रि. वासुदेवराव पटवर्धन यांचा सहवास त्यांना अधिक प्रिय असे. त्यांच्या व्यासंगी प्रवृत्तीला या दोघांकडून विशेष उत्तेजन मिळे व मार्गदर्शनहि घडे. 'अरबी, फार्सी व तुर्की शब्दांची परिणती' हा त्यांचा पहिला संशोधनात्मक निबंध डॉ. गुणे यांच्या प्रोत्साहनामुळेंच लिहिला जाऊन, १९१९ सालीं पुणें

[६] रा. वि. म. पत्रसंग्रह, ता. १३ जून, १९२१.

येथें भरलेल्या पहिल्या प्राच्य विद्यापरिषदेपुढें वाचला गेला. स्वतः कवि व साहित्यप्रेमी असूनहि पुण्यांतील तत्कालीन कोणाहि कवींशीं किंवा साहित्य-भक्ताशीं त्यांचा या दोन वर्षांत संबंध आला नाहीं. नाहीं म्हणावयास, प्रि. पटवर्धन यांचेमुळें नाट्यछटाकार दिवाकर व प्रो. मायदेव यांचेशीं थोडासा परिचय झाला असेल तोच. पण तोहि कवि किंवा लेखक म्हणून नव्हे, तर फर्ग्युसन कॉलेजांतील एक अभ्यासु वृत्तीचा अध्यापक म्हणून. हा दोन वर्षांचा काळ जवळ जवळ एकान्तांतच त्यांनीं काढला म्हटलें तरी चालेल. आणि १९२१ च्या जुलैंत प्रो. श्रीधर बाळकृष्ण रानडे यांच्याशीं परिचय घडून येण्याचा योग न येता, तर हा एकान्त आणखी कांहीं काळ तसाच राहिला असता.

# ७

# साहित्यिक जीवनाचा प्रभातकाळ

" तेथेंच आम्ही बैसलों निज हृद्गतें बोलावया
तेथेंच काढुनि दाविल्या सोत्कण्ठ मी कवितावह्या,
तेथेंच गाउनि दाविलीं कौमारगीतें मी तया
तेथेंच ती दिसली उषा संध्याक्षणीं असल्याच या.
दोघेहि आशाचारुतेमधिं पार गेलों रंगुनी,
गमलें वरीन ध्येय मी प्रत्यक्ष तें उल्लंघुनी."

श्रीधरपंत रानडे याच्या सहवासांत घालविलेल्या त्या दिवसांची आठवण वरील गज्जलांत माधवरावांनीं गुंफिली आहे. फर्ग्युसन कॉलेजच्या मागें असलेल्या पश्चिमेकडील त्या कातळावर, परस्परांच्या परिचयाच्या त्या पहिल्या दिवसांत, परस्परांत मोकळेपणानें कितीतरी सुखसंवाद होत, विश्वासपूर्वक हृद्गतें सांगितलीं जात, एकमेकांच्या कविता वाचून दाखविल्या जात, आणि आशामय अंतःकरणानें दोघेहि भविष्यकाळांत शिरून स्वरचित स्वप्नसृष्टींत गुंग होऊन जात. दोघेहि काव्यात्म प्रवृत्तीचे, पण त्यांच्या भावनात्मक जीवनाचे प्रवाह मात्र भिन्न स्वरूपाचे आणि भिन्न दिशेनें वाहणारे होते. प्रेमसाफल्यामुळें श्रीधरपंतांची वृत्ति पूर्ण संतुष्ट, तर प्रेमासाठीं तहानलेल्या माधवरावांची वृत्ति तितकीच असंतुष्ट. या वृत्तिभिन्नतेमुळें श्रीधरपंतांची, कवीच्या सहवासांत कातळावर काव्यमाधुरी चाखीत असतां पुढील प्रकारची स्थिति होई.

" अलगूज—गुंजन दूरचें नवफुल्लपुष्पसुगंधही
पवनांतुनि सुचवी—'खुळ्या शिणसी वृथा ! बघ जा गृहीं !'

दिन थांबले, तप लोटलें, तिजसंगतीं रमलों भवीं
गतकालची प्रणयांतली रमणीयता स्मृति जागवी !

विरहांतले दिन आमुचे, सुखकालचें मधुमीलन
स्मरुनी ; वियोगीं जोडपीं आशेस देती इंधन !

संध्येंतली रमणीयता, तारांतली चिरशांतता,
उन्माद सौगंधांतला, गानांतली मधु खिन्नता ;

जमवून हीं दुहितामिषें निज शैशवांतिल माधुरी
सुचवीत, आकर्षी मला प्रेमोत्सुका गृहिणी घरीं ! "

—आणि ते काव्यमय स्वप्नसृष्टींत तरंगणाऱ्या निकटवर्ति कविमित्राला म्हणत :

" पळते पुढें मम सावली, प्रीतींत मुक्ती लाधली
क्षितिजावरी न उषा तुझी अजुनी कवे ! तुज भेटली.

म्हणुनीच सुंदर पाहुनी निमिषांत होशी निश्चल
तंतू जिवींचे कांपती वाऱ्यावरी तव गज्जल !

पडसाद त्यातें द्यावया समकंपना ना पोकळी
विश्वीं जरी खचले ढुवे, प्रेमी जुळेना सांखळी !

तूं कातळावर एकटा, ध्यानीं कवे ! तव साजणी
स्थिति गुंतवी जरि ही मला लागे घराची ओढणी ! "

माधवराव व श्रीधरपंत रानडे यांनीं ज्या कातळावर असे सुखद व स्वप्नमय संध्यासमय घालविले तो कातळ पुढें 'कविकातळ' या नांवानें संबोधिला जाऊं लागला. हा कातळ माधवराव आणि त्यांचे कविमित्र यांचें सायंकालीन संकेतस्थळ बनला.

श्रीधरपंतांचा आणि माधवरावांचा अगदीं जवळून असा परिचय १९२१ च्या जुलैमध्यें, माधवरावांच्या आमंत्रणावरून ते त्यांचेकडे गेले असतां झाला. तत्पूर्वी, त्या वेळीं नुकत्याच स्थापन झालेल्या 'महाराष्ट्र-शारदा-मंदिरां'त दोन चार वेळां एकमेकांच्या भेटी झाल्या होत्या. पण त्या औपचारिक होत्या. पुण्यांतील कांहीं कवि दर रविवारीं या शारदामंदिरांत जमत, कधीं एकमेकांच्या

नवीन कविता वाचून दाखवीत, तर कधीं त्यावर सडेतोड चर्चा करीत, तर कधीं एकाद्या नवागत साहित्यिकाशीं व त्याच्या साहित्याशीं परिचय करून घेत, तर कधीं खानपानांत आणि निव्वळ गप्पा मारण्यांत काळ व्यतीत करीत. सदाशिव पेठेच्या हौदावरून जाणाऱ्या रस्त्यावर रास्ते यांच्या राममंदिराच्या जागेंत रस्त्यावरील माडींत कवि यशवंत राहात असत त्याच ठिकाणीं हें शारदामंदिर होतें. कवि अनंततनय, प्रा. श्री. नि. चाफेकर, कवि गिरीश, कवि यशवंत, कवि अज्ञातवासी, प्रो. श्रीधरपंत रानडे, सौ. मनोरमाबाई रानडे, प्रो. मायदेव, नाट्यछटाकार दिवाकर, य. म. गद्रे वगैरे मंडळी या मंदिराची सदस्य होती. माधवराव या बैठकींना मधून मधून हजर असत, पण प्रत्यक्ष चर्चेंत किंवा कवितावाचनांत ते भाग घेत नसत. त्यांची तेथील भूमिका रसिक श्रोत्याची असे. आणि ते कविता रचीत असतील हें तरी जमणाऱ्या मंडळीपैकीं कोणाला ठाऊक होतें ? त्यांचें हें गुपीत श्रीधरपंतानीं जेव्हां एके दिवशीं फोडलें तेव्हांच इतरांना माहीत झालें.

श्रीधरपंतांनीं, माधवरावांशीं कवि या नात्यानें झालेल्या आपल्या प्रथम परिचयाची हकीकत आपल्या एका आठवणीवजा लेखांत पुढीलप्रमाणें सांगितली आहे :

" एक दिवस माधवरावानीं आपल्या राहत्या खोलींत मला चहाला बोलाविलें. त्या फर्ग्युसन कॉलेजजवळच्या राहतेकरांच्या बैठ्या चाळींतल्या खोलींत मी सकाळीं सातच्या सुमारास थंडींत कुडकुडत गेलों. त्या खोलींत आवश्यक तेवढ्या वस्तु टापटिपीनें मांडलेल्या दिसत होत्या. चहा झाल्यावर माधवरावांनीं टेबलाच्या खणांतून हलकेच 'कवितावही' काढली व माझ्या हातांत साशंक मनानें दिली. ह्या चिमुकल्या वहींतील पंधरा–वीस कवितांत माधवरावांचीं तत्कालीन भावी सर्व वैशिष्ट्यें बीजरूपानें होतीं. कवितांबद्दल मीं आवेशानें अनुकूल अभिप्राय देऊन 'कांहीं प्रसिद्ध केल्या कीं नाहीं,' असें विचारतांच माधवरावांनीं 'बडोदें मिसेलेनी' त्रैमासिकांतील कवितेचें [१] एक कात्रण दाखविलें. माधवराव त्यावेळीं अत्यंत

[१] 'वाग्यत मोहिनी' (स्वप्नरंजन, पृ. २२).

हळुवार झाले होते. 'माझ्या त्या एकाच कवितेच्या प्रसिद्धीकरणानें मला अत्यंत मनस्ताप झाला.[२] कविता प्रसिद्ध करावयाच्या नाहींत, कोणाला दाखवावयाच्या नाहींत, पण तुम्हाला आवडतात की नाहीं याची मला उत्कंठा होती.' असें ते म्हणाले. मीं ती वही त्यांच्याकडून मागून घरीं नेली व आम्हीं दोघांनीं (श्रीधरपंत व सौ. मनोरमाबाई) पुन्हा पुन्हा वाचून एक बेत कायम केला आणि त्याप्रमाणें पुढील रविवारच्या शारदा-मंदिराच्या बैठकींत माधवरावांना त्यांतील कांहीं कविता वाचण्यास आग्रह केला. मध्यभागीं तक्याशीं अनंततनय अध्यक्षस्थानीं बसले होते व त्या माडीत बिछायतीवर दोन्ही बाजूंना रेलून पुढें कवितांच्या वह्या ठेवून कवि बसले होते. नवीन कवींच्या ओळखी, आठवड्यातील ताज्या गरम कवितांचें वाचन व ठराविक वादविवाद संपत आल्यावर, मीं माझ्याजवळ बसलेल्या माधवरावांच्या पुढें वही टाकून कविता वाचण्याचा आग्रह केला. माधवरावानीं पांच-सहा कविता वाचल्या. तें गज्जल वृत्त, ते साधे शब्द, मध्येंच बिचकविणारे ते पार्शियन शब्द, ती जोरदार पण रांगडी भाषा, ती निर्भीड पण मन हलविणारी विचारसरणी, तरुण मनाच्या गूढ, पवित्र व मनांतल्या मनांतच राहणाऱ्या भावना; 'कौमार्यस्मित,' 'एक घाव,' 'चिमुकली शाता,' 'श्यामा रजनी' 'प्रेमाची

[२] माधवरावाच्या तोंडीं घातलेले हे शब्द वस्तुस्थितिदर्शक आहेत असें वाटत नाहीं. 'बडोदें मिसलेनी'मध्यें 'वाग्यत मोहिनी' प्रमाणें 'बघशि कां जरी राहशी दुरी?' वगैरे कांहीं कविता प्रसिद्ध झाल्या होत्या. १९१६ सालीं 'काव्यरत्नावलीं'त 'निशिगंधाचीं फुलें' ही त्यांची कविता प्रसिद्ध झाली; फर्ग्युसन कॉलेजच्या त्रैमासिकांत 'आमची ओळख,' 'स्वतंत्रतेस,' 'मित्रास' या कविता अनुक्रमें 'दिल्जू', 'एम्. जूलियन्,' 'M. J.' अशा टोपण नावानें १९१९ च्या जुलै, सप्टेंबर व डिसेंबर या महिन्याच्या अंकांत प्रसिद्ध झाल्या होत्या. १९२० सालींहि फर्ग्युसन कॉलेजच्या त्रैमासिकात 'मा. ज्यूलिअन्' या टोपण नावानें 'अर्वाचीन फार्सी कविता' या नांवाची कविता प्रसिद्ध झालेली आहे. ही वस्तुस्थिति लक्षात घेतां माधवराव असे वैतागाचे उद्गार काढतील हें संभवत नाहीं.

परीक्षा नको,' 'पिरोजा कोला' (कुमारी पिरोजा) अशा प्रकारच्या कविता ऐकत मी इकडे तिकडे आशेनें पाहात होतों. गिरीश, यशवंत, मनोरमाबाई यांच्याशिवाय इतर कोणालाहि त्या कवितांचें कौतुक वाटलें नाहीं. माधवरावांची वही मिटली. इतरांच्या कवितांचें वाचन सुरू झालें. माझी निराशा झाली."

माधवरावांचें शारदामंदिरांतील तें पहिलें कवितावाचन तथाकथित 'वज्यां'कडून प्रोत्साहन मिळण्याच्या दृष्टीनें जरी अयशस्वी ठरलें असलें तरी गिरीश, यशवंत, मनोरमाबाई व स्वतः श्रीधरपंत रानडे यांना त्यांच्या कवितांबद्दल कौतुक वाटलें हेंहि कमी महत्त्वाचें नाही. या कौतुकाचें पुढें स्नेहांत रूपान्तर होऊन या साऱ्या व्यक्ती एकत्र आल्या व एकमेकांच्या सहकार्यानें मराठी काव्याच्या एका नव्या कालखंडाला त्यानीं सुरुवात केली.

शारदामंदिरांतील या बैठकीनंतर कांहीं दिवसानी ऑगस्ट (१९२१) महिन्यात रानडे यानीं माधवरावाना आपल्या घरीं दोनदां काव्यवाचनासाठीं पाचारण केलें.[3] पहिल्या वेळेस यशवंत, गिरीश, माडखोलकर हे हजर होते. दुसऱ्या वेळेस विठ्ठलराव घाट्यांची 'हाजरी' लागली होती. ते ग्वाल्हेरास जावयाचे असल्यामुळें त्याच्या सन्मानार्थ रानड्यांच्या घरी मजलस भरली होती. या दोन्ही बैठकाची हकीकत माधवरावानीं रा. वि. म. ना पुढीलप्रमाणें लिहून कळविली आहे :

"ठरल्याप्रमाणें रा. श्रीधर रानडे याच्या घरीं माझ्या कवितांचें वाचन झाले. मी माझ्या वह्या काखेंत मारून त्याच्या घरीं रात्री ९ वाजतां गेलों. चिमुकली सुधा निद्रेच्या काव्यात निमग्न होती. सौ. मनोरमाबाई, रा. श्रीधरपंत, आणि रा. ग. त्र्यं. माडखोलकर मिळून श्रोतृसमुदाय जमला होता. कवितांचें वाचन व चर्चा यांत दोन वाजले तेव्हा आम्ही झोंपलों. पुन्हां सकाळीं चहा व शंकरपाळे यांचा फन्ना उडाला. साधारण दीड तास, नव्हे एक तासभरच वाचन झालें. त्या वेळीं कवि यशवंत व कवि गिरीश हे हजर होते. 'कविता pre-meditated म्हणजे विचार करून लिहिलेली आहे,

[3] ता. १ ऑगस्ट, १९२१.

असा रा. माडखोलकरांचा अभिप्राय पडला. ‘यांच्या कविता सर्वच नवीन आहेत’, असें रा. रानडे मधून मधून अनेकदां म्हणाले. एकंदरींत पुण्यपत्तनस्थ कविवर्गाचें साधारण मत मला बरेंचसें अनुकूल झालें आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. या मिळालेल्या प्रसिद्धीमुळें माझ्या मनाची शांति मात्र थोडी कमी झाली आहे. आपल्या चाहत्यांची संख्या अत्यंत मर्यादित असावी असें मला वाटतें. कवि—अलिकडील बहुतेक कवीश्वर—स्तुतीसाठीं हपापलेले, एकमेकांची स्तुति करण्याचा धंदा करणारे, किंवा एकमेकांची अप्रत्यक्ष निंदा करणारे असतात. त्यांच्याशीं वागणें म्हणजे जोखमीची गोष्ट आहे. म्हणून कांहीं निवडक सहृदय रसिकांखेरीज इतरांपासून शक्य तितकें दूर राहणें बरें. तसेंच मी करीत आहें व करीन.”

“या प्रसिद्धीचा पहिला परिणाम म्हणजे ‘अभिनव काव्यमाले’च्या चौथ्या भागाचे [४] संपादक रा. माडखोलकर यानीं आपल्या कविता प्रसिद्ध करण्याची परवानगी द्या अशी विनंती केली. तेव्हां चौथ्या भागांत १६ पानें मजकूर येईल. कवितांची निवड विशेषतः रानडे व माडखोलकर यानीं अशी केली आहे: १ चिमुकली शांता, २ बघशि कां जरी राहशी दुरी ! ३ निशिगंधाचीं फुलें, ४ एक पारशी मुलगी ५ केवळ मायभूमीसाठीं ६ कुणीं काय बाधिलें ! ७ बुझावूं मी किती तूंतें ! . . . एकंदरीनें निवड बरी आहे . . . ”

“रा. विठ्ठलराव घाटे चार दिवस राहून विजापुरास आपल्या सवत्स पत्नीस भेटण्यास गेले आहेत. ग्वाल्हेरास परत जातांना एखादा दिवस येथें उतरतील. त्यांच्यासाठीं रा. श्रीधर रानडे यांच्या घरीं रात्रीं खास मजलस भरली होती. मजलशीस रानडे दंपति, रा. माडखोलकर, रा. यशवंत, रा. गिरीश, विठ्ठलराव आणि अहम् गरीब प्राणी अशीं सतजणें हजर होतों. निजण्यास पहाटे चार वाजले. दुसऱ्या दिवशीं सकाळीं रा. रानडे यानीं

[४] ‘अभिनवकाव्यमाले’चा हा भाग लक्ष्मणशास्त्री लेले याच्याशीं मतभेद झाल्यामुळें त्यांत छापण्याकरिता दिलेल्या कविता माधवराव, घाटे व कवि यशवंत यांनीं परत घेतल्या व माडखोलकर यांनींहि संपादकीय कामाचा राजिनामा दिला, त्यामुळें प्रसिद्ध झाला नाहीं.

मंडळीचा फोटो घेतला. तिसऱ्या दिवशीं पहांटे माझ्या खोलीवर चहापान करून २॥ तास गिर्यारोहण झालें. असा कार्यक्रम झाला. तूं असतास तर दुधांत साखर पडली असती."

"रा. श्रीधर रानडे कुटाळकींत भाग घेत नाहींत. बाकीच्या मंडळींना कुटाळकीचा मोह काव्यस्फूर्तीइतकाच अनावर होतो, असा वाईट अनुभव रा. घाटे यांसहि आला व त्याप्रमाणें त्यांनीं बोलून दाखविलें. या कुटाळकीचा स्पर्श होऊं द्यावयाचा नाहीं अशी मी खबरदारी घेत आहें. रा. रानडे हे सुसंस्कृत आहेत, रसिक आहेत. त्यांची वर्तणूक सहृदय आहे. त्यांचा माझा परिचय दाट झाल्यास मला फायदाच होईल असें वाटतें. जूलियन हें नाव मीं वगळावें अशी तुझी शिफारस आहे. तुझा आक्षेप कितपत सप्रमाण आहे हें मला सांगतां येत नाहीं. या नावांत विशेष माधुर्य अगर काव्य आहे असें मला बिलकुल वाटत नाहीं. परंतु माझ्या अनेक कवितांच्या स्फूर्तिदात्रीनें मला दिलेलें हें नाव, आयुष्यातील अनेक प्रीतिज सुखदुःखांच्या प्रसंगांशीं निगडित झालेलें हें नाव — टाकून देणें माझ्याने होणार नाहीं. मृत दयितेच्या राखेंतून निघालेला अस्थि जसा जतन करावासा वाटतो तद्वत् हें नांव मला धारण करावेंसें वाटतें. तें स्वदेशी नसेल; परंतु मग मी स्वभावानें तरी कुठें अस्सल स्वदेशी–महाराष्ट्रीय–पुणेरी आहे? दिलेला हा बचाव तुला पटेल अशी मला आशा आहे."

"आज तुला एक कविता पाठवीत आहें. तिचें नाव 'कौमार्यस्मित' असावें असें मला वाटतें. 'बालस्मित' या नांवापेक्षां 'कौमार्यस्मित' या नांवांत अधिक अन्वर्थकता आहे. वयात आलेल्या परंतु कामवासनेच्या कल्पनेची झुळूक जिच्या अंगावरून गेलेली नाहीं अशा स्वतंत्र वातावरणांत वाढलेल्या निर्भीड, अल्लड आणि चलाख मुलीच्या हास्याचें वर्णन आणि त्या स्मिताचा वयानें वडील, अनुभवानें वृद्ध अशा मनुष्याच्या मनावर काय परिणाम होतो त्याचें वर्णन या कवितेंत आहे. तुझी जी टीका येईल त्यात शब्दांचें परीक्षण तर असावेंच परंतु मूळ कल्पनेचा परिपोष कसा झाला आहे याचें परीक्षण विशेष सूक्ष्म असावें."

# साहित्यिक जीवनाचा प्रभातकाळ

माधवरावांना, त्यांच्या काव्यप्रतिभेचीं गुणवैशिष्ट्यें नक्की हेरून त्यांचा विकास व्हावयाला, शिंदे यांच्यानंतर, जर कोणी पद्धतशीर प्रोत्साहन दिलें असेल तर तें श्रीधरपंत रानडे यांनींच. रानडे हे गतिशील वृत्तीचे गृहस्थ आहेत. ते स्वतः शास्त्रज्ञ असल्यामुळें सतत प्रयोग करीत राहणें हें जात्याच त्यांना आवडतें. स्थितिशीलता त्याच्या मनाला मानवत नाहीं. अनेक नवीन प्रवाहांना आपल्या जीवनसरितेंत मिळवून घेऊन वाहात राहण्यांतच खरें जीवन आहे असें मानणारे ते आहेत. आणि म्हणूनच

कायदा पाळा गतीचा, काळ मागें लागला,
थांबला तो संपला !
धावत्याला शक्ति येई आणि रस्ता सांपडे
भ्रांत तुम्हां कां पडे ?

असें घनगंभीर वाणीनें सांगणाऱ्या माधवरावांकडे ते आकर्षिले गेले. काव्यविषयक नवीन दृष्टीची आस लागलेला, नवे विचार, नव्या कल्पना, नव्या भावना, नव्या कामना स्पष्टपणानें मांडण्यासाठीं नवनव्या साधनांचे निडरपणें प्रयोग करणारा धडाडीचा व प्रगतिशील कवि माधवरावांशिवाय त्यांना त्या वेळीं कोणीहि दिसला नाहीं. माधवरावाच्या आगमनानें, 'शेवाळूं लागणाऱ्या मराठी काव्याला नवनवे पाट फुटतील,' अशी आशा त्याना वाटूं लागली. स्वतः श्रीधरपंतांना किंवा त्यांच्या पत्नी सौ. मनोरमाबाई यांना वैयक्तिक काव्यविषयक महत्त्वाकांक्षा अशा नव्हत्याच, पण मराठी कवितेला नवीन वळण मिळावें, ही तळमळ मात्र होती. या तळमळीमुळेंच, त्याच्या दृष्टीनें नवे विचार ग्रहण करूं शकतील व नवनवे प्रयोग करून पाहण्याची उत्सुकता ज्यांच्यांत सतत आढळेल असें त्यांना वाटलें अशा व्यक्तींना त्यांनीं एकत्र आणण्याचा प्रयत्न केला. 'रविकिरणमंडळ' हें त्या प्रयत्नाचें फळ होय.

रविकिरणमंडळाचा जन्म झाला त्या वेळेस, "काव्यक्षेत्रांत बहुमोल कामगिरी केलेले लोक गेले होते किंवा मागें पडले होते. रेंदाळकर, बालकवि, टिळक, गडकरी याचे संप्रदाय चिघळून त्यांना विकृत स्वरूप आलें होतें.

पुनरुक्ति व अंधानुकरण या चक्रव्यूहांत कवि व रसिक दोघेहि सांपडले होते. त्यांतून कवितेची सुटका करून तिला मोकळा मार्ग करून देण्यास व नवीन वळण लावण्यास कोणीतरी नेता पाहिजे होता. विचारक्रांतीबरोबरच साधनांची ( medium ) क्रांतीहि हवी होती. शेंकडो नवखे कवि या नव्या वाटाड्यासाठीं खोळंबले होते." अशी परिस्थिति होती. ही परिस्थिति ओळखून, तींत साधिक रीतीनें पालट घडवून आणण्यास प्रवृत्त होतील, अशा व्यक्ति नीट हेरून त्याना एका ध्येयध्रुवाभोंवती परिभ्रमण करावयाला लावणें ही सामान्य गोष्ट नव्हती. रानडे यांनीं ही कामगिरी केली. मराठी कवितेच्या दृष्टीनें ती अनमोल आहे. ग. त्र्यं. माडखोलकर यांनीं सौ. मनोरमाबाई रानडे यांच्यासंबंधींच्या आठवणी [५] सांगतांना, रानडे दंपत्याच्या सहवासाचा तत्कालीन नवकवींच्या काव्यदृष्टीवर कसा परिणाम झाला, त्यांच्या काव्यरचनेला नवें वळण कसें लागलें, नवनवे प्रयोग करावयास त्यांच्या सान्निध्यांत प्रोत्साहक असें वातावरण कसें निर्माण झालें, त्यांचें घर निरनिराळ्या साहित्यविषयक चळवळींना प्रेरणा देणारें केंद्र कसें बनलें होतें याचें पुढीलप्रमाणें मार्मिक वर्णन केलें आहे :

"रानडे दंपत्याच्या कवितेपेक्षां त्यांचें जीवन जसें अधिक काव्यमय होतें, त्याचप्रमाणें त्यांच्या स्वतःच्या काव्यस्फूर्तीपेक्षां इतरांना काव्यस्फूर्ति देण्याची किंवा इतरांच्या काव्यस्फूर्तीला वळण लावण्याची त्यांची शक्ति अधिक मोठी होती. रविकिरणमंडळ स्थापन करण्याची कल्पना कोणाच्याहि मनांत उगम पावलेली असो, पण ही गोष्ट मात्र निःसंशय की नानांची ( श्रीधरपंत ) कल्पकता आणि जिजींची ( मनोरमाबाई ) सहृदयता यांनींच त्या मंडळाची जोपासना प्रारंभीं केली. याहीपेक्षा त्या दंपत्याची जास्त महत्त्वाची कामगिरी म्हणजे यशवंताच्या असंस्कृत प्रतिभेच्या विकासाला त्यांनीं केलेलें हळुवार साहाय्य. तो दऱ्या-खोऱ्यातला कवि ज्या वेळीं चाफळहून पुण्यास आला, त्यावेळीं त्याची उज्ज्वल प्रतिभा खरोखरच रानवट होती. पण नाना आणि जिजी यांनीं त्यांच्या प्रत्येक कवितेवर गोड शब्दांनीं

५ श्री-मनोरमा.

टीका करून, त्यांना नवी कल्पना सूचवून आणि नव्या जगाशीं त्याचा नाना परीनीं परिचय करून देऊन त्यांच्या कवितेला सुंदर वळण लाविलें. दोघाचेंहि यशवंतांवर बंधुतुल्य प्रेम होतें; व नाना पुण्यास असेपर्यंत त्यांचें घर हा यशवंतांच्या तप्त मनाला एक मोठाच विरंगुळा होता. सौ. मनोरमाबाईंना गृहकृत्यांत मदत करीत करीत नानांनीं यशवंतरावांच्या काय, माधवरावाच्या काय, किंवा शंकररावाच्या (गिरीश) काय, कवितांवर केलेल्या मार्मिक टीकेचे कितीतरी हृद्य प्रसंग मला आठवतात. मनोरमाबाई थोड्या स्पष्ट, तापट आणि मतप्रदर्शनाच्या बाबतींतसुद्धां एककल्ली असत. उलट नाना वस्ताद, मिस्किलपणानें हंसत हंसत दोष दाखविणारे आणि गोड शब्दांनीं आपली कल्पना दुसऱ्याच्या गळीं उतरविणारे. नाट्यछटाकार दिवाकर, गिरीश, माधव जूलियन, द. ल. गोखले, अज्ञातवासी प्रभृति जी मंडळी त्यांच्याकडे नेहमीं येत, त्यांच्या लिखाणावर रानडे दंपत्याची सूक्ष्म टीका नेहमीं चालावयाची व या ऋणानुबंधी लेखकाच्या वाङ्मयाला वळण लावण्याचें अज्ञात कार्य रानडे दंपत्यानें जसें त्यांना तसेंच स्वतःलाहि नकळत केलें आहे, असें म्हटल्यास तें अतिशयोक्तीचें होणार नाहीं."

"नानांची दृष्टि जशी रसग्राही आणि मार्मिक तशीच शास्त्रीयहि कशी आहे याची मजेदार आठवण मी कधींहि विसरणार नाहीं. रविकिरणमंडळानें जेव्हां सुनीतरचनेच्या प्रश्नांत ईर्षेनें मन घातलें, तेव्हां मींहि कांहीं सुनीतें लिहिलीं व तीं नाना व जिजी यांना आवडलींहि. त्यापैकीं 'शुक्रतारा' या सुनीतांतील

'किंवा ज्यांतुनि इंदिरा प्रगटली तें दिव्य हेमांबुज
या गंभीर अथांग सिंधुवरती शून्याचिया शोभतें'

या चरणांत शुक्राला दिलेली हेमाबुजाची उपमा विशेषतः डॉ. माधवराव पटवर्धन यांनीं चुकीची ठरविली. त्याचें म्हणणें असें पडलें कीं, शुक्राची द्युति शुभ्र असल्यामुळें त्याला हेमांबुजाची उपमा देणें योग्य होणार नाहीं. यावर माझें उत्तर असें होतें कीं, शुक्र ज्यावेळीं क्षितिजावर उतरतो त्यावेळीं त्याच्या कांतींतील शुभ्रता लोपून जाऊन तिला पिवळसरपणा येत असल्यामुळें त्याला

हेमांबुजाची उपमा देण्यांत चूक नाहीं. नानांना माझें हें उत्तर शास्त्रीय दृष्टीनें अगदीं समर्पक वाटलें. पण हा वाद दृक्प्रत्ययानेंच तुटण्यासारखा होता. कर्मधर्मसंयोगानें त्या दिवशीं रात्रीं आम्ही सारेच येरवड्याला यशवंतांकडे जेवावयाला गेलों व तिथेंहि हा वाद खूपच रंगला. जेवणानंतर आम्हीं जेव्हां बाहेर अंगणांत आलों, तेव्हा क्षितिजावर उतरलेला शुक्र भोंवतालच्या विद्युद्दीपांच्या रांगेंत खपून जाईल इतका पिवळसर दिसत होता. त्याच्याकडे बोट दाखवून नाना उद्गारले, ‘ अहो माधवराव, हा शुक्र पहा! गजाननरावाची उपमा अगदीं बरोबर आहे!’ मला केव्हां केव्हां असें वाटतें कीं, विज्ञानाच्या गाढ अभ्यासामुळेच नानांची कवित्वशक्ति मंदावली आणि त्याच्या वृत्तींत विलक्षण चोखंदळपणा आला. नाना आणि जिजी याना एखाद्या नव्या कवितेवरून कवीची उलट तपासणी करिताना पाहणें ही एक मोठी बौद्धिक करमणूक असे; व रविकिरणमंडळांतील कवींच्या लिहिण्यांत जो सर्वच प्रकारचा रेखीवपणा आढळतो, त्याचें श्रेय अंशतः तरी रानडे दंपत्याच्या मार्मिक टीकेला द्यावें लागेल.”

“रानडे दंपत्यानें प्रणयाच्या वासंतिक बहरांत काय कविता लिहिल्या असतील तेवढ्याच, नंतर काहीं फारशा कविता लिहिल्या नाहीत. पण त्यांचें जीवन हेंच मुळीं एक मधुर काव्य होतें. साहित्यिकांच्या ठिकाणीं सामान्यतः आढळणारा क्षुद्र अहंभाव आणि तज्जन्य मत्सरबुद्धि यानीं त्याची रसिकता डागळलेली नव्हती; व त्यामुळें त्याच्या सहवासांत अत्यंत विशुद्ध अशा उच्च बौद्धिक आनंदाचा लाभ घडत असे. स्वतःच्या कवितेविषयी किंवा जीविता-विषयीं त्या उभयतांना आपण होऊन बोलताना मीं कधींहि ऐकलें नाहीं. वस्तुतः रानडे दंपत्य हें पराकाष्ठेचें आत्मपर होतें. कित्येकांची आत्मपरता अशी असते कीं, स्वतःच्या स्तुतीबरोबर इतरांचा अधिक्षेप केल्या–ऐकल्या-शिवाय त्यांना आपलें कोडकौतुक पुरें झाल्यासारखें वाटत नाहीं. रानडे यांची आत्मपरता तशा प्रकारची नव्हती. स्वतःच्या आतरजीवनाविषयीं कधीं न बोलण्यांत जशी त्यांची अभिजात अहंता एका परीनें प्रगट होत असे, तशीच दुसऱ्या परीनें इतराच्या कलाकृतींची बूज करून त्यांना मार्मिक प्रोत्साहन देण्यातहि ती दिसून येत असे. आत्मपरतेचा खरा सात्त्विक

आनंद हा स्वतःच्या विकासाबरोबर इतरांच्या विकासाला हातभार लावण्यांत असतो. केवळ परनिंदामिश्र अशा आत्मगौरवांत नव्हे. रानडे दंपत्याच्या या विशिष्ट आत्मपरतेमुळें त्यांचें घर हें पुण्यांतील कलाप्रेमी व्यक्तींचें संकेतस्थान होऊन बसलें होतें; व कमलाच्या गाभ्यांत जशी त्याच्या परिमलाचा परिपोष करणारी कर्णिका असते, तसें त्यांचें घर हें त्यावेळीं 'महाराष्ट्र-शारदा-मंदिरा'च्या निरनिराळ्या चळवळींना प्रेरणा देणारें केंद्र होतें."

माधवरावांचें ध्येयवादी, सुधारणाप्रिय, प्रगतिशील, काव्यात्म मन अशा या वातावरणांत रमून गेलें; नवनवे प्रयोग करण्याचा हुरूप त्याला वाटूं लागला. हा काळ १९२१–२३ असा तीन वर्षांचा होता. माधवरावांच्या साहित्यिक जीवनाचा तो मंगल व उज्ज्वल प्रभातकाळ होता असें म्हटलें तरी चालेल. या काळाचें स्मरण झालें म्हणजे माधवराव पुढील काळांत म्हणत कीं, "काव्यमय स्वप्नसृष्टींत तरंगण्याचा आणि लोकमताचा बाऊ न करितां योग्य वाटेल त्याप्रमाणें निडर वागण्याचा काळ होता तो. तो काळ पुन्हां कधींहि येणार नाहीं; तसेंच त्याचें स्मरणहि कधीं बुजणार नाहीं."

महाराष्ट्र-शारदा-मंदिरात आणि रानडे यांच्या घरीं त्यांचा अनेक नवोदित व महत्त्वाकांक्षी साहित्यिकांशीं परिचय झाला. 'कांहीं तरी नवीन करण्याची आकांक्षा' बाळगणारे असे हे सारे साहित्यिक होते. या मंडळीच्या कधीं रानडे यांच्या घरीं, तर कधीं येरवड्यास कवि यशवंत याचेकडे, तर कधीं गद्रे वाड्यात माधवरावांकडे मैफली घडावयाच्या. सहभोजन, हास्य-विनोद, वादविवाद, काव्यगायन या कार्यक्रमानीं भरगच्च अशा या मैफली असत. या मैफलींतून अनेक नवीन कविता, कल्पना आणि लेखनप्रकार यांचा आविष्कार झालेला आहे.

या काळांतील माधवरावांच्या कांहीं आठवणी माडखोलकर यांनीं आपल्या 'दोन तपें' या आत्मचरित्रांत पुढीलप्रमाणें दिल्या आहेत:

"मी आणि माधवराव दोघेहि त्यावेळीं अनिकेत आणि आपद्ग्रस्त असल्याकारणानें आमचें रहस्य त्यांतल्या त्यांत जास्त होतें. मला असे अनेक प्रसंग आठवतात कीं, मध्यरात्रीं किंवा पहाटे नवीन कविता लिहिली

म्हणून किंवा झोंप येईना म्हणून, माधवराव गद्रे-वाड्यांतून उठून नारायण पेठेंतील माझ्या बिऱ्हाडीं आले आणि नंतर त्या अवेळीं चहा घेऊन आम्ही दोघे भटकावयाला बाहेर पडलों ! आमचीं दोघांचीं मनें प्रमाथी ; बुद्धि अतिशय तरळ ; व त्यामुळें झोंपहि अगदीं बेताची. त्याचा परिणाम साहजिकच असा झाला कीं, दिवसा किंवा रात्रीं जेव्हां वेळ मिळेल तेव्हां आम्ही दोघे एकत्र येत असूं आणि भटकण्यांत, गप्पा मारण्यांत किंवा कविता वाचण्यांत वेळ घालवीत असूं. रात्रीं एक-दीड वाजेपर्यंत 'कवि-कातळा'वर बसून गप्पा मारल्या, नंतर गद्रे-वाड्यांत येऊन ओव्हलटीन घेतलें, आणि मग घरीं येऊन अंथरुणावर पडलों, तोंच माधवराव येऊन म्हणाले, 'उठा, गजाननराव ! आतां तुम्ही गेल्यावर हें सुनीत लिहिलं न तसंच तुम्हांला दाखवावयाला घेऊन आलों. कसं काय वाटतंय, पाहा तर !' नंतर पुन्हा चर्चा, पुन्हा चहा, पुन्हा गद्रे-वाड्यांत हेलपाटा, पुन्हा ओव्हलटीन !! अशी त्या काळांतील आम्हां दोघां कलंदरांची रोजनिशी लिहितां येईल. मी 'रोजनिशी' हा शब्द मुद्दामच योजला आहे. कारण, या वर्ष-सव्वा वर्षांत ज्या कविता माधवरावांनीं लिहिल्या, त्या एका छोट्या, खिशांत मावण्याजोग्या वहींत, रचनेची वेळ, तारीख आणि जागा यांच्यासह लिहून, त्यांनीं मला ती वही नजर केली होती. पुढें आमच्यांत विकल्प आल्यावर त्यांनीं ती वही परत मागून घेतली. माधवरावांसारखा वादळी मनोवृत्तीचा प्रेमळ मनुष्य मीं अद्याप पाहिलेला नाहीं. यशवंतरावहि तसे क्षोभसुलभ आहेत. पण ते स्वतःला आवरूं शकतात. माधवरावांचें तसें नव्हतें. कविता वाचताना किंवा ऐकतांना त्यांच्या डोळ्यांत चटकन् पाणी येई. गप्पांच्या भरात बोलतां बोलतां ते थांबत आणि कविता लिहीत. असेच एक दिवस दुपारीं गद्रे-वाड्यात आम्हीं एकमेकांच्या गतायुष्याविषयीं गप्पा मारीत बसलों असतां, माधवरावांनीं बोलतां बोलतां एकदम थांबून झपाट्यानें एक सुनीत लिहिलें आणि तें लगेच मला वाचून दाखविलें. तें सुनीत पुढें दिलें आहे.

**मैत्रीचा सहजीं निघे विषय तो संभाषणौघामधीं ;**
**चित्ताच्या नयनांपुढें मग उभी राहूनि मित्राऽऽकृती**

**बोले होउनि कंठ रुद्ध मज तो, "पूजाई त्याची स्मृति !**
**मृत्यूनेंच दुराविलें जगिं तया – दुर्वार तो पारधी !**
**गेले दीस किती सुखांत असतां संगें जिवाचा सखा !**
**गोष्टी बोलत ती पहाट कितिदा होऊनि गेली बरें !**
**होई जों स्मृति तोंच सोबत मुकी द्यायास धांवे त्वरें,**
**—आहे भाव तसा जिताच अमुचा कृष्णार्जुनांसारखा !"**

**झाला तो मग गप्प आणि वदनीं माझ्या बघूं लागला—**
**माझा मी इतिहास दुःखद कसा सांगूं तयाला तरी !**
**डोळ्यांनीं बघतों दुरूनि तुजला मी पूजितों अंतरीं—**
**तूं मी आज असूनि काळ अपुला होता सुखी मागला**

**घोळे हाच विचार निष्क्रिय यदा मी एकटा रात्रिंचा—**
**मित्राचा पुरवेल मृत्यु; न परी केव्हांहि तो मैत्रिचा !**

अशा कितीतरी कवितांची हृदयस्पर्शी कहाणी मी सागूं शकेन."

माधवरावांचा अशा प्रकारें जरी समान अभिरुचीच्या मंडळींत, काव्यशास्त्र-विनोदांत काळ चालला होता, तरी त्यांच्या मनाला समाधान नव्हतें. आर्थिक आणि कौटुंबिक गुंतागुंतीच्या प्रश्नांनी ते जाजावून गेले होते. बडोदें सोडलें त्या वेळेला त्यांना वाटलें होतें, कीं आपल्या शक्त्यनुसार आपण आपल्या कुटुंबाला मदत केली म्हणजे आपले आयुष्य आपल्या मनाप्रमाणें आंखावयाला व त्याप्रमाणें तें घालवायला आपण स्वतंत्र राहूं. पण ती त्यांची कल्पना पुण्यास आल्यावर फोल ठरूं पाहात होती. आग्रही, हट्टी, एककल्ली, असहिष्णु अशा कौटुंबिक मंडळीशीं त्यांची गांठ पडली होती. या मंडळीची माधवरावांशीं एकंदर वागणूकच अशी होत होती कीं, त्यामुळें त्यांच्या मनाला स्वास्थ्य मिळूंच नये. गृहस्थ म्हणून आयुष्यात स्थिर होण्याचा ज्या ज्या वेळीं त्यांनीं विचार करावा, त्या त्या वेळीं अनपेक्षितपणें ते, कुटुंबियांच्या चमत्कारिक वागणुकीमुळें आर्थिक किंवा कौटुंबिक अडचणींच्या पेंचांत सांपडावेत, आणि त्यांतून बाहेर पडतां पडतां त्यांना नको जीव व्हावा. बाह्यतः ते सुखी दिसत; काव्यशास्त्रविनोदांत, सहलींत, साहित्यिकांच्या

सहभोजनांत, नौकाविहारांत, गिर्यारोहणांत कविकातळावरील काव्यगायनांत, टेनिसच्या खेळांत त्यांची होणारी कालक्रमणा पाहून त्यांच्या जीवनाबद्दल अनेकांना हेवाहि वाटला असेल. त्याच्या अस्वस्थ आंतरजीवनाची, त्यांच्या एक-दोन अंतरंग मित्राखेरीज, क्वचितच कोणाला कल्पना आली असेल. जगाच्या गर्दीत मिसळून त्याच्या नाना रंगांत रंगतांना दिसणारे माधवराव, त्या गर्दीपासून जेव्हां दूर होत, स्वतःच्या घरट्याकडे परतत, तेव्हां त्याची प्रतिक्रिया होऊन त्यांचे सारें अंतर्याम दुःख-विषादानें ढवळून निघे, मनांत विचारांचें कोलाहल माजे. एकान्त असह्य होई आणि

बाहेर काजळी मेघावृत आकाश
अन्तरहि तमोमय होउनि जाय निराश.
ध्वनि सर्व निमाले गमती या एकान्तीं,
हा टकटकणारा काळ मात्र सांगाती !

अशी परिस्थिति होऊन हृदय आक्रंदूं लागे; आपला दुःखभार हलका करण्यासाठीं, स्वतःचें सांत्वन करून घेण्यासाठीं तें आतुर होई. कधीं तें, "कोणत्या स्वरूपीं प्रभो, तुला मी पाहूं? ये धाव, आसवें पूस, पसर तव बाहू," असा टाहो फोडी; तर कधीं तें कल्पनासृष्टींतील आईला

प्रेमस्वरूप आई ! वात्सल्यसिंधु आई !
बोलावुं तूज आतां मी कोणत्या उपायीं ?

तूं माय, लेकरूं मी; तूं गाय, वासरूं मी;
ताटातुटी जहाली आतां कसें करूं मी ?

गेली दुरी यशोदा टाकूनि येथ कान्हा,
अन् राहिला कधींचा तान्हा तिचा भुका ना ?

.....................................

ही भूक पोरक्याची होई न शांत आई,
पाहूनिया दुज्यांचें वात्सल्य लोचनांहीं.

वाटे इथूनि जावें, तूझ्यापुढें निजावें,
नेत्रीं तुझ्या हसावें, चित्तीं तुझ्या ठसावें !
वक्षीं तुझ्या परी हें केव्हां स्थिरेल डोकें,
देईल शांतवाया हृत्स्पंद मंद झोके ?

अशी आर्ततेनें हांक मारूं लागे. त्या काळातील त्यांच्या कितीतरी रात्री अशा स्थितींत जात. माता, पिता, बंधु, भगिनी हीं सारीं असून त्यांना नसल्यासारखीं होतीं. त्याच्याकडून ज्या प्रकारच्या मायेची, वात्सल्याची, स्नेहाची, प्रेमाची, जिव्हाळ्याची ते अपेक्षा करीत तीं त्याना त्यांजकडून कधींहि मिळालीं नाहींत; उलट त्यांजकडून त्याना उपद्रव सतत होत गेला. त्यामुळें त्यांच्यातील एकलेपणाच्या दुःखाची तीव्रता अधिकाधिक वाढत जाऊन त्यांचें आतरजीवन वादळी बनलें आणि प्रक्षुब्ध भावनांच्या प्रचंड लाटा उठून, हृदय हादरून सोडणारा त्यांचा स्फोट काव्यद्वारा होऊं लागला.

माधवरावांना प्रत्यक्ष मातेच्या मायेची पांखर जरी मिळाली नाहीं, तरी त्याची उणीव ज्यानीं कधीं स्वतःच्या हयातीपर्यंत त्याना भासूं दिली नाहीं अशाहि काशीताई हेर्लेकर याच्यासारख्या व्यक्ति त्याना आयुष्यांत सुदैवानें लाधल्या होत्या. त्याचें स्मरण झालें म्हणजे त्याचें हृदय कृतज्ञतेनें भरून येई, आणि पुढील उद्गार त्याच्या लेखणींतून कवनरूपानें बाहेर पडत.

नाहीं तुझ्या मी पोटचा गोळा परी
'आई !' म्हणूनी हाक मारी वैखरी.
नाहीं तुझ्या दुग्धावरीही पोसलों
कोठूनि लागे ओढ ऐशी अंतरीं ?
स्वप्नींहि नाहीं पाहिलें बाल्यीं तुला,
कां भाव बाल्यांतील हा येई वरी ?
गेली तिशी लोटूनि अन् मी बाल का ?
कां ऐन वैशाखीं नवी वाहे झरी ?
माझे न केले लाड तूं केव्हां, तशी
केली तुझीही मी न केव्हां चाकरी.

**आश्चर्य कीं तूं दृक्पथीं येतां क्षणीं**
**निःशब्द पूजा मी तुझी चित्तीं करीं.**
**संतुष्ट मी दृष्टिप्रसादें तूझीया**
**तत्काल औदासिन्य माझें तीं हरी.**
**माझें तुझें नातें कधींचें कोठलें ?**
**ही काय माया, योजना वा ईश्वरी ?**
**माझी मला कांहीं कळेना पात्रता,**
**तैशीच तूझ्या थोरवीची पायरी.**

पुत्रवत् प्रेम करणाऱ्या स्त्रीच्या सहवासाचा ज्याला अनुभव आला असेल, त्यालाच वरील उद्गारातील उत्कटतेची, उदात्ततेची व ते व्यक्त करणाऱ्या कवीच्या अनन्यसाधारण वृत्तीची कल्पना येईल. मराठी कवितेंत सहसा न आढळणारी ही वृत्ति आहे. या वृत्तीचा अनुभव मराठी कवींना नसल्यामुळें पुष्कळदां तिजवर अनैसर्गिकतेचा आरोप केला जातो. पण या वृत्तीत जो प्रचंड आवेग प्रत्ययाला येतो तो अनुभवाशिवाय उद्भूत होणेंच शक्य नाहीं.

माधवराव या सुमारास फार्सी वृत्ताचा उपयोग करून विविध प्रकारच्या कविता लिहूं लागले होते. त्यांतील शब्दचित्रांचा प्रकार मराठी कवितेंत अगदीं नवीन होता. त्याचें अनुकरण यशवंत, गिरीश व इतर कवि करूं लागले. यशवंत-गिरीश यांनीं १९२२ सालीं प्रसिद्ध केलेल्या 'वीणाझंकार' या कविता-संग्रहांतील 'पूर्तता,' 'स्थानभ्रष्ट फुलास,' 'लाजविलेला गुलाब' या कविता या अनुकरणाचेंच उदाहरण होय. 'कुमारी पिरोजा' वगैरे कवितांत शब्दचित्रें यशस्वी रीतीनें काढून व रंगवून अर्वाचीन मराठी कवितेंत माधवराव एक महत्त्वाची भर टाकीत होते.[६] इंग्रजी 'सॉनेट' ला 'सुनीत' असें नांव सुचवून तो काव्यप्रकार मराठींत रूढ होण्यासाठीं त्यावर एक चर्चात्मक लेख

[६] 'कुमारी पिरोजा' या कवितेंतील शब्दचित्राप्रमाणें कवि नारायण वामन टिळक यांनीं यापूर्वी 'एक अमेरिकन मुलगी' या आपल्या कवितेंत शब्दचित्र रंगविण्याचा यशस्वी प्रयत्न केला आहे. पण हा एवढाच प्रयत्न.

ज्ञानप्रकाशांत [७] प्रसिद्ध करून व आपल्या कविमित्रांना रचना करावयाल लावून, त्यांनीं जोरानें चळवळ सुरू केली. १९२३ सालीं (ता. ३ मार्चपासून) 'ज्ञानप्रकाश' पत्राची 'काव्य-शास्त्र-विनोद' या नांवानें माडखोलकर यांच्या संपादकत्वाखालीं एक साहित्यविषयक पुरवणी प्रतिशुक्रवारीं निघूं लागली. या पुरवणींत माधवरावांची कविता नियमानें प्रसिद्ध होऊं लागली. त्यांत माधवरावांच्या "ज्या प्रणयपर कविता प्रसिद्ध होत, त्याना अनेकानीं आक्षेप घेतला." माडखोलकर आपल्या 'दोन तपें' या पुस्तकांत लिहितात: "आबेकरांकडील [८] अड्डयावर जी प्राध्यापक किंवा लेखकमंडळी जमत, ती या कविता उत्तान ठरवून त्या 'ज्ञानप्रकाशा'त येऊं देणें सदभिरुचीला सोडून आहे, असें आग्रहानें म्हणत. विशेषतः जुन्या पिढींतील नामांकित वैयाकरण रा. भि. जोशी हे मला वाटेंत केव्हांहि भेटले म्हणजे हटकीत, 'का हो माडखोलकर, हा माधव जूलियन कोण गांठलाय तुम्ही? काय चावट कविता लिहितो हो! आमचा ज्ञानप्रकाश पोरीबाळींसुद्धां वाचतात. त्यांत असल्या फाजील न् पांचट कविता कशा छापता तुम्ही?' पण, कोणाचीहि असली कोणतीच टीका मनावर न घेतां, आपल्याला योग्य वाटेल तें गद्यपद्य लिखाण 'काव्य-शास्त्र-विनोदां'तून प्रकाशित करण्याचा क्रम मीं अव्याहत चालू ठेवला. रामभाऊंसारख्या मंडळींची ही नित्य कानावर पडणारी तक्रार जेव्हां मीं एक दिवस माधवरावांना सांगितली, तेव्हां त्यांनीं लगेच पुढील सुंदर सुनीत [९] लिहून तें मला दिलें.

'हा रोमांटिक चालला कवि पहा,' ऐसें कुणी बोलती,
आली पाहुन मासिकांत कविता हेवाहि वाटे कुणा
एकान्तांत कुणी रसज्ञ विरला आनंदुनी डोलतो;
टीकाकार कुणी दुरून मिळवी संग्राह्य खाणाखुणा.

---

[७] ता. २१ एप्रिल १९२३ [८] ज्ञानप्रकाशचे एक उपसंपादक.

[९] 'तुटलेले दुवे,' क्र. २७; पहिली ओळ, या परिष्कृत आवृत्तींत, "तो काव्यात्म खुळा पहा कवि अहो' ऐसें कुणी बोलती," अशी आहे.

**मी ‘काव्यं यशसे’ म्हणून धरिली नाहीं करीं लेखणी,**
**किंवा ‘अर्थकृते’ म्हणून नकली स्तोत्रें न मीं गाइलीं,**
**सांगावा उपदेश ही न मजला इच्छा न अंगेजणी; —**
**प्रीतीची कविता कशास लिहिली ? कोणास ती वाहिली ?**
**सारें हृद्गत गोड मी तुजपुढें काव्यामधें ठेविलें.**
**नजराण्यावर वस्त्र टाकुनि जसा थोरापुढें ठेविती,**
**गे कोठून उपायनें तुज कमी ? श्रीमंत तूं दुर्मिळे,**
**बंदे नोकर कोपऱ्यामधिं तया राशीवरी फेकिती.**
**‘बोला काय असेल अर्ज’ म्हणशी बोलूं तरी काय गे?**
**आशेचे तुकडे धरून हृदयीं जातों, नमस्कार घे.**

पुढें रा. भि. जोशी यांनीं ‘मराठी भाषेची घटना’ या आपल्या ग्रंथाची द्वितीयावृत्ति काढण्याचें जेव्हां ठरविलें, तेव्हां माझी गांठ घेऊन त्या आवृत्ती-साठीं आधुनिक कवितेसंबंधींचा भाग लिहिण्याची व त्या ग्रंथांतील एकंदर वाङ्मयविषयक भागावर नजर टाकण्याचीहि त्यांनीं मला विनंति केली. मीं तें काम आनंदानें पत्करलें आणि त्यांना सुचविलें, ‘रामभाऊ, तुमच्या या ग्रंथात आधुनिक कवितेच्या परामर्षाबरोबरच आधुनिक चलनी वृत्तांचीहि माहिती यायला नको का? ती आल्यास पुस्तकाला पूर्णता येईल. आमचे माधवराव तुम्हांला हवा असल्यास त्यावर एक स्वतंत्र लेख मुद्दाम लिहून देतील.’ रामभाऊंना ती कल्पना पसंत पडली व तदनुसार माधवरावांनीं चलनी वृत्तांवर लिहिलेला लेख द्वितीयावृत्तींत घालण्यांत आला. हा लेख घेऊन जेव्हां आम्ही दोघे रामभाऊंच्या घरीं गेलों, तेव्हां मीं त्यांना म्हटलें, ‘तुम्ही ज्यांच्या चावट कविता ‘काव्य-शास्त्र-विनोदां’त छापल्याबद्दल मला येतां जातां दोष देतां ना, तेच हे माधव जूलियन बरं का, रामभाऊ!’ बिचारे वृद्ध रामभाऊ त्या गौप्य-स्फोटानें गार होऊन गेले. त्या प्रसंगानंतर कांहीं त्यांनीं पुन्हा माधवरावांच्या कवितेबद्दल एक चकार शब्द मजजवळ काढला नाहीं.” १९२१ पासून मुंबईच्या ‘नवयुग’ व ‘महाराष्ट्र–साहित्य’ या मासिकांतून माधवरावांच्या कविता प्रसिद्ध होऊं लागल्या होत्याच.

या काळांत (१९२२-२३) काव्यलेखनाव्यतिरिक्त त्यांनीं 'सुनीत' 'भाषांतर व रूपांतर,' 'कांहीं नवीन चलनी वृत्तें,' 'गजलांजलि' असे चर्चात्मक लेख लिहिले. 'कांहीं नवीन चलनी वृत्तें' या लेखांत मराठी पद्याचें वृत्तदृष्ट्या पृथक्करण करून कांहीं सर्वसामान्य असे गण व ओळी शोधून काढिल्या आहेत. हा लेख ज्ञानकोशकारांनीं 'कोशा'च्या पांचव्या भागांत समाविष्ट केला. छंदःशास्त्राच्या इतिहासांत त्याला स्थळ मिळाल्याचें पाहून माधवरावांना समाधान वाटलें, आणि या विषयावर अधिक संशोधन करावें असा विचार त्यांच्या मनांत घोळूं लागला. पण त्या वेळेस त्यांनीं एक मोठें काम हातीं घेतलें होतें. रा. ब. साने यांच्या 'भाऊसाहेबांच्या बखरी'साठीं त्यांनीं जो शब्दकोश तयार केला, त्याचें काम साने यांस पसंत पडून त्यांनीं त्या वेळेस जे प्रशंसापर उद्गार काढले त्यामुळें एक प्रकारचा हुरूप येऊन त्यांनीं 'फार्सी-मराठी कोश' तयार करण्याची एक योजना आंखून ऐतिहासिक कागद-पत्रें व एकनाथापासून प्रभाकरापर्यंतचे मराठी ग्रंथ वाचून त्यातून शब्द गोळा करण्याचा उद्योग सुरू केला होता. हा उद्योग चार-पाच वर्षें चालणारा होता. त्यामुळें 'छंदा'वरील संशोधनाचें काम 'कोश' हातावेगळा झाल्यावर करावयाचें असें ठरवून, ते मिळेल तेवढा वेळ जुन्या ग्रंथाच्या वाचनात घालवूं लागले होते. १९२३ च्या अखेरी अखेरीस तर त्यांत ते पुरे गढून गेले. त्यांच्या आवतीं भवतीं बखरी, लावण्या-पोवाड्याचे ग्रंथ, एकनाथ, मुक्तेश्वर, दासोपंत, श्रीधर, मोरोपंत यांचीं काव्यें, खरे, राजवाडे, साने, पारसनिस याचे ऐतिहासिक लेखसंग्रहाचे ग्रंथ यांचा पसारा दिसूं लागला. काव्यरचनेकडून कोशरचनेकडे ते वळलेले पाहून, माडखोलकरासारखे त्यांचे स्नेही त्यांच्या बैठकींत कोणाला घेऊन आले म्हणजे त्यांजकडे अंगुलिनिर्देश करून, 'कार्यमग्न असलेला हा आमचा महान् कोशकार पहा,' असें थट्टेनें म्हणून त्यांचा परिचय करून देत, आणि माधवराव मध्येंच वर पाहून उद्गारीत, "शहाजी **सख्तगो** म्हणून पातशहांशीं पटत नाहीं!" —"आईसाहेबांचा स्वभाव **बस्वासी** फार..."

१९२३ च्या द्वितीयार्धांत, श्रीधरपंत रानडे नोकरीनिमित्त लवकरच पुणें सोडून सुरतेस जाण्याचें घाटूं लागलें. कविकातळावर त्याचप्रमाणें रानडे

यांचे घरीं किंवा इतरत्र रविवारच्या दिवशीं नियमानें जमणाऱ्या ठराविक मंडळीपैकीं आणखीहि एक–दोघे स्थलान्तर करण्याच्या विचारांत होते. तेव्हा इतके दिवस काव्य-शास्त्र-विनोदांत एकत्र घालविलेल्या दिवसांची स्मृति म्हणून एक लहानसा कवितासंग्रह प्रसिध्द करावयाचें मंडळींत ठरलें. कविता निवडल्या गेल्या, कांहीं नव्यानेंच तयार केल्या. रविवारीं नियमानें एकत्र जमणाऱ्या ठराविक मंडळीचाच हा संग्रह असल्यानें तो प्रसिद्ध करणाऱ्या मंडळीचें नांव ‘ रविकिरणमंडळ ’ असें ठेवण्यात आलें. मंडळाच्या या प्रथम प्रकाशनाला ‘ किरण ’ असें नाव देण्यांत येऊन, ‘ एका ध्येयध्रुवाभोंवतीं परिभ्रमण ’ हा विचार व्यक्त करणारें सप्तर्षींचें प्रतीक सुचविण्यांत आलें. या ‘ किरणा ’चें प्रकाशन ता. ९ सप्टेंबर, १९२३ या दिवशीं, मंडळाच्या परिचयाच्या एका गृहस्थाच्या पुनर्विवाहसमारंभाच्या वेळीं करण्यात आलें.

माधवराव, माडखोलकर, यशवंत, गिरीश, द. ल. गोखले, श्रीधरपंत रानडे, सौ. मनोरमाबाई रानडे यांच्या कविता व दिवाकर याच्या नाट्यछटा यांत देण्यांत आल्या होत्या. रविकिरणमंडळ हें ह्या आठ व्यक्तींचें बनलें.

‘ किरण ’ ही एक ३२ पृष्ठांची छोटी पुस्तिका होती. पण तिनें मंडळाला जी प्रसिद्धी मिळवून दिली ती मात्र मोठी होती. विशेषतः माधवरावांना तिनें चांगलेंच प्रकाशांत आणलें. त्याचे लेख व कविता हीं नियतकालिकांतून या काळांत जरी प्रसिद्ध होऊं लागलीं होतीं तरी त्यांची कृति अद्यापि कोणाच्या डोळ्यांतहि भरली नव्हती आणि कोणाच्या डोळ्यां-वरहि आली नव्हती. पण त्या काळचे एक अग्रेसर विद्वान् टीकाकार बाळकृष्ण अनंत भिडे यांनीं मुंबईच्या ‘ विविधज्ञानविस्तार ’ या ज्येष्ठ व श्रेष्ठ मासिकांत जी कडक पण गुणग्राही टीका केली, त्यामुळें ‘ रविकिरण–मंडळ ’ हें तरुण रसिक वाचकवर्गांत कुतूहलाचा विषय होऊन बसलें. भिडे यांनीं ‘ किरणा ’ची संभावना पुढील शब्दात केली होती : “ हीं सर्वच कवनें अत्यंत मोहक उतरलीं आहेत. त्यांचें रचनाचातुर्य, श्रवणमाधुर्य, भावना-तरलत्व, कल्पनाकौशल्य व विकारोन्माद कोणाहि तरुणाच्या अंतःकरणास मारून टाकल्याशिवाय राहणार नाहींत. पण या शृंगारिक कवनांचें भयंकरत्व काव्यप्रतिभेच्या दीप्तीनें दुणावलें आहे. चावणाऱ्या विषारी दातांच्या अगर

कापणाऱ्या तीव्र शस्त्राच्या सुभगाकाराचें, तेजस्वी पाण्याचें, किंवा कुशाग्रतेचें कौतुक आम्हीं कोणत्या तोंडानें करावें ? कवंडळाची कांति, वेस्वेचें लावण्य, मदिरेचा सुवास, विषाचें माधुर्य, शठांचें साधुत्व व प्रस्तुत कवनांचें प्रतिभासंपन्नत्व, हीं परिणामीं सारखींच घातक होणारीं आहेत. एकोणिसाव्या शतकाच्या आरंभाच्या सुमारास रावबाजीच्या चैनबाजींत उद्भवलेल्या अनंतफंदी, परशराम, होनाजी बाळ, प्रभाकर, इत्यादि वागीश्वरांचे सुधारलेले अवतार विसाव्या शतकाच्या आरंभीं पुन्हां होणार, अशीं दुश्चिन्हें स्पष्ट दिसूं लागलीं आहेत. पुढील छकडा–लावण्याच्या उदयाचा हा अरुणकिरण आहे, असें म्हटलें तरी चालेल." याच टीकालेखांत माधवरावांच्या कवितेसंबंधीं लिहितांना त्यांनीं पुढीलप्रमाणें अभिप्राय व्यक्त केला होता. "माधव जूलियन हे पुण्यात पुलाजवळच्या वळणावर भेटलेल्या 'बेहेस्तांतील परी'चे लोकलाजेस्तव 'भाऊ' म्हणवतात, परंतु 'वनकिशोरी'शीं गांठ पडल्याबरोबर लोकलज्जेचें भय नसल्यामुळें त्यांनीं सर्व आडपडदा दूर सारून, कुंजविहाराचा आपला हक्क उघड उघड पुढें मांडला आहे. चटोरपणांत माधव जूलियन धाडसी आहेत, हें निभ्रांत कबूल केलें पाहिजे." भिडे यांच्या टीकेमुळें 'मंडळा'च्या प्रसिद्धीला जरी एक प्रकारचें साह्य झालें तरी दुसऱ्या परीनें त्यांतील माधवरावांसारख्यां-संबंधीं गैरसमज निर्माण करून त्यांची कांहीं अंशीं लौकिक हानी होण्यासहि ती कारणीभूत झाली. पण त्याची तमा माधवरावांनीं किंवा 'मंडळां'तील दिवाकरांसारख्या[१०] सोवळ्या सदस्याखेरीज इतरांनीं बाळगली नाहीं. उलट, ही टीका हें एकप्रकारचें आव्हानच समजून त्यांनीं चढाईचेंच धोरण स्वीकारलें. सहा महिन्यांच्या आंत 'काव्यविचार' आणि 'उषा' हीं दोन पुस्तकें त्यांनीं लागोपाठ प्रसिद्ध केलीं व जें 'किरण' मंडळाचें 'पहिलें आणि शेवटलेंच पुस्तक होईल असें वाटलें होतें तें २५ पुस्तकांचें पूर्वंग झालें !'

मंडळानें आपलें कार्य असें निडरपणें जरी चालविलें होतें, तरी त्याचा मत्सर करणारा व हेतुपुरस्सर त्याचे विरुद्ध रान उठविण्याच्या उद्योगांत

१० 'किरणा'वर जी जाहीर व खासगी टीका होऊं लागली तीमुळें यांनीं 'मंडळा'चें कांहीं दिवसांनीं सदस्यत्व सोडलें.

असलेला पुण्यांत एक कंपु निर्माण होत होता. विशेषतः माधवरावांचे विरुद्ध वातावरण कुलुषित करावयास जीं जीं साधनें हाताशीं येतील त्यांचा उपयोग करावयास टपलेले असे त्यांचे कॉलेजांतील कांहीं सहकारी या कंपूंत होते. माधवरावांचीं ' किरण ' व ' काव्य-शास्त्र-विनोद ' यांतील प्रणयगीतें व त्यांवर होणारी टीका यांचा ते उपयोग करून घेत होतेच, पण माधवरावांच्या प्रत्येक हालचालीवर लक्ष ठेवून त्यांना समाजांतून उठवता येईल कसें याचाहि ते कसून प्रयत्न करीत होते. माधवरावांच्या लक्षांत ही गोष्ट फार उशिरां आली. बडोद्याची पुनरावृत्ति पुण्यासहि होत आहे हें पाहून ते थक्कच झाले. रा. वि. म. याना ते लिहितात. [११] " मध्यंतरीं येथें एक पुनर्विवाह झाला. त्या नवदांपत्याबरोबर गिरिसहलीस जाण्याचा योग मी, नाना रानडे व यशवंत असा त्रिवर्गास आला होता. आमच्या कॉलेजातील XXXXX ही विद्यार्थिनीहि बरोबर होती. आम्हीं सर्वत्रांनीं त्या खळाळाखालीं स्नाने केलीं; दैवयोगानें पुन्हां बुंदीचेच लाडू चापले ! यावेळीं रानफुलांना बेसुमार बहर आला असल्यामुळें मौज विशेष केली. त्याच दिवशीं सायंकाळीं एक अनिष्ट हकिगत कळली. आमच्या कॉलेजांत विद्यार्थीसमाजांत व इतरत्र शहरांत मजविषयीं भयंकर गैरसमज व दुर्लौकिक आहे अशी खात्रीलायक माहिती मिळाली. बडोदें सोडल्यावर बेवहीम व निर्मळ वातावरणात मला वावरायला मिळेल ही आशा निराधार ठरली. आणि आतां यापुढें करावें तरी काय हेंच मला सुचेनासें झालें आहे. माझ्या कवितांनीं मला पुष्कळच अपकीर्तीची जोड करून दिली आहे ! कर्मणा गहनो गतिः ! " यानंतरच्या आणखी एका [१२] पत्रांत ते लिहितात: " आमच्या बोर्डानें [१३] टेनीस कोर्टावर लाईफ मेंबर व्यतिरिक्त कोणीं खेळूं नये असा ठराव केला. रा. नाना रानडे यांचें खेळणें बंद झालें ! प्रो. जोग यांनीं कॉलेजातील मुलींशीं तहहयात तरुण सभासदांनीं खेळणें—विशेषतः केशकलाप पाहून ज्याना काव्यस्फूर्ती होते अशानीं खेळणें—गर्ह्य,

[११] ता. १ ऑक्टोबर १९२३

[१२] ता. २६ नोव्हेंबर १९२३. [१३] डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या आजीव सभासदांचा बोर्ड.

अनुचित आहे असें म्हटलें. रोख कुणावर होता हें तुला कळेलच. मला उठून सणसणीत प्रत्युत्तर द्यावें लागलें. प्रो. देवधर व प्रो. आपटे यांनींहि प्रो. जोगांवर टीका केली. आणि सुधारक म्हणविणाऱ्याचें अंतस्थ अनौदार्य व पुच्छगामित्व गर्ह्य आहे असें सांगितलें."

माधवरावांचें काव्यलेखन त्यांना कीर्तीपेक्षां त्यांच्या लौकिक हानीलाच अशा रीतीनें हलुहलु कारणीभूत होत होतें. त्यांच्या साहित्यिक जीवनाची प्रभात नुक्ती कुठें सुरू झाली होती, तोंच गैरसमजांचें धुकें भोवतीं पसरूं लागलें होतें.

# ८

## धुक्यांतून

प्रारंभीं प्रारंभीं दुर्लक्षिण्यासारखें वाटणारें गैरसमजाचें धुकें, अधिकाधिक दाट होत चाललें होतें. 'जनापवादाची एक लाट उचंबळून माझ्या डोक्यावर आपटून ओसरली! माझी दिनचर्या चाललीच आहे' असें फेब्रुवारींत (१९२४) स्वस्थ चित्तानें रा. वि. म. ना लिहिणारे माधवराव त्याच्या दुसऱ्याच महिन्यांत, डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या आजीव सेवकांच्या सभेंत, त्यांचे विरुद्ध असलेल्या गटानें, 'या गृहस्थांची वर्तणुक पूर्णपणें संशयातीत आहे असें आम्हांस वाटत नसल्यामुळें, जोपर्यंत ते संस्थेंत काम करीत आहेत तोपर्यंत आम्हीं काम करूं शकणार नाहीं' अशा अर्थाचें धमकीचें पत्र धाडलेलें पाहतांच स्तिमितच झाले. त्यांच्याभोंवतीं जमत चाललेल्या धुक्याच्या घातकी स्वरूपाची त्यांना त्या वेळेपर्यंतहि नीटशी कल्पना नव्हती. कोशरचनेंत, काव्यानंदांत, सहलींत व सहभोजनांत ते गुंगलेले होते. स्वतःभोंवतीं एक तात्पुरता तट उभारून त्यांतच ते वावरत होते; त्याच्या बाहेर पाहण्याची त्यांना आवश्यकता भासली नाहीं. आपलें जीवन हें खासगी आहे, त्यांत कोणाला काय डोकावण्याची जरूर, अशीच त्यांची भावना. पण जग या भावनेची थोडीच कदर बाळगतें!

आजीव सेवकांच्या सभेंत आलेल्या या पत्रांतील आरोप ज्या 'किंवदंती'च्या आधारावर केलेला होता ती किती वस्तुस्थितीला सोडून व अतिरंजित आहे हें माधवरावांनीं प्रो. नाईक, प्रो. कोल्हटकर, प्रो. पी. एम्. लिमये यांसारख्या आजीव सेवकास खुलासेवार समजून सांगितलें व तें त्याना पटलेंहि. एक पंधरवड्यानंतर विरोधी गटाकडून पुन्हां लेखी आरोप करण्यांत येऊन, 'पटवर्धन यांना कांहीं काळपर्यंत कामावरून दूर करण्यांत यावें,'

असा ठराव आजीव सेवकांच्या सभेंत मांडण्यांत आला. या ठरावावर सबंध दिवस चर्चा झाली. पण प्रो. नाईक, प्रो. कोल्हटकर, यांसारख्या सोज्वळ, जुन्या वळणाच्या सज्जन मंडळींनें माधवरावांचा पाठपुरावा केल्यामुळें आणि असा ठराव मंजूर होण्यास आवश्यक तें मताधिक्य न मिळाल्यामुळें तो मंजूर होऊं शकला नाहीं. हें पाहून या विरोधी गटानें संप करण्याचा व त्यायोगें गव्हर्निंग बॉडीस या प्रकरणीं लक्ष घालावयास भाग पाडण्याचा निर्धार व्यक्त केला. प्रकरण या थरावर आलेलें पाहून प्रि. परांजपे व प्रि. भाटे याच्या सूचनेवरून आजीव सेवकांची पुन्हां एक सभा बोलविण्यांत आली. या सभेस माधवराव, परीक्षेच्या कामासाठीं मुंबईस आल्यामुळें, हजर राहूं शकले नाहींत. आपल्याविषयीं सहानुभूति बाळगणारे सहकारी मागील सभेप्रमाणेंच आपला पाठपुरावा करतील असा त्यांना विश्वास वाटत होता. पण या सभेंत जेव्हां, 'पटवर्धनांनीं दोन वर्षांची निर्वेतन रजा घ्यावी ; या मुदतींत त्यांनीं पुण्याबाहेर नोकरी करण्यास हरकत नाहीं' अशा अर्थाचा ठराव आला तेव्हां यापूर्वी सहानुभूति बाळगणाऱ्यांपैकीं कांहींनीं त्याला विरोध न केल्यामुळें तो मंजूर झाला व विरोधी गटानें अशा रीतीनें अंतीं विजय मिळविला. माधवरावांच्या माथीं आकाशींची कुऱ्हाडच पडली.

माधवराव या वेळेस सुरतेस श्रीधरपंत रानडे यांजकडे, हवापालटीसाठीं येऊन राहिले होते. त्यांना, आजीव सेवकांच्या सभेचा वरील निर्णय ऐकून धक्काच बसला. विशेषतः आपण ज्यांना 'आपले' म्हणत होतों आणि ज्याच्यावर विश्वासून आपण निश्चिन्त होतों त्यांनीं आयत्या वेळीं अवसानघात करून आपल्याला तोंडघशीं पाडलें हें पाहून ते हतबुद्धच झाले. रा. वि. म. ना ते लिहितात: "आज तिशी उलटली......एकामागून एक हृदयाशीं बाळगलेल्या आशा नष्ट झाल्या! न ऐहिक जीवन गोड झालें ; न पारलौकिक सुखाची जोड करून ठेविली. न कुटुंबांत मान्यता मिळविली, न जनांत थोरवी कमाविली. पूर्ण अपेश हें मात्र साधिलें. कांहीं मित्र जोडिले ; परंतु या रुक्ष जगांत मिळालेल्या अनुभवामुळें जी एक सार्वत्रिक साशंकता हृदयीं बाणली तिनें मैत्रीच्या दुधात मिठाचा खडा टाकला. एका दृष्टीनें मी शांति अनुभवीत आहें, परंतु हें लक्षण चेतनेचें कीं मृतीचें, कळत नाहीं."

# माधव जूलियन

फर्ग्युसन कॉलेजांतील या घटनेसंबंधीं अनेक तऱ्हेच्या दंतकथा रचल्या गेल्या आहेत. कित्येकांना त्यांत कांहीं तरी विलक्षण रहस्य आहे असें वाटतें, तर कित्येक त्यांत माधवरावाच्या काव्यात्म जीवनातील कांहीं तरी अद्भुत भरलेलें असावें अशी आपली कल्पना चालवितात. पण सत्यस्थिति याहून भिन्न आहे. अन्याय, अप्रामाणिकपणा, ढोंगबाजी, स्वार्थसाधुपणा यांच्याविरुद्ध केवळ सत्याची चाड बाळगून, झुंजावयाला पुढें सरसावणाऱ्या ध्येयनिष्ठ तरुणावर त्याच्या प्रतिपक्षीयांनीं उगविलेल्या सूडाची ती एक मनाला उद्विग्न करणारी करुण कहाणी आहे.

माधवराव फर्ग्युसन कॉलेजमध्यें आजीव सेवक म्हणून जेव्हा काम करूं लागले, तेव्हां आपटे, आगरकर, गोळे, कर्वे, केळकर, परांजपे, राजवाडे यांसारख्या थोर व्यक्तींनीं ज्या संस्थेची स्वार्थत्यागपूर्वक सेवा केली, त्या संस्थेचा घटक बनून त्याच्या पाऊलात पाऊल ठेवून समाजसेवा करण्याचा अभिमानास्पद योग आपल्याला लाधला अशी त्याची भावना होती. आणि या भावनेनुसार आपलें बुद्धिसर्वस्व खर्चून ते संस्थेची सेवा करीत होते. आपल्या नियत कार्यांत त्यांनीं कधींहि कसूर केली नाहीं, किंवा सत्ता, अधिकार याची हाव बाळगली नाहीं. सत्य असेल त्याचा स्वीकार, असत्य आणि अप्रामाणिक असेल त्याचा धिःकार; अन्याय जेथें आढळेल तेथें कोणाचाहि मुलाहिजा न ठेवतां त्याच्या परिमार्जनार्थ स्वयंस्फूर्त सहकार, असा त्यांचा बाणा होता. या बाण्यामुळें संस्थेतील त्याच्या सहकाऱ्यांत त्यांच्याशीं वैर करणारी कांहीं मंडळी निर्माण झाली. कोणत्याहि गटांत सामील न होतां किंवा कोणाहि सत्ताधाऱ्यापुढे मान न तुकवितां विचार, उक्ति व कृती यांचें स्वातंत्र्य राखूं इच्छिणारा हा तरुण आजीव सेवक अनेकांच्या डोळ्यात सलूं लागला, अनेकांच्या स्वार्थसाधनेंतील तो अडथळा होऊन बसला. एडक्याप्रमाणें सरळ मुसंडी मारीत जाण्याच्या त्याच्या वृत्तीमुळें कांहीं शिष्टांचीं अंगें खरचटलीं गेलीं. हे शिष्ट त्यांचे शत्रु बनले. या शत्रूंनीं मोठ्या धूर्तपणानें, योजनापूर्वक व्यूह रचला आणि योग्य संधी येताच मोठ्या शिताफीनें प्रहार करून आपल्या प्रतिस्पर्ध्याला आपल्या मार्गातून दूर केला. सरळ हल्ला करून तो नेस्तनाबूद होणें शक्य नव्हतें; तेव्हां त्याचें वर्तन

संशयास्पद आहे व असला माणूस फर्ग्युसन कॉलेजसारख्या पवित्र शिक्षण-मंदिरांत असणें हें संस्थेच्या प्रतिष्ठेला बाधक होईल हें लोकांना पटवून देण्याकरितां एक कादंबरी रचण्यांत आली. या कादंबरीचा समाचार माधवरावांचे बाळमित्र विठ्ठलराव घाटे यांनीं, माधवरावांच्या मृत्यूनंतर ऑल इंडिया रेडिओच्या मुंबई स्टेशनवर जें भाषण केलें त्यांतून पुढीलप्रमाणें व्यवस्थितपणें घेतला व तिला कायमची मूठमाती दिली :

" रविकिरणमंडळ हा एक जसा कविसंप्रदाय होता, तसा तो सामाजिक जीवनाचा एक नवीन प्रयोग होता. मंडळाचे सदस्य नेहमीं आपापल्या स्त्रियासह एकत्र येत, चर्चा करीत व नवीन नवीन बेत करीत असत. मनोरमाबाईंचें स्वयंपाकघर बहुधा या बैठकींचें स्थान असे. मंडळाच्या मधून मधून सहली होत. त्यांतहि सदस्य सपत्नीक असत. हळुहळु अनेक तरुण व मधून मधून एखाद-दुसरी तरुणी भीतभीत पण भक्तिभावानें या अनौपचारिक स्त्री-पुरुष-मिश्रित बैठकांना येऊं लागली. त्यांच्यांतच फर्ग्युसनमध्यें शिकणारी एक मुलगी होती. ही त्यावेळच्या मानानें थोडी धीट व चतुर असे आणि नीटनेटकी राहत असे. थोड्याच दिवसात तिचा व मंडळाच्या सदस्यांचा व त्यांच्या स्त्रियांचा चांगला परिचय झाला. मंडळांतील कांहीं सदस्यांनीं तिचें थोडेंबहुत कोडकौतुक केलें. त्याला 'फ्लर्टिंग' म्हणतां येणार नाहीं. कारण 'फ्लर्टिंग'चें तंत्र थोडें वेगळें असतें."

" माधवराव या मुलीबरोबर एकदा फर्ग्युसनच्या कोर्टावर टेनिस खेळले हा त्यांचा पहिला अपराध. माधवरावांनीं आपल्या वाढदिवसाला इतर मित्रमंडळीबरोबर या मुलीस आमंत्रण केलें, हा त्यांचा दुसरा अपराध. आणि माधवराव त्यांचे मित्र गोखले आयत्या वेळीं न आल्यामुळें एकटेच तिच्या-बरोबर एकदा फिरावयास गेले हा तिसरा अपराध. इराणी धर्तीचीं व इतर प्रेमकाव्यें लिहून माधवरावांनीं आधींच भ्रष्टाकार केला होता; त्यांत या अपराधांची भर पडली. हा अपराधांचा पाढा वाचून वाचकांना हंसूं येईल. परंतु हे अपराध सोसायटींतून माधवरावांना काढून टाकण्यास पुरे झाले!"

"या मानहानीमुळें माधवरावांच्या विरुद्ध काहूर माजलें. अनेक दंतकथा रचल्या गेल्या आणि कांहीं दिवस माधवरावांना एकाद्या रक्तपित्या-प्रमाणें वागविण्यांत आलें. ते रस्त्यानें जातांना आसपासचे लोक कुजबुजत, चमत्कारिक नजरेनें त्यांच्याकडे पाहात. कांहीं सुशिक्षित व बहुतेक अर्धवट शिक्षित स्त्रियांना कुणी राक्षस चालला आहे असें वाटे. कांहीं भित्र्या मित्रांनीं हळुच सुचविलें, 'माधवराव, आमच्या घरीं तुम्ही न याल तर बरें!"

"दुसरा एखादा दुबळ्या मनाचा असता तर त्याला वेड लागलें असतें, पण माधवराव खंबीर मनाचे होते. त्या दिव्यांतूनहि ते पार पडले. मात्र या दिव्यांत माधवरावांचें हृदय भाजून निघालें. त्यांना जगाचा कांहीं वेगळाच अनुभव आला. ज्या स्त्रीजातीस आपल्या प्रतिभाबलानें त्यांनीं उंच कल्पनारम्य अशा भूमिकेवर बसवून तिची मनोभावानें पूजा केली होती, त्या स्त्रीजातीचे त्यांना अनेक वाईट अनुभव आले. आधुनिक, सुशिक्षित स्त्रीला प्रेमापेक्षां मान, प्रतिष्ठा व पैका अधिक आवडतो असें त्यांना दिसून आलें. माधवराव स्त्रीद्वेष्टे बनले नाहींत, परंतु स्त्रियांपासून चार पावलें दूर मात्र राहूं लागले. सुधारकांचा त्यांना अशाच प्रकारचा अनुभव आला. या लोकांत ते पांच-सात वर्षें प्रत्यहीं उठत, बसत. यांच्याविषयीं त्यांना आदर असे. आगरकरांवर त्यांची निस्सीम भक्ति होती व वासुदेवराव पटवर्धन या त्यांच्या ज्येष्ठ सहकाऱ्याच्या करारी व सडेतोड पण निर्व्याज वृत्तीबद्दल त्यांना अभिमान वाटत असे. पण प्रसंग आल्यावर त्यांना आढळून आलें कीं, आगरकर-वासुदेवरावांसारखीं माणसें विरळा. सामान्यतः सुधारकवर्गाचें जीवन कोतें, उथळ व दांभिक पण दिखाऊ अशा प्रकारचें त्यांच्या प्रत्ययास आलें."

"१९२३-२५ सालांतल्या अनेकविध अनुभवांमुळें—छळामुळें नाहीं—माधवरावांच्या आयुष्यास १९२६ सालापासून वेगळें वळण लागलें. माधवराव झुंजार होते. प्रतिपक्षाचे वार छातीवर घेण्यांत व उलट त्यांच्यावर प्रहार करण्यांत माधवरावांना क्लेश वाटले नाहींत. शत्रूंच्या वारापेक्षां मित्रांचा भित्रेपणा, कोतेपणा, अवसानघातकीपणा व विश्वासघात त्यांना अधिक जाणवला. माधवरावांनीं यापुढें वेगळें कार्यक्षेत्र निवडून काढलें. प्रेमकाव्य आणि

काव्यात्म जीवन यांकडे झुकणाऱ्या मनोवृत्तींना व आकांक्षांना त्यांनीं आपल्या दुर्दम्य इच्छाबलाच्या जोरावर पांडित्यक्षेत्राकडे वळविलें."

"या फर्ग्युसन प्रकरणाची तपशीलवार माहिती देण्यांत एक–दोन हेतु आहेत. तें एक मित्रकर्तव्य आहे, असें मी समजतों. माधवरावाच्या व माझ्या मित्रांनीं मी माधवरावांच्या आयुष्यांतील या महत्वाच्या प्रसंगाविषयीं सत्यकथन करावें अशी मला सूचना केली. या प्रसंगाविषयी अपुरी व एकांगी माहिती असल्यामुळें व पुष्कळांना याविषयीं पूर्ण अज्ञान असल्यामुळें माधवरावांच्या विषयीं समाजांत अनेक गैरसमज आहेत. माधवराव म्हणजे एक रहस्यमय व्यक्ति होती असा पुष्कळाचा समज आहे. करूनसवरून भागल्यावर ते देवपूजेस लागले असा कांहीजणाचा तर्क आहे. माधवराव स्वैराचाराचे व स्वैरप्रेमाचे पुरस्कर्ते आहेत असे पूर्वी त्यांच्यावर प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष आरोप करण्यांत आले होते. अलिकडे स्वैराचारास व मधुकरवृत्तीस समाजांत व वाङ्मयांत स्थान मिळूं लागल्यामुळें माधवरावांच्या अलीकडील अनेक चाहत्यांना आशा वाटते कीं, माधवराव एके काळीं खंदे प्रेमवीर असावेत. मला या सर्वांची निराशा करावयाची आहे. माझ्या प्रिय मित्राच्या आत्म्यास स्मरून, मला जें काहीं पवित्र वाटते, उदात्त वाटतें–त्याची शपथ घेऊन मी माधवरावांच्या जुन्या व नव्या शत्रूंना व मित्रांना सागतों, माधवरावाचें आचरण अत्यंत शुद्ध होतें. त्यांच्याकडून कोणाहि स्त्रीची अमर्यादा झाली नाहीं, कोणाहि स्त्रीशीं त्यांनीं लघळपणा केला नाहीं. मधुकरवृत्तीनें या फुलावरून त्या फुलावर उडणें तर त्यांच्या एकमार्गी व सडेतोड वृत्तीस शक्य नव्हतें. माधवरावांचें आंत एक, बाहेर एक असें कधींच वागणें नसे. त्याचें एखाद्या मुलीवर प्रेम असतें तर त्यांनीं तिला विवाहाची मागणी घातली असती. एखाद्या परजातीय किंबहुना परधर्मीय मुलीशींहि विवाह करावा असें त्यांना कधीं वाटलें असतें तर फर्ग्युसन कॉलेजची टेकडीच काय, प्रत्यक्ष हिमालय आड आला असता तरी त्यांनीं त्याला जुमानलें नसतें. 'मी या मुलीशीं विवाह करणार आहें,' हें एक वाक्य त्यांनीं उच्चारलें असतें तर सर्व यथास्थित झालें असतें; परंतु त्यांनीं तें वाक्य उच्चारलें नाहीं. कारण तो भ्याडपणा व अप्रामाणिकपणा झाला असता. त्याऐवजीं माधवरावांनीं वनवास पत्करला."

माधवरावांचे जे शत्रु किंवा अर्धवट मित्र त्यांच्या तथाकथित प्रेमप्रकरणासंबंधीं कित्येकदा बोलतांना आढळतात, त्यांनीं त्यांचें आंतर्जीवन तर सोडाच पण बाह्यजीवनहि कधीं नीट न्याहाळलें नव्हतें. माधवरावांच्या जीवनासंबंधीं त्यांची कविता वाचून किंवा त्यांचे टीकाकार जें लिहीत किंवा बोलत त्यावरून स्वतःच्या कल्पना ते चालवीत व त्याच सत्य असल्याचें इतरांना भासवीत. माधवरावांच्या कांहींशा स्वयंकेंद्रित व आत्मनिष्ठ असलेल्या वृत्तीचा [१] ज्यांना थोडासा तरी अनुभव आहे त्यांना हें कबूल करावें लागेल कीं, माधवराव ह्या व्यक्तीला सहजासहजीं पूर्णपणें ओळखणें कठीण होतें. विठ्ठलराव घाटे यांसारख्या त्यांच्या बाळपणापासूनच्या अत्यंत निकटवर्ती स्नेह्यानेंहि जेथें "माधवरावांच्या मनांत असें एक दालन आहे, कीं त्यांत ते कोणालाच येऊं देणार नाहींत!" असे उद्गार काढले, तेथें ज्यांच्या भेटीगाठी बाहेरच्या बाहेर अंगणांतल्या अंगणांतच घडल्या त्यांनीं माधवरावांच्या आयुष्यासंबंधीं "आम्हांला सर्व कांहीं माहीत आहे," असें म्हणून त्यांतील रहस्य उकलून दाखविण्याचा खटाटोप करणें हें किती धाडसाचें आहे! पण समाज असल्या वावदूकांच्या कथावर विश्वास ठेवतो; कारण त्याला कांहींतरी खमंग हवें असतें. मग त्या खमंगपणासाठीं कथाविषय झालेली व्यक्ती कितीहि तळून भाजून निघाली तरी हरकत नाहीं. वक्ता आणि श्रोता या दोघांनाहि त्याची पर्वा नसते. माधवरावांच्या बाबतींत हेंच घडलें. माधवराव नेहमीं म्हणत कीं, "माझी लौकिक हानी माझ्या शत्रूंपेक्षां माझे मित्र म्हणविणाऱ्या व्यक्तींनींच अधिक केली."

---

[१] या त्यांच्या वृत्तीचें वर्णन त्यांनींच आपल्या एका सुनीतांत खालीलप्रमाणें केलें आहे.

**कोणाच्याहि पुढें कधीं न नमलें गर्विष्ठ माझें शिर,**
**केलें मी न खुलें कुणासहि कधीं दुर्भेद्य हृन्मंदिर.**
**माझ्या आंतरजीवनास न शके काढूं कुणी बाहिर,**
**स्वातंत्र्यप्रिय आत्मनिष्ठच सदा मी अद्रिवत् सुस्थिर.**

माधवरावांचीं प्रेमगीतें वाचून अनेकांच्या त्यांच्या प्रणयजीवनाबद्दल अवास्तव अशा कल्पना आहेत. वस्तुस्थिति अशी आहे कीं, विद्यार्थीदशेंत असतांना त्यांना ज्या कांहीं एक-दोन व्यक्तींबद्दल काय मोह उत्पन्न झाला असेल तेवढाच. १९१५-१६ सालापासून त्यांनीं आपल्या आयुष्याला वेगळेंच वळण लावलें होतें आणि पुण्यांत आल्यावर तर आपण विवाहबद्ध होऊन खऱ्या अर्थानें गृहस्थ व्हावें असेंच त्यांना वाटूं लागलें होतें. १९२२ सालीं त्यानीं, दुसऱ्याची सोय–गैरसोय व स्वतःची आर्थिक असमाधानता यांचा वाजवीपेक्षां अधिक विचार करण्यांत वेळ न घालवितां, आलेल्या संधीचा फायदा घेतला असता, तर ते सर्व बाबतींत सुस्थिर तर झाले असतेच, पण पुढें ज्या कांहीं आपत्ती त्यांजवर गुदरल्या त्याहि टळल्या असत्या.

प्रेमविवाहाचा योग आपल्या आयुष्यात नाहीं हें पाहिल्यानंतर, विवाह करावयाचा तर आपल्या सुधारणाविषयक कल्पनांप्रमाणें आपण करावा असें त्यांना वाटूं लागलें होतें. आणि तो योग १९२२ सालीं मिसेस XXXX नांवाची विधवा त्यांना सागून आली त्यावेळेस आलाहि होता. यासंबंधींची हकीकत त्यांच्याच शब्दात देतों: [१] “इथें आलों तों एका नवीन प्रश्नाचें उत्तर देण्याची जबाबदारी मजवर पडली. एका आठवड्यांत मला उत्तर दिलें पाहिजे. प्रश्न अर्थात लग्नासंबंधींचा असणार. XXXX म्हणून एक बावीस-तेवीस वर्षांची विधवा मला सागून आली आहे. वर्णानें व रूपानें ती मध्यम चागली आहे. परवां मी तिला पहायला गेलों होतों. माझी हलाखीची स्थिति मीं तिला विशद करून सागितली. लग्नासारख्या अत्यंत महत्त्वाच्या बाबतींत कांहींच लपवावयाचें नाहीं, कोणत्याहि प्रकारें वंचना करावयाची नाहीं हा माझा कृतनिश्चय आहे. तिची आर्थिक स्थिति मजसारखीच कंगालीची आहे. तिचें शिक्षण इंग्रजी सहाव्या इयत्तेपर्यंत झालें आहे. तिचा स्वभाव थोडा तापट व करारी आहे. परंतु एकंदरीनें ती सुशील, बुद्धिमान् व सुखावह आहे असें XX हे गृहस्थ सांगतात......माझें उत्तर बव्हंशीं माझे स्नेही रा. मराठे यांच्या सांगण्यावर अवलंबून राहील असें मीं स्पष्ट कळविलें आहे. आतां मी माझे स्वतःचे विचार थोडक्यांत

[१] रा. वि. म. पत्रसंग्रह, ता. १० जून १९२२

मांडतों. निश्चय करणें म्हणजे अत्यंत दुर्घट काम होऊन बसलें आहे. प्रथम ही गोष्ट मला निदान तुजजवळ तरी कबूल केली पाहिजे कीं, परिस्थितीशीं गेलीं बारा वर्षे झगडण्यांत माझी बरीच शारीरिक व मानसिक शक्ति खर्च झालेली आहे. आणि आज बेताचीच उमेद व बेताचाच उत्साह माझ्यात आहे. परावलंबित्व डोकावूं लागलें आहे. काहीं व्यक्तींच्या तरी सहानुभूती-संबंधीं व आधारासंबंधीं मी बेपर्वा राहूं शकत नाहीं. तथापि मी Idealistic ambitious असून तडजोडीचे तत्त्व मला फार अल्प प्रमाणात पटूं लागलें आहे. अशा स्थितींत मी विधवाविवाहास तयार व्हावें का, हा पहिला प्रश्न. व्यावहारिक अडचणींखेरीज इतर अडचणी नाहींत. मी पोरका निराश्रित असल्यामुळें पत्नीला तरी काहीं माणसें जिव्हाळ्याचीं असणें हें तिच्या व माझ्या दृष्टीनें श्रेयस्कर, जरूरीचे आहे. मिसेस ××× ही मजप्रमाणेंच निराश्रित, असहाय विधवा आहे. उघड्या डोळ्यानीं ती जोखीम शिरावर घ्यायला तयार आहे. हें तिच्या मानसिक दार्ढ्याचें अगर नैराश्यसामर्थ्याचें द्योतक असेल. लग्न झाल्यावर कोणत्या व्यावहारिक अडचणी येत नाहींत ? कधीं द्रव्याची तर कधीं मनुष्याची नेहमीं उणीव भासत असते. दोन्हीहि बाजवा लंगड्या राहिल्या तर निभावणी क्वचितच होते. माझा तूं जवळचा स्नेही असल्यामुळें तुला मजविषयीं व तिच्याविषयीं कृतींत सहानुभूति ठेवावी लागेल. हें तुला व वहिनीला कितपत रुचेल व जमेल ? ”

“ याच वेळीं मनातला गोंधळ वाढावा म्हणूनच कीं काय माझें मन ××× च्या बहिणीवर गेलें आहे. ती रूपानें इतकीच नीटस व गौर असून, वयानें लहान आहे. स्वतः ×× ना पत्र लिहून त्यांचें उत्तर यायला दीड महिना तरी पाहिजे. कारण ते फ्रान्समध्यें आहेत. शिवाय त्यांचें उत्तर काय येईल कोण जाणे ! ती मुलगी सहाव्या इयत्तेंत आहे. तिला तीन भाऊ व एक बहीण अशीं भावंडें आहेत. तिच्या चेहऱ्यावर सहजप्रसन्नता आहे. ती माझ्या अकालीं कोळपलेल्या मनाला पालवी आणूं शकेल. तिच्या आशेवर बसून राहण्यांत हातचें टाकून पळत्याच्या मागें लागल्यासारखें होण्याचा संभव आहे. बाकी मिसेस् ++++ हें पहिलेंच स्थळ आहे कीं जें गेल्याबद्दल मला कदाचित् थोडाबहुत पस्तावा होईल. इतके दिवस ध्येयाच्या मागें

लागून वाट पाहिली तशी आणखी थोडे दिवस पाहावी, नाहींतर शेवटीं गौणपक्ष म्हणून विधवाविवाह आहेच, असें मला राहून राहून वाटतें. अति शहाणा त्याचा बैल रिकामा राहण्याची भीति नाहीं असें नाहीं, परंतु घाईघाईनें समुद्रावरच्या म्हाताऱ्याचें ओझें घेण्यापेक्षां बैल रिकामा परत आला तर काय वाउगें आहे ?"

"माझ्यानें आतां अधिक लिहवत नाहीं. आज दोन रात्री मीं विवंचनेंत काढल्या. भलतेच विचार डोक्यांत काहूर उठवितात. तेव्हां तूं सर्व बाजूंनीं 'शांत डोकें ठेवून' विचार करून तुझे विचार मला ताबडतोब कळीव."

[3] "...... तुझें पत्र येण्याच्या आधल्या दिवशीं मिस् ×× संबंधीं विचारपूस करण्याकरितां मी ×××× यांजकडे गेलों होतों. ती लहान म्हणजे चौदा-पंधरा वर्षांची असल्यामुळें अर्थातच माझ्या सूचनेचा सहानुभूतिपूर्वक विचार होऊं शकला नाहीं व त्या स्थळाविषयीं अधिक विचार करणें बरें नव्हे असें माझें मलाच वाटलें. यत्नसाध्य तर तें स्थळ नाहींच परंतु नैतिक दृष्टयाहि तें इष्ट नाहीं, कारण वयांत महदंतर आहे. त्या स्थळाचा माझ्या पत्रांत उल्लेख नसता तर तूं विधवाविवाहाला ताबडतोब संमति दिली असतीस असें तूं म्हणतोस. तथापि मी ज्या महत्त्वाच्या व्यावहारिक गोष्टीसंबंधानें विचारपूस केली होती त्यासंबंधीं तूं मौनच धरिलेंस. संसारांत ज्या अनेक अडचणी येतात त्या लक्षांत घेतां एका कर्जबाजारी नियमित उत्पन्नाच्या पोरक्या मनुष्यानें एका दरिद्री पोरक्या विधवेबरोबर लग्न लावणें कितपत ग्राह्य आहे व मित्रास द्याव्या लागणाऱ्या आधाराच्या दृष्टीनें अशा लग्नाची इष्टता किती, यासंबंधानें तूं व्यवहारज्ञ असून कांहींच लिहिलें कसें नाहींस ? माझा स्नेही या नात्यानें तुझ्यावर जी जबाबदारी पडली असती त्यासंबंधीं मोकळ्या मनाची चर्चा मला हवी होती. तिच्या अभावीं व सध्यांच्या त्रस्त व चिंताकुल मनस्थितींत निश्चय करणें दुर्घट असल्यामुळें, व पुढच्या आशेवर आणखी थोडी वाट पाहूं असा विचार करून मिसेस् ××× यांस नकारार्थी उत्तर दिलें. तसें उत्तर देण्यांत मी माझा भ्याडपणा व व्यवहारचातुर्य व्यक्त करीत आहें असें माझें मलाच

[3] रा. वि. म. पत्रसंग्रह, १९ जून, १९२२.

वाटत आहे. परंतु हा कांहीं प्रेमाचा संबंध नाहीं; मी विधुर नसल्यामुळें कांटेतोल न्यायाचा व कर्तव्याचा प्रश्न नाहीं; उभयतांच्या सुखाचा व सोयीचा—बव्हंशीं आशावादित्वाचा हा प्रश्न असल्यामुळें व्यवहारदृष्ट्या योग्य वाटलें तेंच मीं केलें. माझी सांपत्तिक व इतर परिस्थिति स्पष्ट जाणल्यावरहि मिसेस ××× चें मन बदललें नाहीं यावरून त्यांचें मानसिक सामर्थ्य, अगर असहायतेंतलें निश्चयाचें बळ व्यक्त होतें. त्यांना 'नाहीं' असें उत्तर कळवितांना कदाचित् मला याबद्दल पुढें पस्तावावें लागेल असेंहि वाटल्यावांचून राहिलें नाहीं. तूं भ्याड आहेस असें माझें मन मला आतांच टोंचून सांगत आहे."

माधवरावांनीं ज्या बाईचा वरील पत्रांत उल्लेख केला आहे, त्या, माधवरावांनीं नकार दिला असतांहि आणखी एक वर्ष थांबल्या. माधवरावांनीं आपला स्वीकार करावा अशी त्यांची उत्कट इच्छा होती असें दिसतें. माधवरावांनाहि आपण त्याना नाकारण्यांत चूक करीत आहों असें मधून मधून वाटत असावें. ज्या रा. वि. मराठे यांच्या मतावर त्यांनीं ही गोष्ट अवलंबून ठेवली होती तेहि या विवाहाला अनुकूल होते. 'आपल्या घरातील मंडळींचें मत कांहींहि असलें तरी आपल्याकडून स्नेहांत व सहकारितेंत अंतर पडणार नाहीं,' असें त्यांनीं त्यांना, थोड्या उशिरां कां होईना—कळविलें होतें. पण त्यांचें मत स्पष्ट होण्यापूर्वींच ते या बाईंना नकार देऊन मोकळे झाले. कदाचित् १९२४ सालीं 'फर्ग्युसन कॉलेज प्रकरण' न उद्भवतें तर त्यांनीं या गोष्टीचा फेरविचार करून या बाईशीं विवाह केलाहि असता. पुढील काळांत ते कधीं कधीं तसें म्हणतहि असत. या बाईप्रमाणेंच, फ्रान्समध्यें विद्याभ्यासार्थ असलेल्या ज्या गृहस्थांच्या बहिणीवर त्यांचें मन जाऊन, मागाहून 'तें स्थळ यत्नसाध्य नाहीं' असें समजून त्यांनीं तें आवरलें होतें, नव्हे तो विचारच डोक्यांतून काढून टाकला होता, ते गृहस्थ १९२४ सालीं फ्रान्सहून परत आल्यावर त्यांनीं होऊनच आपल्या या बहिणीबद्दल माधवरावांना विचारलें. पण या वेळेस घरच्या भानगडी, एका स्नेह्यास विनातारण कर्जाऊ दिलेले चार हजार रुपये बुडाल्यामुळें उत्पन्न झालेले आर्थिक पेंच व 'फर्ग्युसन कॉलेज प्रकरण' या सर्वांमुळें ते इतके त्रासून गेले होते, कीं त्यांनीं याहि मुलीच्या बाबतींत 'पुढें पाहूं' असें उत्तर दिलें.

माधवरावांच्या आयुष्यांतील या प्रापंचिक घटना व त्यासंबंधींची त्यांची वृत्ति हीं लक्षांत घेतलीं म्हणजे 'फर्ग्युसन कॉलेज प्रकरण' हें त्यांच्या धूर्त शत्रूंनीं रचलेलें शुद्ध कुभांड होतें असेंच कोणीहि म्हणेल. असलीं हीं कुभांडें व आयुष्यांत आलेले विपरीत अनुभव यांमुळें, पूर्वी मोकळ्या अंतःकरणानें व निःशंक मनानें समाजांत वावरणारे माधवराव कांहींसे नियतीवादी व एकलकोंडे बनत चालले.

# ९

## ध्येयताऱ्याकडे

फर्ग्युसन कॉलेजमधून दोन वर्षेपर्यंत सक्तीनें रजा घेणें भाग पडल्यामुळें, द्रव्यार्जनासाठीं पुण्याबाहेर कोठें तरी जाणें त्यांना भाग होतें. शिवाय या वेळेस ते अत्यंत आर्थिक दुःस्थितींत होते. ही दुःस्थिति, मुख्यतः त्यांचे एक स्नेही शाहूराव कानिटकर यांस दिलेली रक्कम बुडाल्यामुळें त्यांजवर ओढवली होती. ही रक्कम त्यांची स्वतःची असती तर त्यांनीं त्याबद्दल फारशी हाय हाय केली नसती. पण ती त्यांच्या कुटुंबियांची विश्वस्त म्हणून त्यांचे स्वाधीन केलेली रक्कम होती. माधवरावांचा ज्या कर्वे कुटुंबाशीं लहानपणापासून जिव्हाळ्याचा संबंध होता त्यांचे शाहूराव हे जांवई. त्यांच्या पत्नी ताई यांना माधवराव आपली बहीण समजत. या ताईंना, भाऊबिजेचे दिवशीं, त्यांनीं अनेकदां कवितारूपी भेट पाठविलेली आहे. माधवरावांना, ते विद्यार्थीदशेंत असतांना जीं कांहीं कुटुंबें आपलींशीं वाटत, त्यांपैकीं कर्वे कुटुंब हें एक होय. त्यामुळें ताईचे यजमान हे आपले आप्तेष्टच असें ते मानीत. १९२० सालच्या सुमारास शाहूराव कानिटकर यांना व्यापारधंद्यांत खोट खावी लागून ते कर्ज-बाजारी झाले. अशा परिस्थितींत त्यांच्या अडचणीचे वेळीं अल्प मुदतीकरितां, त्यांजकडून कोणत्याहि प्रकारचें तारण न घेतां, माधवरावांनीं रक्कम दिली. पण शाहूरावांकडून, आश्वासिलेल्या मुदतींत तिची फेड झाली नाहीं; इतकेंच नव्हे तर त्यावरील व्याजहि वेळेवर मिळेनासें झालें. उलट, ज्या ज्या कुटुंबियांचा या रकमेंत भाग होता, त्या त्या कुटुंबियांस त्यांच्या त्यांच्या भागाच्या रकमेवरील व्याज नियमितपणें स्वतःच्या मिळकतींतून पोंचतें करणें प्राप्त होतें. आणि एवढें करूनहि मूळ रक्कम हातीं येईल किंवा नाहीं याबद्दल शंकाच. आणि १९२२ सालीं ती शंका खरीहि ठरली. माधवरावांनीं या प्रकरणीं रा. वि. म.

यांना वेळोवेळीं जीं पत्रें लिहिलीं तींच येथें देतों. त्यावरून माधवरावांच्या या काळांतील आर्थिक व मानसिक दुःस्थितीची नीट कल्पना येईल.

ता. २८ मार्च, १९२२

प्रिय रामभाऊ,

" आकाशिंच्या कुऱ्हाडी माथां खुशाल पाडीं,
आघात सोसण्याचें सामर्थ्य मात्र द्यावें. "

अखेर भीति साधार ठरली. शाहूराव मला रुपये परत देऊं शकत नाहींत. ...... रा. शाहूरावांची देण्याची दानत आहे असें मी अद्यापि धरून चालतों ; यापलीकडे आशाजनक असें विशेष कांहीं नाहीं. द्रव्य गेल्याचें माझ्यासारख्या गरीबाला वाईट वाटणारच ; तथापि शाहूरावांनीं आपल्या हितैषीची वंचना करावी याचें मला राहून राहून दुःख वाटतें. मी त्यांना अजून एकहि कठोर शब्द बोललों नाहीं. परंतु शांत राहण्याच्या प्रयत्नांत माझा सहज संताप माझ्यावरच उलटून माझें रक्त आटवितो. १९२० च्या जुलै अगर ऑगस्ट महिन्यांत मीं त्यांना रु. ५०० कर्जाऊ दिले व ऑक्टोबर महिन्यांत पंधरा दिवसांकरितांच व त्यांची अत्यंत अडचण — पतीवर संकट म्हणून रु. ३५०० दिले. १९२१ च्या जानेवारी महिन्यापासून पैशांसाठीं तगादा लाविला, त्या वेळीं माझे पैसे देण्याची ऐपत त्यांच्या अंगीं होती. घरावर जरी पंधरा हजारांचा बोजा होता तरी शेतीवाडीवर बिलकुल नव्हता. दागदागिने सर्व घरींच होते. त्यानंतर त्यांनीं जेव्हां जेव्हां कर्ज काढलें तेव्हां तेव्हां हळूहळू एक एक वस्तु व अखेर शेतीवाडी गहाण पडली. तारणावांचून ऋण देणारा माझ्यासारखा रोमँटिक मूर्ख मीच. अखेर जेव्हां निरवानिरव झाली तेव्हां घर व शेतीवाडी विकून आलेले ३२,५०० रुपये माझ्या मागूनच्या परंतु गहाणदार सावकारास मिळाले आणि मी ... !! जी सहानुभूति मीं त्याच्याविषयीं दाखविली ती माझ्याविषयीं जर त्यांच्या मनांत असती तर त्यांनीं मला आधीं काळजीमुक्त केलें असतें. फेब्रुवारीअखेर व्याज मला मिळालें आहे. परंतु व्याजासाठीं दर महिन्यास सरासरी ७–८ खेपा घालतांना व उंबरा झिजवितांना

मला काय काय होत असे व आहे त्यांचें यथार्थ वर्णन मी करूं शकत नाहीं. आतां त्यांनीं घरदार मोडलें आहे. त्यांच्यावर दिवाणी पकडवॉरंट सुटलें आहे. गरीब बिचारी सुशील ताई माहेरीं आली आहे व ते बेलिफाशीं लपंडाव खेळत आहेत. ताईच्या लग्नांत शाहूराव ५०-५५ हजारांचे धनी होते. आज ते अर्धवट वैतागलेले भणंग आहेत. लक्ष्मी! तुझ्या चांचल्याला नमस्कार असो!"

ता. १० जून, १९२२

"तीन-चार हेलपाटे घालून भेट न झाल्यानें मी अत्यंत थकलों होतों तरी शाहूरावांची रात्रीं ९॥ वाजतां गांठ घेतली. त्यांचा मोटार-डायनामो रा. केळकरानें आपल्या कर्जांत वळता करून घेतला व उरलेलीं यंत्रें रा. दाते वकील यांच्या ताब्यांत कर्जाच्या फेडींत आहेत. अर्थात् मी नागवलाच गेलों आहें. तेव्हां मीं शाहूरावांस स्पष्ट सांगितलें कीं, 'आजवर मी तुम्हांस कडू वचन बोललों नाहीं. आज माझा धीर सुटला आहे, स्पष्टोक्तीबद्दल माफी करा. शेतावर, माझ्या पैशाकडे दुर्लक्ष करून कृत्रिम बोजा कागदोपत्रीं दाखविण्यांत व मिळकतविक्रीच्या वेळीं मला व रा. नारायणराव कर्वे यांस माधवरावांच्या चार हजारांखेरीज इतर कर्ज नाहीं असें भासविण्यांत व इतर लबाडीचीं भाषणें करण्यांत तुम्हीं विश्वासघात केला आहे, माझा गळा कापलात, माझें जन्माचें नुकसान केलेंत. आतां तुम्हीं दिवाळखोरीचा अर्ज करून माझी उत्तरक्रिया करणार आहांत असें दिसतें. तर तुमचे जे दागिने गहाण आहेत ते विकून, कर्जफेड करून उरलेले पैसे मला द्या व मला व्याज महिन्याच्या महिन्याला मिळेल अशी हमी घेणारा जामीन द्या.' दागिन्यांवर मी मूळ किंमतीपेक्षां अधिक कर्ज काढलें आहे व जामीन मला मिळणें शक्य नाहीं या सबबीवर त्यांनीं माझ्या दोन्ही सूचना फेंटाळून लावल्या. आणि 'दात्यांच्या नांवें त्यांच्या पैशावर मी गिरणी काढणार आहें, तेव्हां सवडीप्रमाणें तुमचे पैसे देईन' असें थापेबाजीच्या मधाचें बोट लाविलें. (दाते पैसे देणार आहेत व गिरणी निघणार आहे ही निव्वळ लोणकढी थाप होती हें इथें आल्यावर साधार सिद्ध झालें.) आतां त्यांच्याकडे खेटे घालण्याचें प्रयोजन उरलें नाहीं. मला आतां

तुमचा उंबरठा झिजविण्याचा कंटाळा आला आहे, या माझ्या म्हणण्याला, 'त्याला काय इलाज आहे,' असें ते उत्तरले!"

"अगोदरच मी जवळ जवळ पोरका. मासिक आवक नियमित. हिंदुस्थानच्या औद्योगिक उन्नतीला हातभार लावण्यांत दिवाळखोर कंपन्यांनीं हजार एक रुपये बुडविलेले. तशांत या चार हजार रुपयांच्या कर्जाचा नवीन बोजा–त्यामुळें मी निमिषैक हतबुद्ध झालों."

शाहूरावांना दिलेले हे चार हजार रुपये शेवटीं बुडालेच व स्वतः माधवरावांना, ती रक्कम कुटुंबाची असल्याकारणानें, तिची भरपाई करण्याकरितां अपार कष्ट करावे लागले, मानसिक यातना भोगाव्या लागल्या, संसारी होऊन स्थिर होण्याचे सर्व विचार कांहीं काळ दूर लोटावे लागले. कुटुंबाचा विश्वासघात केल्याचें लांछन लागूं नये यासाठीं सुखाचा विचार सोडून देऊन रात्रंदिवस राबावें लागलें. अशा स्थितींतहि ते मनाला समाधानींत ठेवण्याचा प्रयत्न करीत. पण केव्हांतरी पुढील प्रकाराची गोष्ट कानावर आली कीं ते तळतळूं लागत:

"थोड्याच दिवसांपूर्वी 'माझ्या आईनें[1] घरखर्चापैकीं पैसे सांठवून माझ्या बायकोच्या अंगावर हजार-दीड हजारांचे दागिने घातले,' असें सकौतुक व साभिमान निळू[2] सांगत होता. माझ्या गळ्याचा फांस अजून घट्ट असतांना ही बातमी ऐकून मला पराकाष्ठेचें वाईट वाटलें व शेवटीं पाण्यापेक्षां रक्तच घट्ट हें पटलें. आज अठरा वर्षें स्वतंत्र प्रेमसंबंधावर मी इमारती रचीत आलों या माझ्या मूर्खपणाचा मला अतोनात पश्चात्ताप झाला. घटकाभर पैसा पैसा म्हणून मी हळहळलों!"

दोन वर्षेंपर्यंत माधवरावांना पुणें सोडण्याची पाळी आली त्या वेळीं जवळ शिल्लक कांहीं नाहीं, उलट कुटुंबाच्या चार हजार रुपयांची जबाबदारी, आई आणि दोन भांवडें–विभक्त राहात असलीं तरी–त्यांच्या, त्याचप्रमाणें

[1] सौ. कर्वे, शाहूरावांच्या सासूबाई.

[2] शाहूरावांचे मेहुणे, नीळकंठ श्रीधर कर्वे.

भडोच येथें राहणाऱ्या आत्याबाईंच्या पोषणाचा भार, पुढील भवितव्याबद्दल अनिश्चितता, आणि समाजांत दुष्कीर्ति पसरलेली, अशी एकंदर परिस्थिति होती. पण याहि परिस्थितींत ज्यांनीं स्नेह न सोडतां सतत साहाय्यच केलें अशी कांहीं मंडळी होती. या मंडळींत फर्ग्युसन कॉलेजमधील प्रो. नाईक, प्रो. आपटे, प्रो. देवधर, प्रो. एम्. के. जोशी, प्रि. भाटे, प्रि. परांजपे, त्याचप्रमाणें घाटे, शिंदे, मराठे यांचा प्रामुख्यानें उल्लेख केला पाहिजे. या मंडळीचा स्नेह अबाधित राहिल्यामुळें पुष्कळांना त्यांच्याविरुद्ध उघडपणें बोलणें कठीण जाई, इतकेंच नव्हे तर या प्रकरणाला दुसरीहि बाजू असूं शकेल असें वाटे. माधवरावाना त्या वेळीं भोवतीं पसरलेल्या गैरसमजाच्या दाट धुक्यांतून मार्ग काढणें या मंडळीच्या पाठिंब्यामुळें पुष्कळसें शक्य झालें. फर्ग्युसन कॉलेज-मधून दूर होण्याचा प्रसंग आल्यावर, प्रि. परांजपे यांच्या शिफारसीमुळेंच त्यांस अमळनेरास प्रताप हायस्कूलमध्यें शंभर रुपये पगाराची शिक्षकाची नोकरी, विशेष आयास न पडतां लगेच मिळाली. माधवराव या गोष्टीचा कृतज्ञतापूर्वक अनेकदां उल्लेख करीत. या नोकरीमुळें ते थोडेसे आर्थिक विवंचनेंतून मोकळे झाले.

अमळनेरास माधवराव १९२४ च्या जून महिन्याच्या तिसऱ्या आठवड्यांत आले. वसतिगृहव्यवस्थापकाच्या बंगल्यात तळमजल्यावर त्यांना राहावयास जागा दिली होती. प्रारंभींचे त्यांचे कांहीं दिवस एकटे-एकटेपणांतच गेले. शाळेंतील शिक्षक व अधिकारी त्यांच्याशीं जेवढ्यास तेवढा संबंध ठेवीत. त्यांनाहि कोणाचा संग त्या वेळेस नको होता. एकान्त मिळेल तेवढा बरा असें त्यांना वाटे. त्यांचा ‘ फार्सी-मराठी कोश ’ त्या वेळेस पुण्यास छापला जात होता, त्याचीं स्थूल मुद्रितें तपासण्यांत, अखेरच्या घटकेपर्यंत नवीन कांहीं शब्द सांपडल्यास त्यांचा समावेश जेथें जेथें करतां येणें शक्य असेल तेथें तेथें तो करतां यावा यासाठीं जुने गद्य-पद्य ग्रंथ वाचून काढण्यांत, ते आपला फुरसतीचा वेळ घालवीत. अध्यापनाचें काम आटोपलें कीं सरळ आपल्या खोलींत येऊन लेखन-वाचनाच्या कामास लागावें, कंटाळा आला कीं तालीमखान्यांत जाऊन मल्लखांब करावा; तासभर रेल्वे लाइनच्या बाजूनें टेंकड्यांचे दिशेनें फिरावयास जावें; फिरून आलें कीं पुन्हां लेखनास सुरुवात

करावी, अशी त्यांची पहिले चार-सहा महिने दिनचर्या होती. या सहामाहींत ठरलेल्या नित्यक्रमांत थोडा बौद्धिक पालट म्हणून त्यांनीं बायबलाचा अभ्यास सुरू केला. फर्ग्युसनमध्यें असताना त्यांनीं फार्सी छंदःशास्त्रावर इंग्रजींत पुस्तक लिहिण्याचा विचार केला होता, तें अर्धेंअधिक लिहून पुरें केलें; जर्मन भाषेचा अभ्यास पुन्हा सुरू केला. अशा रीतीनें मनाला कांहीं ना कांहीं व्यवसायांत त्यांनीं पुरें गुंतवून टाकिलें.

अमळनेर येथें आपले दिवस कसे चालले आहेत यासंबंधीं रा. वि. म. यांना १४ सप्टेंबर रोजीं ते लिहितात: "उत्तम हवा आहे; तिचा उपयोग मी करून घेत आहें. फायदा काय होईल तो होईल. नेमानें व्यायाम व मल्लखांब करितों. संध्याकाळीं नेमानें फिरायला जातों. असंकुचित व उदार बुद्धीनें निरनिराळ्या विषयांचा रसज्ञतापूर्वक परामर्श घेणारे असे बाळूकाका भागवत येथील बहुतेक उपयुक्त संस्थांचे आधारस्तंभ आहेत. त्यांची माझी ओळख चांगली झाली आहे. शिवाय येथील तत्त्वज्ञानमंदिरांतील विद्यार्थी रा. खानोलकर यांनीं माझी नुकतीच ओळख करून घेतली. ते दोन वर्षें विश्वभारतींत होते. ते व्यासंगी व होतकरू लेखक आहेत."

"माझी मानसिक हतबुद्धता गेली असें मला वाटत नाहीं. माझें तिच्याशीं झुज चालू आहे. कर्मानें मनुष्याला शांति मिळते, असें म्हणतात, म्हणून मी व्यवसायमग्न राहून प्रयोग करून पाहात आहें. टिळकांची 'रहस्य-संजीवनी' नामक गीतेवरील स-भाषांतर टीका वाचून झाली. आतां गीतारहस्य हा ग्रंथ वाचणार आहें. इथें आल्यावर लेखन बेताचेंच झालें. चंद्रशेखरावरील निबंध सुधारून वाढविला; 'पद्याची भाषा' हा नवीन निबंध लिहीत आहें. एक दोन अभंग लिहिले व 'रावबहादुर ठासर'[3] नामक एक काव्य अर्धवट म्हणजे ५०० ओळी लिहून झालें आहे. मुक्तेश्वराचें आदिपर्व वाचून झालें व 'मराठी शब्दमान्दूस[4]' नांवाच्या मराठी कोशाला मीं आरंभ केला आहे. सर्व मराठी वाङ्मय वाचून टाकावें अशी शुभेच्छा आहे."

---

[3] याच काव्याला पुढें 'सुधारक' हें नांव देऊन तें प्रसिद्ध करण्यांत आलें.

[4] या कोशासाठीं गोळा केलेल्या शब्दांच्या वह्या दाते-कर्वे यांचा

माधवराव, अशा रीतीनें व्यवसायमग्न राहून शांति प्राप्त करून घेण्याचा जरी प्रयत्न करीत होते, तरी ज्या वेळेस ते व्यवसाय बाजूस ठेवून एकटेच असत, त्या वेळेस मागील घटनांच्या प्रतिक्रिया त्यांच्या मनावर झाल्याशिवाय राहात नसत. अमळनेरास येऊन महिना-दीड महिना झाला असेल नसेल, अशा वेळीं त्यांनीं लिहिलेलें 'हाकाटी' हें अभंगपंचक या प्रतिक्रियेचेंच उदाहरण आहे. या अभंगांत त्यांच्या त्या वेळच्या मनस्थितीचें स्वच्छ व स्पष्ट प्रतिबिंब उमटलें आहे.

– १ –

कशासाठीं ? कोणासाठीं ? चाले अन्तरीं हाकाटी.
हृदयींची आस आस चूर झाली सावकाश.
प्रीति-कीर्तीचे डोलारे गेले कोसळून सारे.
जनतेचा जो भुकेला तिनें केला अर्धा मेला.
झाली जिवाची चाळण धीर चालला गळून.
बंडखोर तारुण्याचें रक्त नसोनसीं नाचे.
परी क्षीण माझ्या मनीं आस कोठें संजीवनी ?

– २ –

पुस्तकींच्या माणकांच्या व्यवहारीं होती कांचा.
व्योमचुंबी कल्पवृक्ष होती कोळपून रुक्ष.
कल्पनेच्या स्वर्गांतून खालीं आदळे तरुण.
पूज्य येथें एक माया तिच्यावीण सारी माया !
कृपा तिची होई तर पंगु उल्लंघी डोंगर !
मुका होई बृहस्पति, मिळे पाप्याला सद्गति !
सर्व शक्तींची जननी हीच भवींची तरणी.

---

'शब्दकोश' तयार होत असलेला पाहून त्यांस त्यांच्या उपयोगाकरितां त्यांनीं देऊन टाकल्या.

— ३ —

मदें अव्हेरिलें हिला आतां प्रभाव पाहिला.
आतां पाहिला प्रभाव कांहीं लागेना निभाव.
सत्ता करी तेंच सत्य मान वाकविणें पथ्य.
जरी पीडा दे कायदा न्याय त्याला प्रेमें वदा.
लोकशाही येथें ओठीं हाव सुल्तानीची पोटीं.
प्रेम सुवर्णाच्या मागें, धन जोडी जीवघागे.
धूळ झालीं येथें ध्येयें आणि वेदान्त प्रमेयें.

— ४ —

विकूनिया स्वत्वमणी नको साम्राज्यरमणी !
राहो शुद्ध अंतरंग, होवो आकांक्षांचा भंग,
बंद होऊं द्या वाजणें थोरवीचीं शहाजणें,
विस्मृतीच्या गंगेमाजी नामदीप लोटा आजी.
दोन दीस करमाया नको मुलाम्याची माया.
मग काय हवें तरी हेंच कळेना अंतरीं.
आंत बाहेर हें सुनें वाटे नको नको जिणें !

— ५ —

तुकोबाच्या पांडुरंगा, भावनेच्या अंतरंगा !
बोरीं [५] हीच चंद्रभागा, हीच पंढरीची जागा !
तुम्ही त्रैलोक्याचे राजे तुम्ही मायबाप माझे.
झाला उशीरां आठव तरी येऊं द्या हो द्रव.
उचलून घ्या हो मला घट्ट उराशीं आंवळा.
तेंच माझें परंधाम सुखी जेथें आत्माराम.
मग थांबेल हांकाटी कशासाठीं ? कोणासाठीं ?

[५] अमळनेर येथील बोरी नदी.

अमळनेरास, पहिली सहामाही उलटल्यावर, त्यांना सदा लेखनवाचनांत मग्न असलेले पाहून पुष्कळांची त्यांच्यासंबंधींची तटस्थ वृत्ति मावळूं लागली. वाङ्मयाभिरुची असलेल्या कांहीं व्यक्ती त्यांच्याशीं हळूहळू परिचय करून घेऊं लागल्या. त्यांचीं, 'मराठ्यांचा इतिहास,' 'हिंदु धर्माची सुधारणा' या विषयांवर शाळेंत निम-खासगी अशीं जीं व्याख्यानें झालीं तीं ऐकून त्या विषयाची आवड असलेली कांहीं मंडळी त्यांना आपल्या बैठकींत आग्रहपूर्वक बोलावूं लागली. बाळूकाका भागवत, भिकूअण्णा परांजपे, वासुदेवराव भावे हे त्यापैकीं प्रमुख होत. शाळेंतील शिक्षकमंडळींतील वि. रा. रानडे, वि. म. बेडेकर, बाबुराव पुराणिक व तत्त्वज्ञानमंदिरांतील श्री. वि. ऊर्फ भाऊराव आपटे याच्याशींहि त्यांची चांगलीच गट्टी जमली. भागवत, पराजपे, आपटे यांच्यामुळें त्याचें बाहेरील समाजात जाणें-येणें, उठणें-बसणें सुरू झालें, तर रानडे, बेडेकर याच्या रसिक सहवासात त्यांच्या काव्यरचनेला बहर आला. रानडे हे गोड गळ्याचे उत्तम गवई, तर बेडेकर संस्कृत काव्यांत घोळलेले उच्च दर्जाचे विद्वान् रसिक. गायक, काव्यरसिक व कवि असा जणूं त्रिवेणीसंगम जुळून आला. माधवरावांचें मन प्रफुल्लित होऊन ताजेंतवानें बनलें. कवितारचनेला त्यांना नवा हुरूप आला.

अमळनेरप्रमाणेंच जळगावलाहि त्यांची बहाती स्नेहीमंडळी निर्माण झाली. 'अमृततुषार'कर्ते कवि अप्पा सोनाळकर, कवि दुर्गाप्रसाद आसाराम तिवारी, 'काव्यरत्नावली'चे संपादक व प्रकाशक नारायण नरसिंह फडणीस यांच्याशीं त्याचा विशेष परिचय होता. एखादा लेख किंवा कांहीं नवीन कविता लिहिल्या, कीं ते शनिवारच्या गाडीनें संध्याकाळीं जळगांवास जात व रविवारचा एक दिवस या मंडळीच्या सहवासात घालवून सोमवारीं सकाळीं अमळनेरास येत. अप्पासाहेब सोनाळकरांचा माधवरावावर फार लोभ. ते आले म्हणजे अप्पांनीं आपलीं कोर्टाची सर्व कामें बाजूस ठेवून माधवरावांशीं काव्य-शास्त्र-विनोदात वेळ घालवावयाचा. सोनाळकर हे बालकवि ठोमरे यांचे जिवलग मित्र. त्यांच्याविषयींच्या अनेक आठवणी सांगण्यांत ते रंगून जात. त्यांचें स्वतःचें आयुष्यहि अनेक चित्रविचित्र घटनांनीं भरलेलें होतें; त्यांतील अनेक घटनांचें जेव्हां ते रसपूर्ण व रंगदार वर्णन करूं लागत तेव्हां माधवराव

वेस्मयानें त्यांजकडे पाहात निःशब्दपणे ऐकण्यांत तल्लीन होत. सोनाळकर : एक जळगांवातील नाणावलेले फौजदारी वकील होते. त्याचा समाजातील अनेक प्रकारच्या लोकांशीं या वकिलीच्या व्यवसायामुळें संबंध आलेला होता; त्यामुळें त्याचे मनुष्यस्वभावाबद्दलचे अनुभव जितके विविध तितकेच वैचित्र्यपूर्ण असत. माधवरावांना अज्ञात असलेल्या, समाजाच्या एका थराचें, यांचेमुळें दर्शन घडलें. 'सुधारकां'त त्याचप्रमाणें इतर कवितांत माधवरावांनीं याचा उपयोग करून घेतला आहे. अप्पा सोनाळकर जसे बालकवींचे जिवलग मेत्र, तसेच वृद्ध फडणीस कवि विनायक याचे मित्र होते. कवींच्या जुन्या एका सबंध पिढीशीं त्यांचा 'काव्यरत्नावलि' या केवळ कवितेलाच वाहिलेल्या मासिकाचा संपादक म्हणून निकटचा संबंध आलेला; नव्या कवींतहि परिचयाचे असे कवी पुष्कळच. या साऱ्यांच्या स्वभावांतील गमती-जमती त्यांच्या आठवणींच्या बटव्यांतून, माधवराव त्यांच्या बैठकींत आले, कीं बाहेर पडावयाच्या. तिवारी बहुधा बरोबर असतच. त्यांचीहि त्यांजवर मधून मधून क्वचट टीका चालावयाची. आणि मग माधवरावांच्या अवखळ विनोदाला पूर यावयाचा. त्या पुरांत कोण कसा सांपडेल त्याचा नेम नसे. मोठ्या मजेंत आणि निरागस आनंदांत त्यांचा हा रविवार जाई आणि ते नव्या उत्साहानें अमळनेरास परतत.

अमळनेरास शिक्षक या नात्यानेहि त्यांचा लौकिक वाढत होता. [१] "त्या वेळची विद्यार्थिमंडळी माधवरावांच्या शिकविण्यावर अमर्याद संतुष्ट असत. मृदु व अफाईदार इंग्रजी ते बोलत. त्यांच्याकडे मुख्यत्वें इंग्रजी विषयच शिकविण्यास होता. पण प्रवेशपरीक्षेच्या वर्गाचें इंग्रजी त्याच्याकडे दोन्ही वर्षें देण्यांत आलें नव्हतें. मुलांना अन्य तऱ्हेनें संतुष्ट करून सवंग लोकप्रियता मिळविण्याच्या मार्गें ते कधींच नव्हते. पण विषयाशीं समरसता व एकतानता हे दोन्ही गुण यांच्यामध्यें उत्कटपणें वास करीत होते. आणि त्यामुळेंच विद्यार्थ्यांचीं मनें त्यांनीं जिंकलीं होतीं." विद्यार्थ्यांचींच काय, पण त्यांच्या सहवासांत येणाऱ्या सर्व लोकांचींहि मनें आपल्या खेळकर व मोकळ्या स्वभावानें त्यांनीं जिंकलीं

[१] अमळनेरच्या कांहीं स्मृति, वि. रा. रानडे, लोकशिक्षण, फेब्रु.-मार्च १९४०.

होती. या लोकांना त्यांची भेट म्हणजे, [७] "पोटभर, मोकळ्या हास्याची सात्त्विक विनोदाची मेजवानीच असे. अंधाऱ्या खोलींत जसे सूर्यकिरण यावेत, स्वच्छ हवेचा स्रोत येऊन कोळिष्टकें झडून पडावींत आणि वातावरण जसें शुद्ध व्हावें, तसें माधवरावांच्या संगतींत एकदां जोरजोरानें व मोकळेपणानें हसलें म्हणजे मनुष्याच्या मनाचें औदासिन्य पार लोपत असे आणि तें ताजेंतवानें होत असे." त्यांच्याकडे जमणाऱ्या या मंडळीचें पुढे एक 'सहजमंडळ' बनलें. माधवरावांनींच हें नांव ठेवलें होतें. यातील ठराविक मंडळी त्यांपैकीं कोणाहीकडे व केव्हांहि आगाऊ सूचना न देतां अगदीं 'सहजपणें' जमत असत. खेळकरपणांत, सात्त्विक मौजेंत दिवसांतला कांहीं काळ एकमेकांच्या सहवासांत घालवायाचा एवढाच या मंडळीचा उद्देश असे. माधवराव अर्थात् या मंडळाचे प्राण असत. या काळांतील कांहीं आठवणी श्री. बेडेकर व श्री. रानडे यांनीं प्रसिद्ध केल्या आहेत. त्यातील कांहीं निवडक भाग येथें देतों:

"माधवराव ज्या परिस्थितींत अमळनेरला आले होते ती परिस्थिति लक्षांत घेतां त्यांच्या येथें प्रकट झालेल्या स्वभावाचें कौतुक वाटल्याशिवाय राहत नाहीं. अमळनेरला येण्यापूर्वीं ते फर्ग्युसन कॉलेजांत अध्यापक होते. प्रतिकूल परिस्थितीला बळी पडून त्यांना तें कॉलेज सोडावें लागलें होतें. उच्च म्हणून गणिल्या गेलेल्या पुण्याच्या अध्यापकवर्गीय संस्कृतीच्या देखाव्यानें दिपून जाणाऱ्या सर्वसाधारण तिऱ्हाइताला ते एक 'भ्रष्ट देवदूत' वाटत, आणि 'ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति' या भगवद्गीतेंतील वचनाची त्यांना पाहताच आठवण होई. परंतु माधवरावांनीं मात्र या झालेल्या स्थलांतराविषयीं किंवा स्थित्यंतराविषयीं कधींहि खंत घेतल्याचें दिसलें नाहीं. अर्थात् मानवी मनोधर्मानुसार त्यांस वाईट वाटलें नसेल असें नाहीं. किंबहुना त्याच्यासारख्या मानधन व तेजस्वी पुरुषाला तसें वाईट वाटलें नाहीं तरच नवल! माधवरावांच्या दोन वर्षांच्या सहवासांत कांहीं प्रसंगीं भूतकालीन गोष्टींची आठवण होऊन व्यक्त झालेला त्यांचा सात्त्विक संताप मीं पाहिला आहे. त्या वेळीं त्यांच्या खेळकर स्वभावाच्या बाह्य हिरवळीखालीं किती रसरशीत ज्वालामुखी दडलेला होता याची साक्ष पटे,

[७] अमळनेरच्या स्मृति, वि. म. बेडेकर, लोकशिक्षण जाने.-मार्च, १९४०.

आणि मनाला नवल वाटे कीं, माधवरावांनीं जीवनांतील अत्यंत दुर्धर असे आघात सोसून आपली वृत्ति किती आनंदी व खेळाडू ठेवली आहे! अशा प्रसंगीं त्यांच्या सात्त्विक संतापाचा भर ओसरल्यावर ते आपल्या ‘हैमकोशां’तील (गोल्डन ट्रेझरी) लँडोरच्या खालील काव्यपंक्ति म्हणून दाखवीत असत:

‘I strove with none, for none was worth my strife;
Nature I loved and, next to Nature, Art;
I warm'd both hands before the fire of Life;
It sinks, and I am ready to depart.

त्या वेळची त्यांची शांत, प्रसन्न, सात्त्विक मुद्रा अद्यापि माझ्या डोळ्यांपुढें आहे!”

“माधवरावांची दुर्दम्य तरुण वृत्ति परिस्थितीशीं टक्कर देऊनहि कशी हूड व तेजाळ राहिली होती हें दाखविणारा एक प्रसंग मला आठवतो. आम्ही तिघे-चौघेजण चहा पीत बसलों होतों. गप्पाहि चालल्या होत्या. गप्पांचा विषय तरुणांचा अव्यवहारी बेछूट स्वभाव असा होता. माधवराव नित्याप्रमाणें रंगांत येऊन तारुण्याच्या अव्यवहारीपणाचें, बेफिकीरीचें वर्णन करीत होते. ‘अहो, ही हातांत कपबशी आहे ना? तरुण मनुष्य आपल्या बेछूट वृत्तींत ती फोडून टाकील! त्याचें त्याला काही वाटणार नाही. उलट तो आनंदानें हसेल!’ आम्हांला वाटलें, एवढ्यावरच थांबेल. परंतु हें त्यांचें बोलणें संपलें नाहीं तोंच कप खालीं फरशीवर पडून खळ्ळकन् आवाज आम्हाला ऐकूं आला! हा ‘आततायीपणा’ पाहून आम्ही जणुं क्षणभर चमकलों! पण दुसऱ्याच क्षणीं आमच्या कानांवर माधवरावांचें निनादी मोकळें हास्य पडलें, आणि त्याबरोबर आम्ही सर्वचजण जोरजोरानें हसूं लागलों. वरील उदाहरणावरून थोड्या विचाराअंतीं माधवरावांच्या अंगची दुर्दम्य तरुण वृत्ति व बेफिकिरी दिसून येईल. त्यांना आयुष्यांत ज्या प्रकारचे आघात सहन करावे लागले त्यांपुढें एखादा लेचापेचा मनुष्य जमीनदोस्त झाला असता! पण तेच आघात सहन करावयाला त्यांना या बेफिकीर ‘हूडपणा’ची ढाल उपयोगी पडली असावी. या त्यांच्या बंडखोर स्वभावामुळेंच ते शेवटपर्यंत मनानें खंबीर व ‘सदायौवन’ राहिले असावेत. त्यांनीं एकदां सांगितल्याचें आठवतें:

'आयुष्यातील अत्यंत दुर्धर असे आघात होऊन माझ्यावर जेव्हां गहजब झाला, त्या दिवशीं पुण्याच्या सुप्रसिद्ध मथुराभुवनात मी माझ्या मित्राला घेऊन गेलों, आणि 'दूध की लोटी' मागवून त्या जल्लोषांत माझें दुःख मीं बुडवून टाकिलें आहे!"

"माधवरावांचा मराठी भाषेचा जाज्वल्य अभिमान आमच्या 'सहजमंडळा'त सहजपणें उतरला होता. त्याच्याच पुढाकारावरून आम्हीं सहजच असा नियम केला कीं, संभाषणातून ज्याचा इंग्रजी शब्द येईल त्यानें प्रतिशब्दागणिक एक एक दिडकी दंड भरावयाचा. त्यामुळें आम्हीं टांकसाळ उघडली! 'मनी बॅग'ला आम्ही 'चामचंची' म्हणूं लागलों. चहाच्या 'पेल्या'ला शुद्ध मराठी शब्द सुचेना. त्या वेळेला माधवराव मुक्तेश्वर वाचीत होते. एका सुप्रभातीं त्यानीं आम्हांला सांगितलें, 'अहो, पेला याला फार सुंदर शब्द सांपडला आहे! तो शब्द म्हणजे 'अमृति'. त्यानंतर पुढें आमच्या संभाषणामध्यें 'अमृती'चा सर्रास उपयोग होऊं लागला.

"विरहतरंग हें आपलें हृदयंगम व प्रासादिक खण्डकाव्य माधवरावांनीं अमळनेरला असतानाच पुरें केलें. ते स्वतः सहृदय भाषापंडित असल्यामुळें त्यांची वेंचक शब्दासंबंधीं नित्य पारध चालू असे. खानदेशांत 'रावण्या' हा शब्द आर्जव–विनंति या अर्थानें सर्रास उपयोजिला जातो. माधवरावांना हा शब्द आवडला, आणि त्यांनीं तो आपल्या काव्याच्या कोंदणांत बसविला आहे.

'केल्या मीं किति रावण्या, विनवण्या! गेलें न येऊं शके;'

— विरहतरंग, श्लोक २०१

"संस्कृत हा माझा विशेष आवडीचा व अभ्यासाचा विषय असल्यामुळें माधवराव माझ्य शीं कांहीं संस्कृत शब्दाविषयीं विचारपूस–चर्चा करीत असत. 'विरहतरंगा'चें त्यांचें काम चालू असतांना एकदां त्यांनीं मला विचारलें, 'भविष्यकाळ किंवा भावी स्थिति याला इंग्रजी 'Vista' या अर्थी एखादा दुसरा अर्थपूर्ण प्रतिशब्द कोणता देतां येईल?' मी त्यांना 'आयति' हा शब्द सुचविला आणि त्याला आधार म्हणून 'रहयत्यापदुपेतमायतिः' हा किरातार्जुनीयांतील चरण (सर्ग २,१४) सांगितला. त्यांनीं तो शब्द पारखून पसंत केला,

आणि तो [८] आपल्या 'विरहतरंगां'त फार सुंदर रीतीनें उपयोजिला. तसेच मीं एकदां भारवीचा श्लोक गुणगुणत असता तिकडे माधवरावाचें लक्ष वेधलें, आणि त्यानीं सांगितल्यावरून मीं तो पुन्हा म्हटला :

'कान्तानां कृतपुलकः स्तनाङ्गरागे । वक्त्रेषुच्युततिलकेषु मौक्तिकाभः ।
संपेदे श्रमसलिलोद्गमो विभूषां । रम्याणां विकृतिरपि श्रियं तनोति ॥

किरात० स. ७-५

त्यांना या श्लोकातील अर्थान्तरन्यास फार आवडला. त्यानीं त्याचा अनुवाद करून तो मोठ्या मार्मिकपणें 'विरहतरंगां'त गोंविला आहे.[९] माधवरावांच्या या संग्राहक अभ्यासू वृत्तीविषयीं व त्यांच्या प्रतिभाशाली योजकतेविषयीं मला सदैव अत्यंत आदर वाटे. त्यांच्या काव्यांचा एक प्रमुख विशेष म्हणजे त्यांतील पाडित्यपूर्ण सूचक उल्लेख. हे उल्लेख माधवरावांच्या व्यापक ज्ञानाप्रमाणें व्यापक असलेल्या विविध क्षेत्रांतून घेतलेले आहेत. त्या त्या उल्लेखांभोंवतीं त्यांच्या मूळ निर्मात्यानें ओविलेला एक सुंदर अर्थगंध दरवळत असतो. आपल्या काव्यपुष्पमालेंत माधवरावानीं इतर साहित्यिक श्रेष्ठांचीं वचनसुमनें मधून मधून इतक्या सहृदयतेनें गुंफून दिलीं आहेत कीं ज्ञात्या सहृदय वाचकाला त्यांच्या काव्यसौरभांत इतरहि पूर्वपरिचित सुगध अनुभवावयास मिळतो, आणि तो वाचक अशा घनदाट सुवासानें पराकाष्ठेचा सुप्रसन्न होऊन जातो." [१०]

[११] "माधवरावांना चहाशिवाय दुसरें व्यसन नव्हतें. लिप्टनच्या चहाचे

---

[८] "मार्गे तूं मज दाविलीस मधुरे, हृद्गम्य रम्यायति,
होती मोह-मरीचिकाच नुसती दिव्यांगने, काय ती ?

विरहतरंग, श्लोक ७३

[९] 'जें जें रम्य निसर्गसुंदर, तया शोभाच दे विकृति'

विरहतरंग, श्लो. ७३

[१०] अमळनेरच्या स्मृति, वि. म. बेडेकर, लोकशिक्षण, फेब्रु.-मार्च, १९५०.

[११] ,, ,, वि. रा. रानडे ,, ,,

सर्व प्रकार—तांबडा, हिरवा, पिवळा—आळीपाळीनें आम्ही पीत असूं. दुसऱ्या सहामाहींत मी व माधवराव असे एका खोलींत राहात होतों. तेव्हां सकाळचा चहा माधवरावांकडे आणि मधल्या वेळचा माझ्याकडे, अशी वाटणी होती. त्यावेळीं ते 'सुधारक' काव्य लिहीत होते. माझी पहाटेची झोंप फार गाढ असल्यामुळें पहाटे केव्हां उठून ते लिहावयास बसत तें मला कळत नसे! सकाळीं स्टोव्ह पेटविला कीं मला जाग यावयाची. मग चहा पितां पितां पहाटेच्या लिखाणाची उजळणी व्हावयाची. त्यांतील कांहीं शब्द इतके कर्णकटु लागत, कीं मी म्हणे, 'माधवराव, इतका कसा हो तुमचा कान जड?' ते म्हणत, 'तुम्हा संगीतज्ञाना तें ज्ञान अधिक, म्हणून तर तुम्हांला वाचून दाखवितों.' मग ते शब्द बदलून दुसरे घालण्यासाठीं इतके श्रम चालावयाचे कीं पुसूं नये!"

अमळनेरला रानडे, बेडेकर, आपटे, भावे, परांजपे याच्या सहवासात जात असलेल्या या दिवसाबाबत मला एकदां त्यानीं लिहिलें होतें: "इथें बाह्यतः माझा वेळ हसण्याखिदळण्यात जात आहे, परंतु हृदयाचा विकास आणि सुखाचा विलास याला मी पारखा आहें. अशा या मनस्थितींत काही तरी हातून करीत असतों. इथें रा. बाबूराव बेडेकर, विठ्ठलराव रानडे व भाऊराव आपटे याच्या सहवासांत तुमची नेहमीं आठवण होते. तुम्ही जर हल्लीं इथें असतां तर काव्य-शास्त्र-विनोदांत तुम्हाला फार समाधान वाटलें असतें, अशी माझी खात्री आहे. मध्यंतरी आम्हीं एकमेकास नावानेच ( आडनावानें नव्हे ) हाक मारावयाचा प्रघात सुरू केला. नियम मोडणारास प्रत्येक वेळीं एक आणा दंड असे. या संघात भिकुअण्णा पराजपे व वासुदेवराव भावे ( सुमनकर्ते ) हे आहेत. निधी दीड-दोन रुपये जमल्यावर एक दिवस चंगळ केली. नंतर एकमेकांशीं बोलताना इंग्रजी शब्द वापरायचा नाही असा दंडक केला. प्रत्येक चुकीच्या शब्दागणिक दंड एक दिडकी आहे. आतांपर्यंत निधीची रक्कम दोन रुपये झाली आहे. इतराच्या मराठींत किती इंग्रजी शब्द येतात व ते कानास किती कडू लागतात याची जाणीव आतां आम्हांस चांगलीच होते. आम्ही अपवाद म्हणून करीतच नाहीं. हास्यास्पदतेला जुमानीत नाहीं. परवां संध्याकाळीं 'हिंदु धर्माचें भावी स्वरूप' यावर मीं दीड तास व्याख्यान दिलें.

अवघे चार कीं पांच शब्द इंग्रजी चुकून वापरले गेले, ते ‘ पास, ’ ‘ बिल, ’ यांसारखे ! रा. विठ्ठलराव रानडे गातात. कविता तानबाजीनें नव्हे तर सुरेल म्हणतात. त्यामुळें त्यांच्याकडून कविता म्हणवून घेण्यांत खटक्याच्या व वजन-भंगाच्या चुका प्रतीत होतात हा मोठाच फायदा आहे. गेल्या गोकुळ अष्टमीच्या मध्यरात्रीं ‘ मुरली ’ त्यांनीं म्हटली ; रा. बाबुराव मुग्ध झाले आणि मलाहि ती विशेष आवडली. ‘ मधुमाधवा ’त ती समाविष्ट केल्याबद्दल मला माझ्या एकांड्या अभिरुचीची क्षणैक धन्यता वाटली ! रा. बेडेकर हे सहृदय अलंकार-मर्मज्ञ असल्यानें माझ्यासारख्या हौशी ( जातिवंत–स्वयंभू नव्हे ) पद्यकाराला त्यांचा फार फायदा होतो. अगोदर काहीं ओळींशीं आपली समरसता झाल्यावर तींत फरक झाला तर आवडत नाहीं, पण तो फरक जर चांगला असला तर थोड्याशा विचारान्तीं तो पटलाच पाहिजे. ज्याला तुम्ही विचित्र खोड[१२] म्हणता तिला मी कलोद्धारिणी मानितों. स्फूर्तीच्या आवेगाबरोबर कलादृष्ट्या निर्दोष रचना व्हायला जो अधिकार, जी तपस्या पाहिजे ती माझ्यांत नाहीं याची मला जाणीव आहे, म्हणूनच मी बहकून जाण्याचा फारसा संभव नाहीं. खरें पाहिलें तर तुमच्यांत जी विधायक कल्पनाशक्ति आहे ती माझ्यांत नाहीं. म्हणूनच तुम्हांला माझ्या या सुधारणाक्षमतेची भीति वाटते. ”

“ ‘ शलाकें ’त प्रसिद्ध होऊं पाहणाऱ्या माझ्या कविता तुम्हांस पसंत पडल्या हें ठीक झालें, या वेळीं तुम्हा सर्वांना पसंत पडतील अशाच कविता, माझी वैयक्तिक आवड दूर ठेवून, पाठवावयाच्या असें मीं ठरविलें होतें. ‘ मधुमाधवां ’तील निवडणूक ‘ रविकिरणमंडळां ’तील सभासदाना व तुम्हाला आवडली नाहीं याचा परिणाम कदाचित् रा. विठ्ठलराव याच्या मनावर प्रतिकूल होईल तो न होवो ! मी ती निवडणूक करतांना एक दृष्टि ठेविली होती व पुण्याबाहेर ती निवडणूक पसंत पडत आहे ; परंतु भिन्नरुचिर्हि लोका : ”

“ मध्यंतरीं मी दोन लेख लिहिण्यांत निमग्न होतों. ‘ कांहीं तरी ’चें मीं जें विस्तृत परीक्षण केलें आहे तें रा. विठ्ठलराव घाटे यांनीं पाहून ‘ विस्तारा ’कडे

[१२] कविता वारंवार सुधारीत बसण्याची खोड.

पाठविलें. तुमच्या नजरेखालून तें जाईल अशी माझी अटकळ व अपेक्षा होती. 'शलाके'चा पहिला सोळा पानी तक्ता मला मिळाला. शोधन काळजी-पूर्वक केलेलें दिसत आहे."

"कांहीं दिवसामागें मीं हिंदु धर्माच्या व समाजाच्या भवितव्यतेचा विचार करीत बसलों असतांना, मुसलमान धर्माविषयीं व प्रवृत्तीविषयीं जे विचार माझ्या मनांत आले ते नकलून पाठवीत आहें.[13] वाचून रा. विठ्ठलराव प्रभृतींना वाचायला आपण द्यालच."

रा. विठ्ठलरावांची 'पंढरीची पालखी' वाचली. जीव हलला. साधी मराठमोळ्याची मराठी भाषा विठ्ठलरावांनींच लिहावी."

अमळनेरला त्यांच्या अभ्यासू वृत्तीला पोषक असें निवांत व सहानुभूति-पूर्ण वातावरण त्यांना लाभलें होतें. पुणें सोडतांना आपण वैराण जागीं जात असून, रुक्ष व सहानुभूतिशून्य अशा ठिकाणीं आपल्याला दोन वर्षें कशीं तरी कष्टांत काढावीं लागणार अशी जी भीति त्यांना वाटत होती ती खोटी ठरली. उलट त्यांच्या वाङ्मयीन वृत्ति येथें मोहरल्या, फळाफुलांनीं डवरल्या, आणि आपल्या सौगंधानें मराठी रसिकांचीं मनें त्यानीं भारून टाकलीं. मराठी सारस्वतांत त्याचें नांव चिरस्मरणीय करणारीं 'विरहतरंग', व 'सुधारक' हीं प्रदीर्घ काव्यें येथेंच रचिलीं गेलीं. 'छंदोरचने'च्या लेखनाला प्रारंभ येथेंच झाला. 'संगमोत्सुक डोहा'सारखें अप्रतीम करुणसुंदर भावगीत येथेंच स्फुरलें व प्रथमच बंगाली छंदांत गाइलें गेलें. 'स्वरव्यंजनव्यवस्था' हा लेख, 'कांहीं तरी,' 'झेंडूचीं फुलें' यावरील परीक्षणें, 'सुफीवाद ऊर्फ युयुक्षुवाद' हा तत्त्वज्ञानपरिचयात्मक लेख, प्राध्यापक श्री. नि. चाफेकर यांच्या गज्जलां-जलीवरील आक्षेपाना दिलेल्या उत्तराची लेखमाला हीं येथेंच लिहिलीं गेलीं. त्यांच्या या लेखन-प्रपंचामुळें त्यांच्या टीकाकारांची, तशीच, वाङ्मयाभिरुची

[13] 'एका मौलाना गाजीचे उद्गार' असा या कवितेचा मथळा असून तिच्या ६४ ओळी आहेत. 'स्वप्नरंजन'मध्यें 'इन्शाल्ला' या मथळ्या-खालीं, त्यांतील २८ ओळी गाळून, मुळांत बराच फेरफार करून ती छापण्यांत आली आहे.

असलेल्या लोकांची त्यांच्या संबंधींची वृत्ति पालटूं लागली होती. हा केवळ प्रेमातच रंगणारा कवि नाहीं, तर पांडित्यांतहि तो रंगतो आणि इतरांनाहि रंगवितो असा आदरयुक्त समज त्यांच्याबद्दल निर्माण होऊं लागला होता. १९२५ च्या डिसेंबरांत जेव्हां त्यांचा 'फार्सी–मराठी कोश' पुण्याच्या 'भारत-इतिहास-संशोधक-मंडळा'तर्फे प्रसिद्ध झाला, तेव्हां त्यांच्या शत्रूंना व निंदकांना तो एक जबरदस्त आश्चर्याचा धक्काच बसला. कवि हा कोशकार बनूं शकतो या 'नवला'नें त्यांचे 'वामनी' मेंदू भिरभिरले. या कोशामुळें काव्याला रिकामपणची कामगिरी समजणारा महाराष्ट्रांतील विद्वानांचा एक वर्ग माधवरावांकडे कौतुकानें पाहूं लागला, आणि 'काव्यरचनेंत आपली तल्लख बुद्धिमत्ता न दवडतां असल्या कामीं ती खर्चावी,' असें आग्रहानें सुचवूं लागला. या प्रकाशनामुळें कांहीं सोवळ्या साहित्यिकांच्या माधवरावांविषयींच्या वृत्तींत फरक पडलेला दिसूं लागला. याची एक गमतीदार आठवण खुद्द माधवरावानींच आपल्या एका लेखात पुढीलप्रमाणें दिली आहे. 'ज्यांना पुण्यांतून माझ्या संगतींत हिंडणें अवघड वाटत होतें असे एक सोवळे साहित्यिक, कोश प्रकाशित झाल्यावर, भारत-इतिहास-संशोधक-मंडळाच्या संमेलनाला चला म्हणून सांगावयास आपण होऊन आले, अशी कांहीं क्रांति माझ्या कोशाच्या प्रकाशनानें केली. हा प्रसंग नाट्यछटेला अनुकूल असाच घडला.' माधवरावांनीं आतां पक्कें हेरलें, कीं आपली झालेली लौकिक हानि भरून काढण्याचा हाच समय आहे. १९१५ सालीं ज्या निर्धारानें, कृतनिश्चयानें पदवीपरीक्षेंत यश मिळविण्याचें त्यांनीं ठरविलें, त्याच निर्धारानें आणि कृतनिश्चयानें १९२५ सालीं वाङ्मयीन कार्याचा संकल्प सोडून आपल्या आयुष्याला त्यांनीं एक नवी कलाटणी दिली. त्यानीं आपलें वाङ्मयीन ध्येय ठरवून टाकले आणि त्याच्या उग्र साधनेला सुरुवात केली.

त्यांच्या भोंवतालचें धुकें आता विरत चाललें होतें. त्याचा ध्येयतारा त्यांना आतां स्पष्ट दिसत होता.

# १०

## प्रेम होईना तुझ्यानें, प्रेम माझें राहुं दे !

अमळनेरला अशा प्रकारें स्नेहपूर्ण वातावरणांत त्यांचे दिवस बाह्यतः सुखानें चालले होते, तरी त्यांच्या डोक्यावर डेक्कन एज्युकेशन सोसायटीनें जी तलवार टांगत ठेविली होती त्यामुळें अंतर्यामीं ते असुखीच असत. ज्या शत्रूंनीं कुभांड रचून आपल्याला आपल्या आवडत्या कॉलेजांतून, दोन वर्षांपुरतें का होईना, बाहेर काढलें, ते पुन्हां निर्विघ्नपणें त्यांत पाऊल ठेवूं देतील किंवा नाहीं याची त्यांना वारंवार शंका येई. यासाठीं प्रतिपक्षाला आपल्याविरुद्ध हिकमती लढवायला जरासासुद्धां वाव मिळूं नये म्हणून त्यांनीं आपली वागणूक फार सावधतेची ठेविली होती. पण दैव या बाबतींत त्यांच्या हात धुऊन पाठीस लागलें होतें असें दिसतें. ज्या गोष्टी व्हावयास नको होत्या त्याच अगदीं घडत होत्या.

फर्ग्युसन कॉलेजमधून, ज्या मुलीच्या परिचयामुळें त्यांना बाहेर पडावें लागलें, त्या मुलीबद्दल माधवरावांच्या कांहीं स्नेह्यांच्या हृदयांत सहानुभूतीचे पाझर फुटूं लागले. त्यांना असें वाटूं लागलें कीं, माधवराव त्या मुलीशीं जर विवाहबद्ध होतील, तर हें सारेंच प्रकरण मिटेल आणि त्यांना आपल्या पूर्वस्थानावर जाणें सुलभ होईल. या मंडळीनें त्या मुलीचीहि तशीच समजूत करून देऊन, तिला त्या बाबतींत अनुकूल करून घेतली. एके दिवशीं माधवरावांना, पूर्वकल्पना कांहींहि न देतां, मुंबईस श्रीधरपंत रानडे यानीं आपल्याकडे बोलावून घेतलें. श्रीधरपंतांची यावेळेस सुरतेहून मुंबईस रॉयल इन्स्टिटयूट ऑफ सायन्समध्यें बदली झालेली होती. माधवरावांना वाटलें कीं, रविकिरणमंडळाची बैठक फार दिवस झाली नाहीं, तेव्हां बोलावलें असेल. ते अमळनेराहून तांतडीनें मुंबईस आले. पण तेथें त्यानीं जो प्रकार पाहिला त्यानें त्यांचें मन पार विटून गेलें. ज्या मुलीबद्दल ते

अगदीं सावधपणें वागत होते ती मुलगी रानडे याजकडे आली होती. रानडे व गोखले याचे सहानुभूतीमुळें असो किंवा तिला स्वतःला माधवरावांबद्दल आकर्षण वाटत असल्यामुळें असो, तिनें माधवरावांना 'आपण एकमेकांशीं विवाहबद्ध व्हावें' अशी सूचना केली. या सूचनेचे वेळीं तिनें ज्या भावना व्यक्त केल्या त्या पाहून, माधवरावाच्या शब्दांतच सांगावयाचें म्हणजे, त्याना 'वीट आला'. जी गोष्ट धादान्त असत्य असल्याचें जाहीर करून स्वतःवर दुर्धर प्रसंग आपण ओढवून घेतला, आणि एखादे दिवशीं 'असत्य तें असत्यच' हें समाजाला स्वतःच्या आचरणानें पटवून देऊन प्रतिपक्षाचे डाव उलटवून टाकूं अशी उमेद बाळगली, तिचा चक्काचूर होण्याचा हा प्रसंग पाहून ते दिङ्मूढ झाले. त्यांच्या तत्त्वनिष्ठेची आणि मनाच्या खंबीरपणाची यावेळेस कसोटीच लागावयाची होती. स्नेही शत्रु होणार आणि या प्रसंगाचा आपले प्रतिस्पर्धि चागलाच उपयोग करून घेणार, हें त्यांना स्पष्ट दिसलें. रानडे व गोखले यांसारख्या आपल्या अत्यंत विश्वासाच्या स्नेह्यानीं आपल्याशीं या बाबतींत आधीं विचारविनिमय न करतां हा प्रसंग घडवून आणावा, हें पाहून त्यांना अतिशय मनस्ताप झाला. पण माधवराव हे तत्त्वनिष्ठेच्या बाबतींत, प्रत्यक्ष पोटचें पोर जरी आडवें आलें तरी कापून काढण्यास मागेंपुढें न पाहणारे होते, त्या ठिकाणीं असल्या या लौकिकाच्या जीवनमरणाच्या प्रसंगीं, स्नेही कितीहि जीवाभावाचे असले तरी त्याच्या भलत्या भीडेला व व्यावहारिक चाणाक्षतेला ते बळी जाणें शक्यच नव्हते. स्नेहीच काय, पण सारें जग उलटलें तरी हरकत नाहीं; पण जी गोष्ट आपण एकदां सत्याला स्मरून 'नाहीं' म्हटली, ती केवळ लौकिकाच्या लाभासाठीं तत्त्वच्युत होऊन 'होय' म्हणणार नाहीं, असें त्यानीं स्पष्टपणानें सागितलें. रानडे याना वाटलें होते, कीं माधवराव आपला शब्द मानतील. पण माधवरावांच्या पीळाची त्यांना नीट कल्पना नव्हती. ते भलत्या भ्रमात होते. रानडे यांचा अहंकार त्यामुळें दुखावला गेला. गोखले त्यावेळेस रानड्याचेच अनुयायी. त्यांनाहि आपली मानखंडना झाली असें वाटलें. दोघेहि माधवरावांपासून कांहीं काळ दूर झाले, मित्राचे अ-मित्र बनले.

मुबईच्या या प्रसंगानंतर, योग्य तो बोध घेऊन रानडे स्वस्थ राहतील, ताटस्थ्य स्वीकारतील अशी माधवरावांची अपेक्षा होती. पण ती १९२५ च्या उन्हाळ्यांत खोटी ठरली. रानडे, गोखले यानी हा प्रश्न रविकिरणमंडळा-पुढें निर्णयार्थ ठेवला. माधवरावांच्या अंतःकरणांत त्यामुळे पराकोटीचा भडका उडाला. नैतिक जबाबदारीची अप्रस्तुत जाणीव देऊन आपल्याला हे नमवूं पाहात आहेत, हे पाहून त्यानीं त्याचें संयुक्त दडपण आपल्या सर्व शक्ति एकवटून उडवून लावलें. विठ्ठलराव घाटे त्यांच्या पाठीशीं होतेच. त्यानीं रानडे आणि गोखले याचे सर्व आक्षेप खोडून टाकले. ते दोघेहि अहंकाराच्या आहारीं जाऊन आपल्या एका निर्मळ, पापभीरू पण भाबड्या वृत्तीच्या स्नेह्याचा नाहक बळी घ्यावयास पुढे सरसावत आहेत हें त्यांना स्पष्ट दिसत होतें. माधवराव निष्पाप, निरपराधी आहेत याची त्याना पूर्ण खात्री होती. जग काय म्हणतें किंवा म्हणेल याची पर्वा त्याना नव्हती. आपल्या मित्राचें नैतिक नाणें खणखणीत चांदीचें आहे, बद्द कथलाचें नाहीं असा त्यांचा विश्वास होता; त्या नाण्याची पुरी पारख त्यांना होती. त्यामुळें कोणी कितीहि आग पाखडली तरी त्याला ते भिणारे नव्हते. 'माधवरावाना मंडळांतून दूर करा, नाहींपेक्षां आम्ही तरी जातों,' असें जेव्हां अप्रत्यक्षपणें सुचविण्यांत आलें, तेव्हां विठ्ठलरावांनीं स्पष्टपणें सांगितलें कीं, 'माधवराव मंडळातून निवृत्त होणें शक्यच नाहीं. माझ्या डोळ्यासमोर मी हें घडूं देणार नाहीं. माझ्या साऱ्या नैतिक शक्ति एकवटून मी या गोष्टीचा प्रतिकारच करीन. ज्यांना माधवराव असल्यामुळे मंडळाशीं संबंध ठेवणें कठीण वाटतें, त्यांनीं वाटल्यास सुखाने दूर व्हावें. ते दूर गेल्यानें लोकापवाद काहींहि उठले तरी त्याची तमा मी बाळगणार नाहीं.' विठ्ठलरावाच्या या पाठपुराव्याने रानडे–गोखले हतप्रभ झाले. पण त्यांनीं आपला हेका सोडला नाही. रानड्यांनीं तर माधवरावाना पत्रानें लिहून कळविलें की, 'तुमची–आमची मैत्री आतां शक्य नाहीं. रस्त्यातला एक माणूस आणि तुम्ही मला सारखेच.' रानड्याचे हे उद्गार माधवरावांना जिव्हारीं झोंबले.

माझ्या डोळ्यांसमोर आजहि माधवरावांची त्या रात्रींची व्यथित मनस्थितींतील मूर्ति जशाची तशी उभी राहते. १९२५ सालच्या मे महिन्याची

## प्रेम होईना तुझ्यानें, प्रेम माझें राहुं दे!

सतरावी तारीख होती ती. शारदोपासक संमेलनाचें पहिलें अधिवेशन इतिहासाचार्य विश्वनाथ काशीनाथ राजवाडे याच्या अध्यक्षतेखालीं पुणें येथें भारत-इतिहास-संशोधक-मंडळाच्या मंदिरात भरलें होतें. त्यानिमित्त रात्रीं काव्यगायनाचा कार्यक्रम चालला होता. प्र. के. अत्रे अगदीं पहिल्यानेंच त्या ठिकाणीं जाहीर रीतीनें आपल्या विनोदी कवितांचें वाचन करीत होते. पुण्यातील श्रोत्यांना तो प्रकार अगदीं नवीन होता. टाळ्यांचा कडकडाट आणि हास्याचा कल्लोळ दर काव्यपंक्तीगणिक उठत होता. आंत श्रोत्यांची तुफान गर्दी होती. आणि बाहेर एकटेच मंदिराच्या पायऱ्यांवर विमनस्क स्थितींत माधवराव बसलेले होते. माझ्या दृष्टीला ते तशा स्थितींत पडतांच मी स्तंभितच झालों. "तुम्हीं असे इथ बसून कां? आंत कां येत नाहीं? मीं त्याना विचारलें. ते मला उत्तरले, " माणसांत उठण्या-बसण्याची माझी लायकी आहे कोठें?" "असं कसं तुम्ही म्हणतां माधवराव?" मी म्हणालों. " विनाधार मी कधीं बोलत नसतों, गंगाधरराव. चला, आपण बाहेर जाऊं. मग सांगतों सारं." आम्ही दोघेहि तेथून बाहेर पडलों. त्यांनीं घाट्यांच्या घरीं —त्या किंवा त्याचे आदले दिवशीं असेल—भरलेल्या 'मंडळा'च्या बैठकींतील सारी हकीकत मला सांगितली आणि रानडे यांनीं त्यांना लिहिलेलें पत्र दाखवून म्हटलें, " माझे मित्रच मला काय मानतात तें पाहा. माणसांत उठण्या-बसण्याची माझी लायकी आहे का? गंगाधरराव, विठ्ठलराव जर माझ्या पाठीशीं आज नसते, तर माझ्या शत्रूंचे आधीं माझ्या मित्रानींच मला माणसातून उठविलें असतें. माझ्या दैवानें अनेक बाबतींत, अनेक वेळां जरी मला दगा दिला असला तरी कांहीं कांहीं वेळां मला हातहि दिला आहे. विठ्ठलरावांचें पाठगखेपण हें त्यांतलें एक आहे." त्याच्याने पुढें बोलवेना. आम्ही दोघेहि निःशब्दपणें त्या मध्यरात्रीचे वेळीं निर्मनुष्य अशा रस्त्यांतून विठ्ठलरावांच्या घराकडे चाललों होतों. जिकडे तिकडे अगदीं शुकशुकाट पसरला होता. माझ्या मनांत त्या तशा परिस्थितींत, 'माधवरावाच्या भावी आयुष्यांत हाच शुकशुकाट तर आढळणार नाहीं ना?' असा एक अशुभ विचार डोकाविल्याशिवाय राहिला नाहीं.

या साऱ्या प्रसंगांवरून माधवरावांनीं आपल्या मनाशीं एक खूणगांठ पक्की बांधली कीं, 'यापुढील झुंज प्रखर आहे. आपले प्रतिस्पर्धी या सर्व प्रसंगांचा

आपल्या विरुद्ध सोयीस्कर रीतीने निश्चित उपयोग करून घेणार.' आणि पुढें अनुभवहि तसाच आला.

मुंबईस घडलेला तो प्रसंग, रानडे यांच्या त्या घटकेस तेथें हजर असलेल्या एका निकटच्या नातलगानें, माधवरावाच्या शत्रुपक्षांतील एका प्रमुख व्यक्तीस पुण्यास आल्यावर इत्थंभूत निवेदन केला. माधवरावांस जें 'नको' होतें व त्याच्या शत्रुपक्षास जें नक्की 'हवें' होतें तेच मिळालें. माधवरावांशीं सहानुभूति असलेल्या त्यांच्या कॉलेजातील सहकाऱ्यास ही मंडळी खिजवून विचारूं लागली, "पटवर्धन आमचे अगदी निर्लेप असें म्हणत होतां ना? घ्या आता. बोला, मुंबईतील भेटीवरून काय ठरवावयाचें ते?"

माधवरावांच्या प्रतिस्पर्ध्यांस हवी होती ती संधि आता मिळाली. त्यांनीं १९ सप्टेंबर, १९२५ रोजीं बोर्डाची सभा बोलावून, त्यात 'एम्. टी. पटवर्धन यांस त्याच्या रजेची मुदत संपल्यावर संस्थेत रुजू करून घेऊं नये' अशा अर्थाचा ठराव पास करून तो आजीव सेवकांच्या ऑक्टोबर महिन्यांत भरणाऱ्या सभेपुढें मान्यता मिळविण्याकरितां पाठविला. बार खच्चून भरण्यांत येऊन ऑक्टोबरांत पटवर्धनाचा पुरा फडशा उडविण्याचें ठरलें. माधवराव या बनावासंबंधीं रा. वि. म. यास ता. २५ सप्टेंबर, १९२५ रोजीं लिहितात: "दिवाळींत बडोद्यास जाण्याचा व विश्रातींत एक पंधरवडा काढण्याचा माझा विचार होता. पण हात धुऊन पाठीस लागलेलें माझें दुर्दैव मला विश्राति घेऊं देतें कसचें? रा. रानडे यानीं मुंबई येथें केलेल्या एकांगी लुडबुडीबद्दल मला प्रायश्चित्त भोगलेंच पाहिजे. रामभाऊ, 'मूर्ख मित्रापेक्षां शहाणा शत्रु पुरवतो,' या म्हणीची सत्यता मला आताच पटूं लागली आहे. विजा लवत आहेत व माझ्या रक्ताचें प्राशन करायला शत्रु तान्हेले आहेत. प्रत्यहीं सूचना माझ्या कानावर येत आहेत. शत्रूच्या कुभाडरचनाकौशल्यामुळें मित्रहि साशंक होऊं लागले आहेत. ता. ११ ऑक्टोबरला पुण्यास बॉडीची सभा आहे त्या वेळीं अखेरचा सामना आहे. मी एकटा असलों तरी तोंड देणार आहें व दिलेंच पाहिजे. कदाचित् अपयशहि येईल, परंतु सत्याचा नेहमींच विजय होतो हें म्हणणें भ्रामक आहे. खिस्तमताचा पुढें प्रसार झाला, पण खिस्ताच्या शिष्यांनीं ऐनवेळीं कानांवर हात ठेवले व तो लटकला हें तर खरेंच ना?

मी निर्दोष आहें अशी माझी स्वतःची खात्री आहे. म्हणून पुढें अप्रतिष्ठा, हाल दिसत असूनहि मी सत्य सोडूं इच्छीत नाहीं. माझ्या स्नेह्यांजवळहि मी कृपेची भिक्षा मागत नाहीं. न्यायाचीच अपेक्षा मी करीत आहें. दैवाच्या तेढेपणानें मित्रांकडूनहि अन्याय झाल्यास 'देवा, त्यांना क्षमा कर. आपण काय करीत आहों याची त्यांस जाणीव नाहीं,' अशी प्रार्थना करून स्वस्थ (अथवा अस्वस्थ) बसणें भाग आहे."

रा. वि. म. यांस पत्र लिहिलें त्याचे आधी दोन दिवस, ता. २३ सप्टेंबर, १९२५ रोजीं त्यानीं मलाहि या प्रकरणासंबंधीं पुढीलप्रमाणें पत्र धाडलें होतें:

"बॉर्डीत (आजीव सेवकाच्या) ठराव तीन चतुर्थांशानें मंजूर व्हावा लागतो. विरुद्ध पक्ष सत्याखेरीज सर्व दृष्टीनीं प्रबळ आहे. आमच्या पक्षांतील मंडळी सुस्वभावी पण दुर्बळ आहेत. त्यांच्यापैकीं फक्त प्रो. नाईकांजवळ मुंबईस घडलेल्या प्रकारासंबंधीं मी बोललों होतों. प्रो. आपटे अथवा नाईक यांच्याकडून अजून मला पत्र नाहीं. बोर्डाच्या सभेच्या वेळीं विरुद्ध पक्षाच्या मंडळीनीं काय भाषणें केलीं हें मला कळेपर्यंत मीं कांहींच उत्तर देऊं शकत नाहीं. ××× अथवा तिचे वडील यास सावधगिरीची सूचना मीं देणें इष्ट नाहीं. वास्तविक हें काम ज्यानी अगोदर माझ्याशीं दिलखुलाशानें न बोलतां चमत्कारिक सहानुभूतीनें व अदूरदर्शीपणानें मुंबईस नसती ढवळाढवळ केली त्यांचें आहे. ××× ला मीं फसविलें असें जर तिचें मत असेल तर माझ्या बचावाकरितां तिनें खोटें बोलावें हें मला सम्मत नाहीं. मनुष्यानें पापाबद्दल एक वेळ प्रायश्चित्त न घेतलें तरी चालतें पण अव्यावहारिकपणाबद्दल हुषार जग त्यास प्रायश्चित्त दिल्यावाचून सोडीत नाहीं. ××× चा माझ्याशीं निव्वळ स्नेही असाच संबंध होता, निराळें कांहीं 'अंडरस्टँडिंग' (भावी वधू-वर अशा तऱ्हेचें) नव्हतें ही गोष्ट स्पष्ट दाखविणारें तिचें पत्र मजजवळ आहे."

"विरुद्ध पक्षाची मंडळी दुसऱ्याच्या विपरीत स्थितीचा फायदा घेऊन वाटेल तें करायला चुकणार नाहींत हें मी जाणून आहें. माझ्याजवळील एकाहि पत्रांत ×××नें आपली इच्छा ध्वनित केलेली नाहीं. तिच्याजवळील माझ्या पत्रांत एकहि तसा शब्द नाहीं. इतक्या उप्पर स्वतःवरची जबाबदारी

न ओळखणाऱ्यांनीं वाटेल तें मत देऊन पूर्वींच ठरविलेला विचार कायम केला तर मी त्याला कांहीं करूं शकत नाहीं."

"तुम्हीं ×××स जाऊन सर्व गोष्टी स्पष्ट करून सावधगिरीची सूचना द्यावी हें मला इष्ट वाटतें. ××× शीं प्रेमाचें बोलणें लावून मी पुढें लग्नाचें टाळलें व तिची वंचना केली या आरोपावर मला दोन वर्षें अज्ञातवास स्वीकारावा लागला. जर मी भ्याड असतों तर लग्न ठरलें आहे असें म्हणून माझें यत्किंचितहि वाकडें होऊं शकलें नसतें. सत्यासाठीं जेव्हां शिक्षा झाली, त्याच सत्याचा मी अवलंब करणार आहें."

माधवरावांची ही सत्यनिष्ठ व धीरोदात्त वृत्ति पाहिली म्हणजे त्यांच्या प्रतिस्पर्ध्यांबद्दल असीम घृणा निर्माण होते व शिक्षणक्षेत्रांत शिरलेल्या या क्षुद्र जंतूंकडे पाहून राष्ट्राच्या भवितव्याबद्दल मन निराश होतें. संकुचित दृष्टीच्या स्वार्थांध गुरुजींचे शिष्य विशाल दृष्टीचे व उदार वृत्तीचे निपजावेत तरी कसे? आणि असल्या या व्यक्तींनीं भरलेलें राष्ट्र मागासलेलें राहिलें, जगाला उपेक्षणीय वाटलें तर त्यांत काय नवल? ज्या राष्ट्रांतील लोकांना क्षुद्र स्वार्थापुढें सत्याची, नीतीची यत्किंचितहि चाड वाटत नाहीं, त्यांचें राष्ट्र जर इतर उन्नत व प्रगत राष्ट्राकडून वारंवार ठोकरलें गेलें तर त्यांत काय आश्चर्य!

ऑक्टोबरमध्यें (१९२५) माधवराव पुण्यास गेले. त्यानीं 'बॉर्डांत' आपल्याला पाठिंबा देणारे लोक कितपत खंबीर आहेत याचा कानोसा घेतला. त्यांना आढळून आलें कीं, मुंबईत घडलेल्या प्रसंगाचा शत्रुपक्षानें भरपूर उपयोग करून घेतला आहे; आपल्या स्नेह्यांपैकीं एक-दोघेजण गडबडले आहेत; आपल्याला आपल्या बाजूनें हुकुमी बहुमत मिळणें कठीण आहे. ही वस्तुस्थिति लक्षांत येतांच त्यानीं ता. ११ ऑक्टोबर रोजीं दुपारीं आपल्या आजीव सभासदत्वाचा राजीनामा लिहून पाठविला. हा राजीनामा[1] देतांना त्यांचें मन दुःख-विषादानें भरून जाणें साहाजिक होतें. त्या दिवशींच्या त्यांच्या मनःस्थितीचें चित्रण शंकरराव कानेटकर (कवि गिरीश) यांनीं

[1] हा राजीनामा पुढीलप्रमाणें :

आपल्या एका आठवणींत [२] पुढीलप्रमाणें केलें आहे. " फर्ग्युसन कॉलेजमध्यें माधवरावांना ठेवावें कीं काढावें याबद्दलची चर्चा जोरांत चालली होती. याबद्दलच्या शेवटच्या सभेची तारीख मला ठाऊक नव्हती. एक दिवस माधवराव माझ्या पुण्यांतील घरीं (४६१, शनवार) सायंकाळीं अंधार पडल्यावर आले व माझ्या खोलींत हातपाय ताणून तसेच म्हणजे कपड्यांसह व बुटांसह सतरंजीवर उताणे पडले. ते सारखे सुस्कारे सोडीत होते. मला या प्रकारचा त्यांचा अनुभव अनेक वेळां आलेला होता. म्हणून मीं सहज म्हटलें 'माधवराव, तुमच्यासंबंधींच्या निकालाची बैठक केव्हां आहे?' त्यावर ते

Poona, 11th Oct. 1925

To

The Chairman,
Body of Life-Members,
D. E. Society, Poona.

Sir,

I find that some of my colleagues are extremely prejudiced against me and that even if my case is not decided by the required majority it is likely to be taken directly or indirectly to an outside body a step which I think to be against the best settled traditions of the society and prejudicial to the individual life-members as well as to the interests of the society in general, although therefore I believe myself to be innocent and unfairly treated ; I do not wish to be the cause of a departure from these traditions which I feel may tend to a serious crisis in the society. I therefore tender my resignation of my life-membership of the society. I have ever hope that those who are at present prejudiced against me will one day come to realise that their prejudices were altogether unfounded.

I beg to remain
Sir,
Your most obedient servant,
Sd/- Madhav Patwardhan.

[२] साहित्यक्षेत्रांतील कांहीं आठवणी ; ज्ञानप्रकाश, दिवाळी अंक १९५०.

ताडकन् उठून बसले व म्हणाले, ‘ You see Mr. M. T. Patwardhan dead here. माझा निकाल लागला. मीं सोसायटी सोडली !’ ते असें बोलले व त्यांचे डोळे भरून आले. थोड्या वेळानें मला ते म्हणाले, ‘ शंकरराव, तुमच्याजवळ शेक्सपीयरचें किंग लियर नाटक आहे का हो ?’ मीं ‘ होय ’ म्हटलें व फडताळांतून तें पुस्तक काढून त्यांचे हातीं दिलें. दिव्याजवळ एकाद्या अधाशी हावऱ्या माणसाप्रमाणें त्यांनीं भराभर पानें चाळलीं व एका पानावर थाबून ते मोठ्या आवेशानें वाचूं लागले —

“ The userer hangs the cozener.
Through tatter'd clothes small vices do appear ;
Robes and furr'd gowns hide all.
Plate sin with gold,
And the strong lance of justice hurtless breaks ;
Arm it in rags, a pigmy's straw doth pierce it.

हें वाचून होताच त्यांनीं हातातील पुस्तक समोरच्या भितीवर त्या आवेगांत ताडकन् फेंकलें, व ‘ That's why Shakespeare is great ’ असे उद्गार काढले. ” पण ही उद्विग्नता त्यानीं आपल्यांत फार वेळ राहूं दिली नाहीं. ज्या संस्थेवर त्याचें अत्यत उत्कट असें प्रेम होतें, जिच्या सेवेंत त्यांना आपल्या जीविताचें साफल्य वाटे, तिच्याशीं असलेला त्यांचा संबंध आतां कायमचा तुटत होता. पण त्याबद्दल त्यांनीं आपल्या मनांत कोणत्याहि प्रकारची कटुता राहूं दिली नाहीं. त्यांच्या, या संस्थेबद्दल त्या वेळेस काय भावना झाल्या त्या खालील गज्जलात त्यांनीं व्यक्त केल्या आहेत.

प्रेम होईना तुझ्यानें, प्रेम माझें राहुं दे !
आचरूं ये धर्म तूझा तूं नि मी माझा मुदें.

प्रेम होईना तुझ्यानें, दोष हा नाहीं तुझा,
स्वस्थ राहीं तूं सुखें, ठेवीं न चित्तीं किंतु, जा.

प्रेम होईना तुझ्यानें, प्रेम होई का हटें ?
प्रेम द्या अन् प्रेम घ्या काऱ्यींच हा सौदा पटे.

## प्रेम होईना तुझ्यानें, प्रेम माझें राहुं दे!

प्रेम होईना तुझ्यानें, दैव ही क्रीडा करी,
वारि–भासाची मजा ती वालुकेच्या सागरीं!
प्रेम होईना तुझ्यानें, स्वर्ग थांबे स्वस्थलीं,
भूतलींची संपदा नाहीं अजूनी संपली.
प्रेम होईना तुझ्यानें, राख कां घालूं शिरीं?
कां स्मशानाची कळा आणूं मनाच्या मंदिरीं?
प्रेम होईना तुझ्यानें, जाऊं दे तें बापुडें!
मत्स्मृतीला माळ तूं घालूं नको वायां पुढें!

माधवराव, आपल्या पुढच्या आयुष्यांत फर्ग्युसन कॉलेजमधील या घटनेबद्दल ज्या ज्या वेळीं बोलत त्या त्या वेळीं ते संस्थेला कधीं दोष न देतां, ज्या आसुरी वृत्तीच्या लोकांनीं केवळ आकसानें शस्त्र उपसलें त्यांच्याच कारस्थानांबद्दल उद्वेगानें बोलत व अशा वृत्तीच्या लोकांपासून सावध राहण्याबद्दल ते इतराना सूचना देत. कांहीं काळानें फर्ग्युसनमधील हा कारस्थानी गट तेथून हुसकला गेला व त्यानें आपला सवता संसार थाटला. माधवरावांची स्नेहीमंडळी अधिकारावर आली. त्यामुळें संस्थेशीं असलेले त्याचे स्नेहाचे संबध अबाधित राहिले. माधवराव संस्थेपासून जरी दूर झाले होते, तरी ही मंडळी त्यांना आपल्यामध्यें बोलावून मानानें वागवी. फर्ग्युसन कॉलेजचा जेव्हां १९३५ सालीं सुवर्णमहोत्सव झाला त्या वेळेस माधवरावाना समारंभाचें त्यानी आदरपूर्वक आमंत्रण दिलें. आणि माधवरावहि मोठ्या प्रेमानें उपस्थित राहिले. पण कांहीं कुत्सित व वक्रबुद्धीच्या लोकांना तें पाहवले नाहीं. ‘हा कसा बुवा इथें?’ असे उद्गार त्यानी काढले. माधवरावाच्या ते कानीं जाताच त्यास जसें वाईट वाटलें, तसेंच मनुष्यांचीं मनें इतकीं संकुचित व दीर्घद्वेषी असावीं याबद्दल त्यांना उद्वेग वाटला आणि एकप्रकारें कींवमिश्रित हसूंहि आलें. त्यानी या प्रसंगाला उद्देशून ‘अतर्क्य प्रेम’ ही खालील कविता लिहिली आहे.

माझ्याकडे हे पाहती कीं हा कसा आला इथें,
आनंदही चर्या कशी याची खुलूनी दाविते,
बोलावणें गेलें तरी निःसत्त्व शिष्टाचार हा—
भोळाच किंवा धूर्त ये घेऊनि तो आधार हा,

अन् सारिलें प्रेमासवें याला अधिक्षेपें दुरी,
का स्वाभिमानाची छटा नाहींच ती याचे उरीं,
    का ये करुनी ध्यावया वांया स्वतःची वंचना —
    स्वानंदमग्ना मंगला याच्याकडे पाहीच ना,
माला तिच्या कंठीं पडे बोचे कसा काटा न या,
आशीर्वचांच्या वादळीं का ग्रासिती लाटा न या, —
    सामान्य लोकदृष्टिचे हे प्रश्न सारे पाहतों
    अन् गुंगुनी या मंगलीं कौतूहलें मी राहतों.
अन्याय तूं केलास तो होता किती मोठा तरी
त्याहून मोठें प्रेम हें आहे भरूनी अंतरीं.
    तूतें करावें अंकिता प्रेमीं न माझ्या हेतु हा—
    सेवा तुझी माझ्या करें होवो अशी होती स्पृहा.
तूतें नको सेवा, बरें! मी ठेवितों ती दक्षता —
उत्कर्षकालींही तुझ्या टाकूं नको का अक्षता!

माधवरावांच्या या वृत्तीची त्यांच्या निंदकांना काय कल्पना? आणि स्वार्थाच्या बाजारपेठेंत माधवरावांसारख्याच्या निरपेक्ष, निःस्वार्थ, निरासक्त प्रेमाला भाव तरी कोठून मिळणार? देवाणघेवाणाच्या सौदेबाजीसाठीं कंठशोष करून धमाल उडविल्या जाणाऱ्या व्यवहारी पेठेंत माधवरावांसारख्यांचा आवाज कुठल्या कुठेंच बुडून जावयाचा!

माधवरावांचें फर्ग्युसन कॉलेजवर एवढें प्रेम होतें कीं, अंतकाळींहि ते त्याला विसरले नाहींत. आपल्या प्रेमाची स्मृति म्हणून त्यांनीं, आपला सर्व ग्रंथसंग्रह त्याला देऊन टाकण्याबद्दल आपल्या पत्नीला सुचविलें आणि त्याप्रमाणें तो दिलाहि गेला. जिच्याकडून अप्रत्यक्ष कां होईना अन्याय घडला, तिच्याबद्दल असें औदार्य दाखविलेलें अन्य उदाहरण क्वचितच आढळेल.

# ११

# पुन्हां पुण्यांत

डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या आजीव सेवकत्वाचा राजीनामा देऊन ते मोकळे झाले खरे, पण पुढें काय, हा प्रश्न त्यांच्यापुढें दत्त म्हणून उभा राहिलाच. अमळनेर येथील प्रताप हायस्कूलच्या अधिकारी मंडळीची वृत्ति लक्षांत घेतां तेथें आपण स्थिर होऊं शकूं असें त्यांना वाटत नव्हतें. ते थोडेसे विचारातच पडले होते. रा. वि. म. यांना ते लिहितात :[1] "दिङ्मूढ होत्साता मी काळ कंठित आहें. बाह्यांगीं मी हसतों, अंतरीं मी धुमसतों. दुर्दैवाचें विलसित पाहात बसतों आणि त्याला खिजविण्याकरितांच कीं काय इष्टसोबत्यांसह चहा पितों आणि शिरा करून खातों. पण पुढें काय ? पुढचा विचार कांहींच होत नाहीं. घाणीच्या बैलाप्रमाणें विचारांचें भ्रमण वर्तुलाकारच होतें. मला वाटतें, माझ्या आयुष्याची घडी बसणारच नाहीं. एखादी सुसंधि आली तर ती अशा वेळीं येते कीं, तिचा फायदा घेणें शक्यच नसतें. 'दोन वर्षांकरितां राजपुत्रशिक्षक म्हणून रु १७५ वर या' असें शिंदे लिहितात. पैक्याकडे पाहून दोन वर्षें गेल्यावर मग अधांतरीं राहावयाचें आणि नंतर बी. टी. चा विचार करावयाचा म्हणजे काय ? त्यापेक्षां आतां पुढील वर्षी बी. टी[2] व्हावें म्हणजे शिक्षण संपलें, मग आहों आपण व आपलें नशीब ! कार्पण्याकुल होऊन मी किंकर्तव्यमूढ झालेलों आहें. रा. शिंदे यांस माझ्या अडचणी मीं मोकळ्या मनानें कळविल्या आहेत."

[1] ता. ९ फेब्रुवारी, १९२६.

[2] शिक्षकाच्या धंद्यांतच पडावयाचें तर तिला सहाय्यक होणारी बी. टी. ची पदवी आपण मिळवावी असें त्यांस या वेळेस वाटूं लागलें होतें. ट्रेनिंग

मनाच्या या अशा दोलायमान स्थितींत एप्रिल उजाडला. अमळनेरला आपलें आतां पुन्हां येणें घडणार नाहीं हें त्यांना समजले होतें. शाळेला सुट्टी होतांच ते पुण्यास विठ्ठलराव घाट्याकडे गेले. तेथेंच काय तो आपण पुढील विचार करावा असें त्यानीं ठरविलें. घाटे या वेळेस बी. टी. होऊन पुण्याच्या हुजुरपागेंत अध्यापनाचें काम करूं लागले होते. त्याच्या नवोढा पत्नी वत्सलाबाई

कॉलेजात, प्रवेश मिळेल अशी व्यवस्थाहि त्यानीं केली होती. परंतु त्यावेळेस अमळनेर येथील ज्या प्रताप हायस्कूलमध्यें ते शिक्षक म्हणून काम करीत होते, त्याच्या चालकानीं त्याचा अर्ज आपल्या भलावणीसह धाडण्याचे वेळेस त्यांना ज्या चमत्कारिक अटी घातल्या त्या त्यांना अपमानास्पद वाटून त्यानीं आपला बेत रद्द केला. पुढें काहीं वर्षांनीं पुणें येथील भावे स्कूलच्या वार्षिक संमेलनाचे वेळीं (२७ नोव्हेंबर, १९३८) अध्यक्षपदावरून भाषण करतांना त्यांनीं, शिक्षणसंस्थाचे चालक कित्येकदां शिक्षकाशीं वागताना सामान्य माणुसकीलाहि कसे विसरतात याचें उदाहरण म्हणून, या शाळेच्या चालकानीं आपल्याशीं केलेल्या वर्तणुकीची पुढीलप्रमाणें हकीगत सागितली होती : "प्रचलित माणुसकीचें मी एकच उदाहरण देतों. मला एकदां बी. टी. व्हावें असें वाटलें. मीं अर्ज केला; तो शाळेच्या द्वारां जावा लागतो. मीं वरिष्ठांना, भलावण करा म्हणून विनंती केली. त्यांनीं मला कोणत्या अटी घातल्या असतील अशी आपली कल्पना आहे ? ऐकाच ! ते म्हणाले : 'तुमची भलावण मी करीन, पण तुम्हाला शिष्यवृत्ति मिळाल्यास तुम्हीं तिचा त्याग केला पाहिजे. तथापि सांगताना मला शाळेनें पाठविलें आहे असें म्हटलें पाहिजे. आम्ही तुम्हांला एक वर्षाची बिनपगारी रजा देऊं. आपली लेखी परीक्षा झाल्यावर एक वर्ष शाळेंत काम करावें लागतें, त्यावेळीं तुम्हांला या शाळेवर हक्क सांगतां येऊं नये म्हणून त्यापुढील तारखेचा राजीनामा तुम्हीं आज माझ्या स्वाधीन केला पाहिजे !' त्यांची भलावण मीं तत्काळ नाकारिली यांत कांहींच आश्चर्य नाहीं. आश्चर्य आहे शाळावरिष्ठाच्या बाष्टर्याचें."

**[दैनिक त्रिकाळ, पुणें, ता. २८-११-१९३८]**

याहि, त्यांच्याचबरोबर बी. टी. होऊन त्याच शाळेंत काम करीत होता. हुजुरपागेच्या पिछाडीला, नारायण पेठेंत, लोखंड्यांच्या तालमीसमोर ही मंडळी राहात असत. माधवरावाचें पुण्यांतील बिऱ्हाड यापूर्वीच मोडलें गेलें असल्यामुळें, ते कांहीं दिवस न्यू इंग्लिश स्कूलच्या वसतिगृहांत प्रो. आपटे यांच्याकडे, तर कांहीं दिवस विठ्ठलराव घाट्यांकडे राहात. निश्चित कार्यक्रमाचे अभावीं कसे तरी दिवस ते ढकलीत होते. त्यांच्या मनाला उत्साह असा कोणत्याहि बाबतींत वाटत नव्हता. कुठेंहि गेलें तरी हेटाळणी आणि हसेंच त्यांच्या कानावर पडे. याचें वर्णन त्यांनींच आपल्या एका सुनीतांत खालीलप्रमाणें केलें आहे :

हा रस्त्यांत दिसे न तोंच सगळीं संभाषणें थांबती ;
दृष्टी यावर रोखिली प्रगटवी ती दुष्ट कौतूहल ;
याची पाठ फिरे न तोंच उसळे हेटाळणीचें हंसें
मागूनी सुटतात शब्द जहरी काळीज भेदावया ;
(याच्या सुंदर बेगुमान वदनीं शोभे विषादच्छटा !)
जाई सिन्धुतटीं दुरी, कधिं वसे निर्वृक्ष मोकावरी
आशुक्रास्त पहात उंच गगनीं नक्षत्र-दीपोत्सव,
किंवा नागरदीप कीं विखुरले झाडींतुनी काजवे.

*　　　*　　　*

कोणी यास म्हणे अशिष्ट भटक्या, प्रेमाळ कोणी कवी
हा श्रीमंत नसे, परिस्थिति पहा ही जीवनीं वीख वी.

अशा स्थितींत माधवरावांसारख्या भावनाप्रधान माणसाचें हृदय जखमी झालें नाहीं तरच आश्चर्य !

मनाच्या या अशा जखमी स्थितींत, पुण्यांतील त्याचें जीवन कोणाच्या सहवासामुळें जर थोडेंसें सुसह्य झालें असेल तर तें विठ्ठलराव घाटे व शंकरराव कानेटकर (गिरीश) या दोघांच्याच. या दोघांनीं, विशेषतः शंकररावांनीं, त्या दुर्दिनांत माधवरावांना जी साथ दिली तिचें स्मरण झालें म्हणजे त्यांच्या त्या वेळच्या धारिष्टाबद्दल धन्योद्गारच निघतात. धारिष्ट हा शब्द मीं येथें

बुद्धिपुरस्सरच योजिला आहे. ज्या संस्थेंत माधवरावांचे शत्रु सत्ताधारी होते, त्या संस्थेंत ते त्या वेळेस एक नोकर होते. कोणत्या घटकेस त्यांच्या विरुद्ध डेक्कन एज्युकेशन सोसायटींतील अधिकारी गटाचें मन कोण व कसें कलुषित करील याचा नेम नव्हता. पण तशा त्या परिस्थितींतहि माधवरावांच्या त्या तापत्रयाच्या दिवसांत माधवरावांविषयींचें त्यांचें अगत्य लवमात्रहि कमी झालें नाहीं. त्या दिवसांत ते छायेसारखे माधवरावांबरोबर असावयाचे. माधवरावांचा सतत पाठपुरावा करून तरुण पिढीचें मन त्याच्याबद्दल निर्मळ व आदरपूर्ण बनविण्यांत त्या वेळेस ते जी दक्षता घेत ती खरोखरच कौतुकास्पद होती.

श्रीधरपंत रानडे पुणें सोडून गेल्यावर, शंकररावांची माडी हें पुण्यांतील तरुण साहित्यिकाचें आणि कलावंतांचें मीलनस्थान बनलें होतें. रविकिरण-मंडळाची बैठकहि अर्थांतच त्यांच्याच माडीवर असावयाची. रविकिरण-मंडळाचे ते कारभारीच होते. परगांवाहून कोणीहि आणि केवढाहि छोटा मोठा साहित्यिक आला तरी त्याची ' हाजरी ' शंकररावांकडे पहिल्यानें लागावयाची आणि मग तेथें त्याचा इतर मंडळीशीं परिचय होऊन परामर्श घेतला जावयाचा. माधवरावांचा समकालीनाशीं, त्याचप्रमाणें नवोदित साहित्यिकाशीं मोकळेपणानें बोलणें-चालणें होऊन जर कुठें नीट परिचय होऊं शकला असेल तर तो शंकररावांच्याच घरीं. शंकररावाची आतिथ्यशीलता आणि माधवरावाची श्रेष्ठ-कनिष्ठतेचा स्वतःला वाराहि लागूं न देतां समतेनें आणि सहजतेनें वागण्याची वृत्ति, हीं पाहिलीं म्हणजे नवागत व्यक्ति प्रसन्नचित्त होऊन जाई. त्याच्या मनांत काहीं पूर्वग्रह असल्यास ते कोठल्या कोठेंच नाहींसे होऊन जात. माधवरावांच्या संबंधींचे प्रवाद किती फोल आहेत हें दाखविण्याची जी जी संधी मिळेल त्या त्या संधीचा ते उपयोग करून घेत. शंकररावाच्या या कामगिरीचें मोल ते दिवस ज्यांनीं पाहिले आहेत त्यांनाच तें यथार्थपणें करतां येईल. घाटे पुणें सोडून अहमदनगरास जाईपर्यंत त्यांचेंहि घर शंकररावांच्या घराप्रमाणें साहित्यिकांच्या भेटीगांठींचें एक स्थान झालें होतें. शंकररावांप्रमाणेंच ते आणि त्यांच्या सुविद्य पत्नी वत्सलाबाई येणाऱ्याजाणाऱ्यांशीं अत्यंत अगत्यानें वागत. विठ्ठलरावांच्या गोड, मोकळ्या व विनोदी स्वभावामुळें त्यांजकडे

लोक फार लवकर आकर्षिले जात. त्यांचें जाणें-येणें समाजांतील अनेक वर्गांत असल्यामुळें त्यांचे स्नेहसंबंधहि विविध प्रकारच्या व्यक्तींशीं असावयाचे. माधवराव, घाट्यांकडे असले म्हणजे साहजिकच त्याचाहि या व्यक्तींशीं परिचय व्हावयाचा. त्यामुळें त्यांचें परिचयक्षेत्र वाढत गेलें आणि त्याबरोबरच त्यांचा चाहता वर्गहि वाढला. नानावाडा ते फर्ग्युसन कॉलेज, एवढ्या भागांत राहणाऱ्या शिष्टांनीं आपल्याला कितीहि जरी अव्हेरलें तरी त्याहून फार मोठा समाज आपल्याला जवळ ओढणारा, आपलें कौतुक करणारा व आपल्याविषयीं आदर व्यक्त करणारा आहे, याचा अनुभव त्यांना घाट्यांच्या सहवासांत आला. घाट्यांचा तर प्रारंभीं प्रारंभीं पुढीलप्रमाणें एक कार्यक्रम ठरून गेल्यासारखाच होता. दररोज संध्याकाळीं आपल्या पत्नी सौ. वत्सलाबाई यांसह माधवरावांना बरोबर घेऊन ते फिरावयाला जावयाचे. या फेरफटक्यात कित्येकदा मोठे गमतीचे प्रसंग घडत. वाटेंत माधवरावाच्या पूर्वपरिचयाच्या, पण आतां ते दिसतांच त्यांना टाळूं पाहणाऱ्या, व्यक्ती भेटावयाच्या आणि त्यांना पाहून विठ्ठलरावांनीं बुद्धिपुरस्सर हाक मारून 'कसें काय?' म्हणून विचारावयाचें, आणि खट्याळपणें माधवरावाकडे पाहून पुन्हां विचारावयाचें 'यांना ओळखतां कां नाहीं? हे एम्. टी. पटवर्धन!' मग ती व्यक्ति 'हूं हूं, हां हा' असें करून आणि तोंडावर लटकेंच हसूं आणून शक्य तितक्या लवकर निसटून जाण्याचा प्रयत्न करावयाची.

उन्हाळ्याची सुटी संपली. शाळा, कॉलेजें सुरू झालीं. नोकरीचें कोठेंच कांहीं नीटसें जमेना. प्रो. दत्तो वामन पोतदार यानीं न्यू पूना कॉलेजांत (हल्लींचें सर परशुराम भाऊ कॉलेज) त्यांना घेतां आल्यास पाहावें या हेतूनें आपल्या 'मंडळी'पुढें प्रश्न काढला. पण प्रिन्सिपॉल शहा, आणखी एक-दोघे आजीव सेवक यांनीं त्यावर कडाक्याचें भांडण केलें. माधवरावांच्या फर्ग्युसन कॉलेजमधील शत्रूंनीं तेथेंहि, त्यांना पराभूत करण्याकरितां आपलें सर्व वजन खर्चीं घातलें होतें. प्रो. पोतदारांनीं या प्रश्नावर तंटा उत्पन्न होत आहे असें पाहतांच आपली सूचना मागें घेतली. यांत एकच फायदा झाला आणि तो म्हणजे प्रो. पोतदार वगैरे मंडळी त्यांची चाहती झाली.

कॉलेजमध्यें नोकरी मिळण्याचा योग अशा रीतीनें हुकला. पण थोड्याच दिवसांनीं त्यांना गोविंदराव मालशे यांनीं आपल्या महाराष्ट्र एज्युकेशन सोसायटीच्या भावे स्कूलमध्यें शिक्षक म्हणून घेतलें, आणि कुठें राहावयास जागा मिळण्याची पंचाईत पडूं लागली तेव्हां सोसायटीच्या डेक्कन जिमखान्यावरील मार्केट बिल्डिंगमध्यें राहावयास जागाहि दिली. पगार ८०–९० रुपये मिळे. पण पैक्याकडे माधवरावांनीं फारसें लक्ष दिलें नाहीं. त्या तशा अडचणीच्या प्रसंगीं आपल्या संस्थेंत त्यांनीं चाकरी दिली आणि चांगल्या रीतीनें वागविलें एवढ्यावरच ते खूष असत.

माधवराव, त्यांच्याच शब्दांत सांगावयाचें झाल्यास 'पोटापुरता पैका मिळण्याची व्यवस्था' होतांच, आपल्या नियोजित लेखनकार्याला लागले. 'विरहतरंग' काव्य लिहून आणि परिष्करण होऊन तयार होतेंच. त्यांच्या स्नेह्यांत त्याचें वाचन होऊन प्रशंसाहि केली जाऊं लागली. त्याचे एक स्नेही व फर्ग्युसन कॉलेजांतील एक सहकारी प्रो. चिं. रा. देवधर हे, रविकिरणमंडळाच्या चहात्यांपैकीं आणि विशेषतः माधव जूलियन यांच्या कवितेच्या तिच्या मूलभूत कल्पनेपासून तों तिच्या अंतिम परिणतीपर्यंत कुतूहलपूर्ण उत्कंठेनें आस्वाद घेणाऱ्या त्याच्या मित्रापैकीं एक असल्यामुळें प्रस्तुत काव्य हें अज्ञात राहूं नये, त्यातील उत्कृष्ट गुणांनीं स्वतःप्रमाणें इतर सहृदय वाचकांनाहि आल्हाद व्हावा, त्यांतील श्रुतिमनोहर शब्दरचना, रसपरिपूर्ण प्रसंगांचें वर्णन, कोमल हृत्तंतूंवर छेडिलेल्या भावनालहरी, मार्मिक व सुनिविष्ट शब्दालंकार व अर्थालंकार व प्राचीन आणि अर्वाचीन कविश्रेष्ठांच्या काव्यांतले त्यांत उमटणारे प्रतिध्वनि, या व इतर गुणांच्या सुश्लिष्ट संयोगानें स्वतःप्रमाणें इतर वाचकांचेंहि रंजन व्हावें, या हेतूनें सहजींच, 'मग हें काव्य लवकर प्रसिद्ध कां करीत नाहीं? द्या मला हरकत नसली तर, मी हें प्रसिद्ध करतों,' अशी त्यांनीं इच्छा प्रदर्शित केली. या इच्छेला मान्यता देणें माधवरावांना अनेक दृष्टींनीं इष्ट वाटलें. हें काव्य ९ सप्टेंबर, १९२६ रोजीं प्रसिद्ध झालें. माधवरावांनीं तें आपले बाळमित्र रा. वि. म. यांना अर्पण केलें.

## पुन्हां पुण्यांत

'विरहतरंग' प्रसिद्ध झालें त्या वेळेस त्याचा, भिन्न भिन्न प्रकृतीच्या भिन्न भिन्न व्यक्तींनीं कसा परामर्श घेतला हें पाहणें जितकें गमतीचें तितकेंच उद्बोधक वाटेल.

'केसरी'नें त्यांतील काव्यगुणांची प्रशंसा केली पण "विद्योपासनेच्या वेळीं एखाद्या विधवेवर प्रेम करणें हें अनैतिक होय," असा आपला अभिप्राय व्यक्त केला. टीकाकार बाळकृष्ण अनंत भिडे यांनीं "हें फार नटवें व नखरेबाज काव्य आहे," असें म्हणून पुढीलप्रमाणें त्याचा समाचार घेतला: "कवीनें आपल्या काव्य-कलेची बहार यांत बरीच उडवून दिली आहे. पांडित्य-प्रदर्शनानें विद्वानांस झुलविण्याची सोय केली आहे. शब्दार्थालंकारानीं साहित्यविशारदांस मोह घातला आहे; मंजुळ नादमाधुर्यानें स्वरलोलुपांस नादावलें आहे. हृदयतंत्रीच्या नाजूक तारा छेडून भावनाङ्कित तरुणांचीं अंतःकरणें तरल करण्याचें साधलें आहे. मधून मधून दिखाऊ तत्त्वविचार गोंवून, क्षुद्र भाव-भावनांना ठासरपणाची जोड करून दिली आहे. परंतु ज्या कथानकावर कवीनें आपलें वैभवसर्वस्व उधळलें आहे, त्याच्या नायकाचें चरित्र व्यवहाराच्या उजेडांत पारखलें असतां, अत्यंत अनुचित, धोक्याचें व क्वचित् प्रसंगीं हिडीसहि आहे, असें आढळून येतें...............एकंदर कथानक संभवनीय असलें तरी, जर तें खरोखर काल्पनिक आहे, तर कवीनें, इतका कमकुवत, असंबद्ध व नेभळा नायक व नायिका हीं का कल्पिलीं, हें आम्हांस समजत नाहीं. ज्याचें चरित्र कोणाहि सभ्य हिंदु तरुणाला अनुसरतां येणार नाहीं व अनुसरलें असतां सुखावह होईल अशी खात्री देता येणार नाहीं, असा खोडकर नायक उत्पन्न करून, त्याचें चरित्र समर्थनीय व अनुकरणीय आहे असा बहाणा कवीनें सर्वत्र दाखवावा हे लांछनास्पद आहे...............पटवर्धनांस आमची इतकीच प्रार्थना आहे कीं, प्रो. देवधरांनीं चार शब्दात लिहिलेले सर्व काव्यगुण त्यांच्या कृतींत आढळतात. त्यांची प्रतिभा उज्ज्वल आहे, वाणी प्रसंगाप्रमाणें तडफदार किंवा कोमल आहे, शब्दरचनेची सजावट त्यांस उत्तम साधते, रसाविर्भावांत व भावनोद्बोधनांत त्यांचें सामर्थ्य बहुत आहे तरी त्यांनीं हे गुण श्रेयस्कर काव्यरचनेला लावावे. 'प्रणय' हा विषय टाकाऊ नाहीं. प्रणयाचे अनेक

प्रकार पटवर्धनांस अवगत आहेत. तरी ज्याच्या योगानें तरुणांचीं मनें उल्
व विषयलोलुप होण्याचा संभव आहे, अशीं काव्यें त्यानीं निर्माण करूं नयेत.
तरुणाच्या अनिर्बंध स्त्री-प्रेमाचें कौतुक करावयाचें आणि त्याचा सुपरिणाम
होईल म्हणून आशा करीत राहावयाचें, यात पश्चात्तापाचेच प्रसंग जास्त
येतील असें आम्हास वाटतें. ”[3]

समकालीन, जवळ जवळ समवयस्क व त्या वेळेस नुकतेच टीकाकार म्हणून
उदयास येत असलेले वि. स. खांडेकर यानीं या काव्याचा परामर्श पुढीलप्रमाणे
घेतला होता : “कवींनीं आपल्या प्रेमकहाणीला महाविद्यालयाची इमारतच क
पसंत केली हें समजणें कठीण आहे. कॉलेजांतील विद्यार्थ्यांचें गुरुमुखापेक्ष
विद्यार्थिनींच्या चेहऱ्याकडे लक्ष असणें कोणत्याहि दृष्टीनें इष्ट नाहीं. १०९ व्य
श्लोकांत नायक म्हणतो, ‘वर्गात गुरुजी पॅरडाइज लॉस्ट ( स्वर्हानि ) शिकवीत
असतांना समोर तुझ्या चेहऱ्यामध्यें मला स्वर्ग दिसत होता.’ वर्गातला स्वर्ग
चांगले गुरुजी लाभणें हा होय अशी आमची समजूत होती ; पण विरहतरंगां
तील प्रभाकरानें निराळ्याच स्वर्गसुखाचा शोध लावला आहे ! ‘पॅरडाइज
लॉस्ट’च्या ऐवजीं ‘हार्ट लॉस्ट’ गुरुजी कां शिकवीत नाहींत याचेंहि प्रभा
कराला कोडें पडले असेल. सैतानाच्या अधःपतनाच्या प्रसंगीं जर आमच्य
विद्यार्थीनायकाला इंदुसारख्या विधवा विद्यार्थिनीच्या मुखावर जर स्वर्ग दिस
लागतो, तर शाकुंतलाचा तिसरा अंक चालला असतांना त्याची काय स्थिति
झाली असेल याची कल्पनाहि करवत नाहीं. कदाचित् त्याला इंद्रपद
मिळाल्याचा आनंद झाला असेल. बाकी इंद्रापेक्षां दुष्यंत होणेंच त्याल
अधिक आवडलें असतें, हा भाग निराळा ! महाविद्यालयांतील विद्यार्थी
विद्यार्थिनींच्या प्रणयाचा प्रश्न अशा रीतीनें कवींनीं विरहतरंगांत गुंतविलेल
आहे. आपल्या सामाजिक कल्पना सध्यां संक्रमणावस्थेंत आहेत व सरस्वती
मंदिर हें मधुवन नव्हे या दोन गोष्टींकडे लेखकानीं कानाडोळा करूं नये अर
आम्हांला वाटतें. वर्गात आपल्या आवडत्या विद्यार्थिनीचें पदोपदीं चिंतन
करणारे विद्यार्थी ज्ञानगिरीची चढण कितपत चढतील हा प्रश्नच आहे .....

[3] रत्नाकर, मार्च १९२७

शिवाय सरस्वतिमंदिरांत प्रणयाच्या लीला चालणें कितपत इष्ट आहे हा प्रश्नच आहे. पाश्चात्य देशांत या गोष्टी लोकांच्या चिरपरिचयाच्या आहेत हें आम्हांला माहित आहे. पण सद्यःस्थितींत आपल्या देशांत महाविद्यालयांतील विद्यार्थी-विद्यार्थिनींनीं ज्ञानवृक्षाऐवजीं प्रेमलताची वाढ करावी असें कुणीच म्हणणार नाहीं. प्रणयाला व प्रेमाला पुष्कळ जागा आहे. पण विद्यालयाच्या आवारांत त्याला मज्जाव असणेंच फायदेशीर होईल. गीतेचें अध्ययन करणाऱ्या विद्यार्थ्यांना रासक्रीडेच्या श्लोकाची लज्जत लावण्यांत हंशील काय? विरह-तरंगांत या वादग्रस्त प्रश्नाला जागा दिली नसती तर अधिक बरें झालें असतें. ...... विरहतरंगाचें अंतरंग आकर्षक व सुंदर आहे. या सुंदर अंतरंगाचे मुख्य गुण, सुश्लिष्ट रचना, पांडित्यप्रकर्ष व सरस कल्पना हे होत. टोपीनें पागोट्याची जागा घेतल्यामुळें अलीकडच्या मडळींना पागोटें तोलण्याची शक्तीच नाहीं असा त्याच्यावर आक्षेप येतो. स्फुट गीतांनीं खंडकाव्यें व महाकाव्यें यांची जागा बळकावल्यामुळें आधुनिक कवींवरहि अशाच प्रकारचा टीकाकाराचा आक्षेप आहे. ९१२ ओळींचें व सफाईदार आणि सुंदर रचनेचें हें खंडकाव्य लिहून माधव जूलियन यांनीं या आक्षेपाला चांगलें उत्तर दिलें आहे."

"माधव जूलियन हे सौंदर्यवादी कवि आहेत, हें विरहतरंगावरून सहज समजून येण्यासारखें आहे. काव्यानुकूल पांडित्य, भावनांची उत्कटता व पद्यरचनेवर प्रभुत्व या गुणाचा त्रिवेणीसंगम त्याच्या इतर सरस काव्या-प्रमाणें या काव्यातहि आढळतो. सौंदर्यवादाबरोबर नावीन्यवादहि त्यांच्या प्रत्येक श्लोकात किंबहुना श्लोकाच्या प्रत्येक चरणांत डोकें वर करण्याचा प्रयत्न करीत असतो. पंडिती थाटाच्या विरहतरंगांत 'अन्' व 'नि' याची खैरात करताना त्यांनीं हात किंचित् आंखडता घेतला असता तर रचनेंत वैगुण्य आलें असतें असें मुळींच नाही...... 'तात्या फार उदार, ते न कवटें वा स्पर्शिती सागुती, गोडी तूं नव लावितां संवय ती लागे मला मागुती' इत्यादि रीतीनें १५२ व्या श्लोकात जे वर्णन केलें आहे, त्यामुळें काव्याला कांहीं बाळसें चढलें आहे असें आम्हांला वाटत नाहीं. हिंदूंना यापुढें जगायचें असेल तर त्यांनीं मांसाहारच केला पाहिजे असें म्हणणाऱ्या

एखाद्या मटणमार्तंडाला मात्र हे चरण आवडण्याचा संभव आहे. बुद्धाच्या धार्मिक दृष्टीनें हे चरण अयोग्य आहेत एवढेंच नव्हे तर सरस्वतीच्या सौंदर्य-मय दृष्टीलाहि ते तसेच वाटतील. जुन्या काळच्या एखाद्या कवीनें नायकाच्या तोंडीं 'तूंच मला श्रीखंडाची गोडी लावलीस, तूंच मला जिलबीचा जिगर दोस्त बनविलेंस, तूंच मला कांद्याच्या भज्यांचा भक्त केलेंस' इत्यादि नायिका-गुणवर्णनपर वाक्यें घातलीं तर ते काव्य आम्ही मिटक्या मारीत वाचूं काय ? सदरहू पदार्थ कितीहि गोड अगर खमंग असले तरी त्यांची गोडी अगर खमंगपणा काव्यांत मुळींच उतरण्याचा संभव नाहीं."

"विद्यमान कवींमध्यें माधव जूलियन याचा दर्जा बराच वरचा आहे. यांच्या कवितेंत विविधता, भावनांची उत्कटता, काव्याशीं विसंवादी नसलेली विद्वत्ता, नादमाधुर्य वगैरे अनेक बहुमोल गुण आढळतात." [४]

श्री. खांडेकर यांनीं 'कवटें आणि सागुती'ला घेतलेल्या आक्षेपाविरुद्ध त्या वेळचे पुण्यातील एक व्यासंगी लेखक व कवि श्री. गो. रा. हिंगणेकर यांनीं 'ज्ञानप्रकाश'मधील आपल्या परीक्षणात्मक लेखात खालीलप्रमाणें युक्तिवाद केला होता : "काव्यातील वर्णनांत अंडीं, सागुती वगैरेंचा निर्देश येणें सर्व-साधारण मासनिवृत्त अशा ब्राह्मण, जैन, लिंगायत, गुजराथी वगैरे जातीच्या वाचकास अप्रिय वाटण्यासारखें आहे यांत शंका नाहीं. पण एकंदर जनसमाज आपल्या नित्य व्यवहारांतहि ज्या गोष्टी टाळीत नाहींत किंवा टाळण्याची इच्छाहि करीत नाही त्याचा उल्लेख समाजाचें प्रतिबिंब असलेल्या काव्यांतून कवीनें केल्यास वावगें ठरणार नाहीं. शाकुंतलांतील विदूषकानें दुष्यंत राजाच्या शिकारीमधील भोजनपद्धतीचें केलेलें वर्णन रसिकाना हृद्य वाटतें. किंबहुना त्या ठिकाणी अन्यथा वर्णन कालिदासानें केलें असतें, तर काहीं अंशीं तें काव्यास हानिकारकच झालें असतें. तोच न्याय आधुनिक काव्यकारांनाहि लावावयास पाहिजे. शिवाय प्रस्तुत काव्यांतील मासाशनाच्या उल्लेखाची भूमिका कवीनें पात्रांच्या पूर्ववर्णनांत व प्रस्तावनेंतहि विशद केली असल्यामुळें वाचकांना काव्यसौंदर्य अनुभविण्यास तादृश अडचण पडूं नये असें वाटतें."

[४] रणगर्जना साप्ताहिक, मुंबई, १८ ऑक्टोबर, १९२६.

## पुन्हां पुण्यांत

ज्ञानकोशकार डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर यांस, 'या काव्याचें बाह्य स्वरूप जरी संस्कृत प्रेमस्मरणकाव्याचे असले तरी या काव्यातील स्मृतिविषय झालेल्या प्रेमव्यापाराचा प्रकार निराळा असल्यामुळें या काव्याचें स्वरूप संस्कृत काव्यापासून निराळें झालें आहे,' असें वाटून, 'माधव जूलियन याच्या काव्यांत जें प्रेमाचें स्वरूप आहे तें कशा प्रकारचें आहे, कवि आपला कोणता अनुभव वाचकांपुढें मांडीत आहे, आणि त्याची विशिष्ट प्रकारची मांडणी कोणत्या कलाविषयक आणि सामाजिक कारणामुळें उत्पन्न झाली आहे,' हें पाहण्याचा त्यांनीं 'माधव जूलियनचें प्रेमचित्र' या नांवाचा एक विस्तृत परीक्षणात्मक लेख आपल्या 'विद्यासेवक' मासिकात लिहून प्रयत्न केला. जातां जातां तुलनेसाठीं संस्कृतमधील प्रेमकाव्य, त्याचप्रमाणें १९१८ ते १९२८ या कालांतील मराठी प्रेमकाव्य याचेंहि त्यांनीं त्यासवें विहंगमावलोकन केलें.

या काव्याला तरुण मंडळींत फारच प्रसिद्धी मिळाली. अनेकांनीं तें मुखोद्गत केलें. फर्ग्युसन कॉलेजमधील एका तरुणानें, टोपण नांवानें एक पत्र लिहून माधवरावांना कळविलें होतें कीं : "आपण 'विरहतरंग' लिहून कांहीं कलावान–भावनावान लोकांवर अनंत उपकार करून ठेवले आहेत, हें निःसंशय........डोळ्यांपुढें तरळणारे व क्षणिक पण तितकेंच अतिम सुख देणारे असे तरंग आपण सत्य सृष्टींत लिखाणाच्या रूपानें आणलेत व ते चिरस्थायी केलेत यांत आपल्या कलेची कमाल दिसून येते. प्रत्येक तरंग सहृदय वाचकास भूतकालीन स्मृतिगृहांत ओढून नेतो व तेथील अस्तंगत पावणारे भावनाकण वाचकांचे समोर आणून उभे करतो. कांहीं भावना व प्रसंग अत्यंत सत्यदर्शी, सूक्ष्म व चित्रमय असून ते कवीनें जणूं आमच्याच आयुष्यातील बिनतारीनें ऐकून लिहिले आहेत कीं काय असें वाटतें, व अशाच वेळेला कवीची किंमत कळून येते. आपलें काव्य आम्हांस चिरंतन सुख देणारें आहे व त्या दृष्टीनें आपण आम्हांस कायमचे ऋणी करून ठेवलेलें आहे." विद्वज्जनांनीं केलेली प्रशंसा ऐकून जें समाधान माधवरावांना झालें नाहीं, तें या अपरिचित युवकाच्या पत्रानें त्यांना झालें.

मत देण्याची विनंती केली होती. वास्तविक काव्य हा कांहीं राजवाड्यांचा विषय नव्हे. परंतु वाङ्मयाच्या प्रत्येक शाखेकडे ते जिज्ञासु वृत्तीनें पाहणारे एक आस्थेवाईक विद्वान् होते. 'मनोरंजन' मासिकांत (१९२०) त्यांनीं केशवसुतांच्या कवितेवर केलेली विस्तृत चर्चा ही एक त्याची निदर्शक होय. हा त्यांचा आस्थेवाईकपणा लक्षांत घेऊनच माधवरावांनीं आपलें 'सुधारक' त्यांच्या नजरेखालून घातलें. राजवाडे हे विद्वान् मंडळींत, निःस्पृह व पक्षातीत वृत्तीचे चिकित्सक म्हणून प्रसिद्ध होते, आणि त्यामुळें त्यांच्या मताला फार मोठें मोल होतें. यासाठींच माधवरावांनीं, पुढें अनेकांच्या विरोधी टीकांना पात्र होण्याचा संभव असलेल्या या आपल्या उपहासकाव्याबद्दल कोणत्याहि पूर्वग्रहापासून अलिप्त असलेल्या व सर्वांनाच आदरणीय वाटणाऱ्या या वृद्ध तपस्वी पंडिताचें काय मत पडतें हें अजमावण्याचा प्रयत्न केला. राजवाडे यांनीं माधवरावांच्या तोंडून हें सर्व काव्य ऐकलें व स्वतःची दृष्टि अत्यंत अधु असताहि पुन्हां एकदां बारकाईनें तें वाचून काढून आपला विस्तृत अभिप्राय माधवरावाना पत्रद्वारा [५] कळविला; जे दोष आढळले त्यांचीं विवेचनात्मक टांचणेंहि त्यानीं मार्गदर्शनाकरिता धाडलीं. राजवाड्याचें हे पत्र त्यानीं छापून काढून तें 'सुधारका'च्या प्रथमावृत्तीच्या कांहीं प्रतींत चिकटविलें होतें. हें पत्र 'सुधारका'च्या अभ्यासकांस उपयुक्त होण्यासारखें असल्यामुळें येथें उद्धृत करतों:

"तुम्ही जेव्हा तुमचें काव्य वाचून दाखविलें तेव्हां तें मला वारंवार वाहवा म्हणण्याइतकें आवडलें. परंतु आतां सावकाश वाचतांना कांहीं दोष आढळून येतात. तुमचें काव्य निर्दोष असावें अशी माझी उत्कट इच्छा आहे म्हणून ते दोष दाखवितो. यतिभंग हा शेंकडों वेळां झाला आहे. बोलण्यासारखें वाचताना हा दोष ध्यानांत येत नाहीं, मात्रावृत्तात यतिभंग मानीत नाहींत व इंग्रजींतहि यतिभंग होत नसतो; तथापि आठ मात्रांनंतर थांबलेंच पाहिजे अशी माझी समजूत झाली आहे. 'पौरन्ध्रिक सौन्दर्य डंवरलें' यासारख्या ओळी सदोष होत. बाकी, 'सुवासिनीविण गेह न मण्डित,'

[५] २८ फेब्रुवारी, १९२८

'विरहतरंगा'च्या प्रसिद्धीपासून माधवरावांची लोकप्रियता वाढूं लागली. तरुण वाचकवर्गाला ते विशेष प्रिय वाटूं लागले. १९२८ साली जेव्हां त्यांचें 'सुधारक' काव्य प्रसिद्ध झालें, तेव्हा तर त्यानीं प्रसिद्धीचा उच्चांकच गांठला. या काव्यामुळें आपल्यावर प्रतिकूल टीकेची झोड उठेल असे त्यांना प्रारंभीं वाटलें होतें. पण 'केसरी' व बाळकृष्ण अनंत भिडे वगळल्यास उघड अशी प्रतिकूल टीका फारशी झाली नाहीं. खासगी बैठकींत, ज्याच्या पक्षाचा व मतांचा यांत उपहास केलेला ज्यांना आढळला आणि त्यामुळें ज्यांना खाजकुइल्या लागल्या, त्यानीं दातओंठ खाऊन, कवीला शिव्याची लाखोली वाहण्याची हौस भागवून घेतली असेल, पण उघड चर्चा करण्याचें धैर्य त्यापैकीं एकानेंहि दाखविलें नाहीं. स्वतःच्या डोकीवर बसलेल्या टोपीचें उघडपणें प्रदर्शन कोण करील!! 'केसरी' व भिडे यानीं 'सुधारका'तील काव्यगुणांची प्रशंसाच केली; त्याना त्यातील सामाजिक विचारसरणी मान्य नव्हती. भिडे यानीं 'विविधज्ञानविस्तारा'त या काव्याचें परीक्षण चार विस्तृत लेखांक लिहून केलें. त्यानीं आपल्या नीतिवादी सोवळ्या सनातनी दृष्टिकोनांतून, यात कवीनें मांडलेल्या प्रत्येक विचाराचा परामर्श घेतला. माधवरावानीं त्यात अवलंबिलेल्या लेखनसुधारणेचाहि समाचार घ्यावयास ते विसरले नाहींत. भिड्याहून भिन्न दृष्टिकोनातून डॉ. केतकर यानीं या काव्याचें 'विद्यासेवकां'तून परीक्षण केलें. त्यांना 'विरहतरंगा'पेक्षां हें काव्य अधिक पसंत पडलें. त्यांनीं आपल्या परीक्षणात लिहिलें होतें कीं, "प्रो. पटवर्धन याच्या कृतींपैकीं ही अत्यंत महत्त्वाची कृति होय......मराठींत इतकें मोठें, स्वतंत्र, कथामय आणि भावनामय व स्वभावचित्रांनीं भरलेलें असें दुसरे काव्य नाहीं. या दृष्टीनें या काव्याला महत्त्व आहे. शिवाय हेंहि लक्षात ठेविलें पाहिजे कीं, या काव्यात अनेक तऱ्हेचें नावीन्य सापडेल. अर्वाचीन समाज हा महाकाव्यास विषय करण्याची पद्धत नाहीं. स्कॉटसारखे कवि देखील ऐतिहासिक पार्श्वभूमि शोधीत असतात. एपिक तयार करावयाचें म्हणजे त्याला विषय गंभीर लागतो. तर प्रचालित आयुष्यांतहि काहीं गांभीर्य आहे असें दाखवूं इच्छिणाऱ्या कवीचें काव्य या दृष्टीनें देखील याला महत्त्व आहे." डॉ. केतकरांना, या काव्याला दिलेलें 'सुधारक' हें नांव पसंत नव्हतें. या

काव्यांतील नायक वासू राजे यानें एका पतितेचा उद्धार केला, त्या अर्थी 'उद्धारक' हेंच नांव त्याला अधिक शोभलें असतें, आणि 'सुधारक' म्हणून ज्या एका अल्पसंख्य वर्गांतील पक्षाला संकुचित अर्थानें ओळखलें जातें त्याचें नांव एवढ्या चांगल्या काव्याला देऊन त्याचा वृथा गौरव केला जात आहे अशी त्याची तक्रार होती. त्याचें याबद्दल म्हणणें असें होतें कीं, "सामान्य माणसाची अशी कल्पना आहे कीं सुधारक म्हणजे स्त्रीशिक्षण, पुनर्विवाह इत्यादि फालतु गोष्टींवर वाच्यता करणारा मनुष्य. पुनर्विवाहाचा प्रश्न समाजांतील शेंकडा ९५ लोकांसंबंधानें उपस्थित होत नाहीं. आणि याकरितांच सुधारक म्हणजे भटांमधला आपल्या जातीपुरताच विचार करणारा वर्ग म्हणून ब्राह्मणेतर स्पष्ट म्हणूं लागले आहेत. तेव्हां समाजांतील शेंकडा ५ लोकाचा जो वर्ग आहे, त्या वर्गांतल्या एका वर्गाचें नाव एका त्यागी आणि सद्गुणी मनुष्यास द्यावयाची योजना अत्यंत दोषास्पद आहे. कर्तृत्वाच्या बाबतींत सुधारक म्हणविणारा आणि जुना म्हणविणारा यांत फार मोठें अंतर होतें अशातला भाग नाहीं."

डॉ. केतकर याना 'सुधारक' हें, काव्य या दृष्टीनें आवडलें होतें, तरी त्यांत निर्माण केलेला नायक व त्याचेकडून व्यक्त केलेला सुधारणाविषयक ध्येयवाद त्यास फारसा कौतुकास्पद वाटत नव्हता. त्याचें 'चरित्र उदात्त न दिसता त्राग्याचें दिसतें; त्याचें उदाहरण धीरोदात्त व्यक्तीचें नसून भ्याड व्यक्तीचे आहे' असे त्यानीं आपल्या लेखांत उद्गार काढले आहेत. त्यानीं या काव्यातील विचारसरणीची आपल्या समाजशास्त्रीय दृष्टिकोनांतून सूक्ष्म अशी छाननी केला आहे.

भिडे आणि केतकर या दोघांच्याहि टीका, परस्परांच्या दृष्टिकोनांत दोन ध्रुवांइतकें अंतर असूनहि, उच्च तात्त्विक भूमिकेवरून केलेल्या असल्यामुळें 'सुधारका'च्या प्रसिद्धीला त्या अहितकारक न ठरतां हितकारकच ठरल्या.

'सुधारका'च्या टीकाकारांत, वेदविद्येचे गाढे पंडित प्राचार्य बैजनाथ काशीनाथ राजवाडे याचाहि उल्लेख केला पाहिजे. 'सुधारक' प्रसिद्ध करण्याच्या पूर्वी माधवरावांनीं त्याना तें समग्र वाचून दाखवून, त्यावर स्पष्टपणें आपलें

'सरलेची हृत्कलिका उकले,' 'न पशुपाल हा, शिशुपाल खरा' अशा सुंदर मधुर ओळीहि हजारों सापडतील."

ह्यांतील वृत्त इंग्रजी धर्तीवर धावतें आहे. 'चाल धावती' (पृ. १७१) असें एक श्रोता म्हणतो तें बरोबर आहे. काव्य गोष्टीवजा असल्यामुळें वृत्त अगदीं यथायोग्य आहे. स्कॉटचें 'मार्मियन' वाचतांना वाचक जसा, न थांबतां, न अडखळतां, जणूं काय एक गद्यच वाचीत आहे असा सारखा वाचीत जातो तशीच मनाची स्थिति 'सुधारक' काव्य वाचताना होते. चाल कांहींशी कटावासारखी आहे.

"व्यक्तिस्वभावहि इंग्रजी धर्तीवरच वर्णिले आहेत. कोठें विनोद तर कोठें गंभीरपणा ह्या स्वभाववर्णनात दिसून येतो. मनुष्य हा एक व्यक्ति नसून अनेक व्यक्तींचा डोल्हारा आहे असें म्हणतात ह्याचें रावबहादुर ठोसर हें ठळक उदाहरण होय. विनोदाचें दुसरें उदाहरण डॉक्टर ओंकारस्वामी. विनोदात रावबहादुरवर्णन सरस कीं ओंकारजीचें वर्णन सरस हें सागणें कठिण; तथापि रावबहादुरवर्णन मला जास्त पसंत वाटतें. सरला इतकी सुस्वभावी व सहिष्णु, तथापि नीच नवऱ्याशीं आयुष्य काढण्यापेक्षा माहेरीं येऊन राहण्यापुरतें तरी धाष्टर्य तिच्यात आहे. तिच्या प्रेमाला इहलोकीं वाव कोठेंच मिळत नाहीं. हें चित्र विशेष करुणसुंदर आहे. श्यामा खरोखरच फार प्रेमळ व गंभीर. ती जें कांहीं करिते तें निरपेक्ष मैत्रीनें व प्रेमानें करिते. वासू हा खरा सुधारक, अनाथांचा खरा वाली; ह्यालाच खरा धर्म कोणता तो कळतो. "भूतदयाघन आत्मत्यागी, झालां सुखदुःखीं समभागी, झालां स्नेही असुन विरागी" हे सगुणेचे शब्द अक्षरशः खरे आहेत. पोर टाकल्याबद्दल तुरुंगांत असलेल्या विधवेशीं — केवळ तिच्या मुक्ततेसाठीं, तिच्या रक्षणासाठीं आणि अपरिहार्य भावी आचरणापासून तिला दूर ठेवण्यासाठीं — लग्न करणें हें केवढें धाडस! साहजिकच ह्याच्यापुढें श्यामा वेंगुर्लेकर हिच्याशीं लग्न करण्याचें धाडस बरेंच फिकें पडतें. वासू राजे ह्याच्यांत गंभीरपणा खरोखर पूर्णतेला गेला आहे."

"अशीं स्त्री-पुरुषपात्रें निर्माण करण्यांत तुम्हीं चांगलें कौशल्य दाखविलें आहे. दांभिक वा कुटिल आचारविचारांचा तुम्हीं केलेला उपहास मर्मभेदी

असला तरी न्याय्य आहे. ह्या काव्यांत तुम्हीं दाखविलेला बंडखोरपणा, जुन्या लोकांना पसंत पडणार नाहीं; तथापि त्यांना खडबडून जागें करून विचार करायला हा बंडखोरपणा खास लावील. तरुण मंडळींना मात्र ह्यांतील बहुतेक विचार पटतील व त्यांना हें काव्य आवडेल यात शंका नाहीं."

"४९ व्या पानावरील निर्झराचें काव्ययोग्य वर्णन कोणाच्याहि भूतदयेला तंतोतंत लागू पडणार नाहीं. तथापि वासूची भूतदया झऱ्यासारखी जिवंत व मनोहर होती असा अर्थ या वर्णनांतून निघतो. विस्तृतोपमानाचें (Homeric Simile चें) हें योग्य उदाहरण होईल. ४६ व्या पानावरील छात्रालयाचें मध्यरात्रीचें वर्णन फार सुरेख साधलें आहे. पण अशीं स्थळें फारच थोडीं आढळतात. कारण उच्च वातावरणांत भराऱ्या मारणारें हें काव्य नाहीं. ह्याचा संचार या भूतलावरच आहे. ह्यामुळें पुष्कळ ठिकाणीं गद्ययोग्य विचार व भाषा वापरली गेली आहे. 'हिंवतापानें सगुणा हो कृश। कोयनेलचा नफा न तादृश' अशा ओळी खरी वस्तुस्थिति दाखविण्याकरितां घालाव्या लागतात असें तुम्ही म्हणतां, पण मी या म्हणण्याच्या विरुद्ध आहें. कवीनें इतकें खालीं उतरूं नये. कवितेचा दर्जा फार वरचा आहे व तो कायम ठेवणें कवीचें कर्तव्य आहे."

"गद्य भाषा वापरणें हा जसा दोष तसे विनाकारण 'पौरन्ध्रिक', 'नीत्यतीतता,' 'विषदिग्ध' वगैरे संस्कृत शब्द किंवा 'प्रेमळ आग्रह,' 'स्निग्ध अभय,' 'दीन शान्ति,' 'मोहक खळबळ' अशीं इंग्रजी तऱ्हेचीं विशेषण-विशेष्य जोडपीं वापरणें हाहि दोष होय."

"एवढें विस्तृत काव्य असून ह्यांत क्वचितच भाषा व विचार दुर्बोध वाटतात. काहीं प्रसंग व ओळी अनपेक्षित अशा आल्या आहेत. पुष्कळाना हे दोष आहेत असें वाटणार नाहीं हें मला कबूल आहे. मला जीं दोषस्थळें वाटतात त्यांची विस्तृत याद मी सोबत पाठवीत आहें."

"तुमचें वाचन मोठें आहे. तुम्ही बहुश्रुत आहांत. तुमचें निरीक्षण वाहवा करण्याजोगें आहे. तुम्ही ज्ञानसंपत्ति व शब्दसंपत्ति बरीच मोठी पैदा केली आहे. तुम्ही केवळ समाजसुधारक नसून भाषासुधारकहि आहांत. भाषा

सर्वार्थव्यापक करण्याकरितां ज्ञानेश्वर, रामदासांच्या लोकमान्य ग्रंथांतील शब्दांचें पुनरुज्जीवन करण्याचा तुमचा प्रयत्न सुरू आहे. पूर्वाश्रमींचे फार्सी शब्द व इंग्रजी तऱ्हेचे वाक्प्रचार याचा उपयोग किती यशस्वी होईल हें कालानें ठरणार आहे. हा प्रयत्न व हें काव्य तरुणांना आवडेल ह्यांत संशय नाहीं. पण तुम्ही आपल्या संपत्तीचा उधळेपणानें व्यय करीत आहां. काव्यांत मितपणा पाहिजेच पाहिजे. 'सोनेंच बावनकशी न कसें म्हणावें?' अशा स्तुतीला आपला लेख पात्र करण्यासाठीं तुम्ही तो पांच-पंचवीस लोकांना मुद्रणापूर्वी दाखवावा. स्वतःला व स्वतःसारख्या तरुणांना लेख पसंत पडतो एवढ्यानें समाधान मानूं नये. ह्या लिहिण्यानें तुमचा हिरमोड होण्याचा संभव आहे. मी तुमच्या अंतःकरणावर आघात करीत आहेंसें मला वाटतें. तथापि तुम्ही तरुण आहांत, होतकरू आहांत. माझ्या उक्तीनें खचले जाणार नाहीं अशी मला खात्री आहे. दोष दाखविल्याबद्दल क्षमेची याचना करितों. क्षमा असावी हे विनंती."

महाराष्ट्रांतील समाजसुधारकांच्या दोन पिढ्या पाहिलेल्या व त्यांत वावरलेल्या या वृद्ध माननीय पंडितानें, 'दांभिक वा कुटिल आचारविचारांचा तुम्हीं केलेला उपहास मर्मभेदी असला तरी न्याय्य आहे. ह्या काव्यांत तुम्हीं दाखविलेला बंडखोरपणा, जुन्या लोकांना पसंत पडणार नाहीं; तथापि त्यांना खडबडून जागें करून विचार करायला तो खास लावील,' असे काढलेले उद्गार, टीकाकारांविरुद्ध एकप्रकारें संरक्षक ढालीसारखेच ठरले. 'पटवर्धनांनीं, आपल्याला अप्रिय असलेल्या व्यक्तींबद्दलची खवखव यांत ओकून टाकून, त्यांची रेवडी उडविण्याची आपली मनीषा एकदांची साधून घेतली,' असें आंबट तोंडानें खासगी बैठकांत म्हणणाऱ्या त्यांच्या टीकाकारांना तसें उघडपणें म्हणण्याची सोय राहिली नाहीं.

राजवाड्यांच्या या पत्रामुळें माधवरावांना कृतार्थता वाटली. त्यांनीं अत्यंत लीनतेनें त्यांस खालीलप्रमाणें पत्र [१] लिहून ती व्यक्तहि केली.

[१] ता. २९ फेब्रुवारी, १९२८.

" आपलें कृपापत्र व सोबत पाठविलेलीं टांचणें पावलीं. वाचून काय काय वाटलें तें शब्दीं व्यक्त करितां येत नाहीं. गुणदोषदिग्दर्शन करण्यासाठीं काव्य समग्र वाचून परिश्रमपूर्वक टांचणें करून आपण तीं पाठवावींत यांतच माझ्या कृतीचें चीज व कौतुक झालें असें मी समजतों. समवयस्क तरुण या काव्याचें कौतुक कदाचित् करतील, कदाचित् करणार नाहींत; पण आपल्यासारख्या ज्ञानानुभवसंपन्न मनुष्यानें तें करावें यातच मी कृतार्थ आहें; असें असून, दोष दाखविल्याबद्दल आपण क्षमा मागतां याला मीं काय म्हणावें ? आपणा-सारख्यांच्या उत्तेजक आशीर्वादानें आम्ही वाढतों व उपदेशाच्या बाळकडूनेंच सुदृढ व निकोप होतों. क्षमा मागण्यांत आपला अभिजात विनय दिसला तरी आमची स्थिति चमत्कारिक व अनुकंपनीय होते. उलटपक्षीं, आपण दाखविलेल्या दोषांचा कसोशीनें विचार करूनहि कालमानाप्रमाणें व प्रकृति-भेदामुळें कदाचित् मतभेद होण्याचा संभव आहे असें सूचित करण्याबद्दल मीच क्षमेची याचना करायला हवी. काव्य आतां समाजापुढे येतच आहे. तथापि आपल्या पत्रांतील कळकळीची विनंती मला व माझ्यासारख्यांना मान्य झालीच पाहिजे. बहुत काय लिहावें ? आपला लोभ, मी पात्र नसलों तरी आहेच, तो उत्तरोत्तर वृद्धिंगत व्हावा हीच विनंती."

'विरहतरंग' व 'सुधारक' प्रसिद्ध झालीं त्याच्या दरम्यान १९२७ सालीं त्यांचा 'छंदोरचना' हा ग्रंथ प्रसिद्ध झाला. बडोद्यास कॉलेजात असल्यावेळे-पासूनच त्याचें या विषयाकडे लक्ष होतें. त्याचे स्नेही बापुराव शिंदे जेव्हां त्यांच्याशीं त्यांच्या कविताची चर्चा करीत, त्यावेळेस गणमात्राजुळणीकडे त्यांची कांटेकोर नजर असावयाची. माधवरावाचें प्रारंभीं याकडे दुर्लक्ष असे. बापुरावांनीं याकरितां त्यांजकडून 'रणपिंगल' हा गुजराथींत त्या वेळेस उपलब्ध असलेला रणछोडभाई उदयराम यांचा छंदःशास्त्रावरील ग्रंथ वाचून घेतला. स्वतः बापुरावांना गणमात्रांच्या संशोधनाचा छंद होता, परंतु नित्यव्यवसायाच्या गर्दीत त्यांना त्याबाबतींत चिकाटी ठेवतां आली नाहीं. माधवरावांनीं मात्र तो छंद कायमचा लावून घेतला. त्याचेंच 'छंदोरचना' हें फळ होय. सतत एक वर्ष ते या पुस्तकासाठीं खपत होते. त्यांचे फर्ग्युसन कॉलेजांतील जुने सहकारी डॉ. वासुदेव गोपाळ परांजपे यांनीं त्या वेळेस 'आर्यसंस्कृति मुद्रणालय'

नुकतेंच स्थापिलें होतें. या मुद्रणालयांतून गंभीर विषयांवरील ग्रंथ प्रसिद्ध करण्याची त्यांची इच्छा होती. त्यांनीं तसा एखादा ग्रंथ माधवरावांनीं आपल्या मुद्रणालयासाठीं लिहून द्यावा अशी विनंती केल्यावरून माधवरावांनीं पुष्कळ वर्षांपासूनचा हा संकल्पित ग्रंथ लिहावयास हातीं घेतला व एक वर्षाच्या आंत तो पुरा करून प्रसिद्ध करविला. 'तो काल विशेषतः पद्यरचनेचा असल्यानें ग्रंथाला मागणीहि चांगली आली.' ग्रंथाचें सर्वत्र उत्तम स्वागत झालें. नरसिंह चिंतामण केळकर यांनीं स्वतः त्याचें 'केसरी'त परीक्षण करून त्यांची पुढीलप्रमाणें कौतुकानें पाठ थोपटली.

"पटवर्धन यांची प्रसिद्धी आतांपर्यंत कवि या नात्याचीच होती. पण हल्लींच्या पुस्तकानें हें निखालस सिद्ध केलें आहे कीं, कवि झाला म्हणजे त्याला चिकित्सक बुद्धि नसावी किंवा नसते असें नाहीं. एकाच राज्यांत १८ विविध कारखाने असतात, किंवा परस्परविरोधी अशीं न्यायदान व मुत्सद्देगिरी हीं खातीं असतात. त्याचप्रमाणें बुद्धिवान् मनुष्यांमध्येंहि कवित्व व चिकित्सक बुद्धि यांनीं वास केल्यास खरोखर काय हरकत? पटवर्धन यांनीं या ग्रंथांत चिकित्सक बुद्धि कसून चालविली आहे इतकेंच नव्हे, तर छन्दःशास्त्राचा विषय अत्यंत परिश्रमपूर्वक तळापासून ढवळून काढला आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. गोडबोले, चिपळूणकर हे बिचारे जुन्या काळात म्हणजे फक्त जुन्या कवितेच्या काळांत जन्मले; व त्यांनीं संस्कृत, प्राकृत छन्दांपलीकडे फारशी मजल मारली नाहीं. आणि राजवाडे यांनीं नवी करामत करून दाखविली असतांहि, पटवर्धन यांनीं त्यांच्यावर ताण केली आहे याचें कारण हेंच कीं, राजवाडे यांनीं पुष्कळसा मनाचा मामला केला. पण त्यांच्या नेहमींच्या तुच्छताबुद्धीनें आधुनिक कवितासंग्रहाशीं त्यांनीं परिचय केला नव्हता. उलट पटवर्धन यांनीं त्यांना कविता विषयाची अत्यंत आवड असल्यामुळें बहुतेक आधुनिक कविता व पद्यसंग्रह यांचा सहानुभूतिपूर्वक व संशोधनपूर्वक अभ्यास केल्याचें उघड दिसतें. म्हणून त्यांचा ग्रंथ जसा विवेचक तसा सुरसहि झाला आहे. ग्रंथाच्या नावाप्रमाणें त्यांत छंदःशास्त्राचा विशेष विचार करूनहि शिवाय त्यांनीं सातव्या व आठव्या प्रकरणांत 'पद्यांतील व्याकरणविशेष' व 'पद्याची भाषा' हीं जीं दोन प्रकरणें लिहिलीं आहेत,

तीं तर आमच्या दृष्टीनें फारच मौल्यवान आहेत. आणि त्यांच्या योगानें साहित्यविचाराला सर्वसाधारणरीत्या मार्गदर्शक पद्धतीची विशेष मदत होणार आहे."

"पद्याची भाषा व 'पद्यातील व्याकरणविशेष' या दोन प्रकरणांत पटवर्धन यांनीं जे नियम किंवा सिद्धान्त दिले आहेत ते आम्हांला एकंदरीनें फारच पसंत वाटतात हें आम्ही मोठ्या आनंदानें नमूद करतों. या प्रकरणांतील चर्चा फारच मार्मिक झालेली आहे. संस्कृत शब्द पद्यकारांनीं कितपत व कसे वापरावेत, मराठी भाषेंतील जुन्या शब्दभांडाराचें मूल्य पुष्कळ असतां त्याची आपण हयगय किती करतों, परभाषेंतील शब्द कोठपर्यंत टाळावेत व कोठपर्यंत घ्यावेत, याविषयीं पटवर्धन यांचें विवेचन फारच समर्पक आहे. ते स्वतः आपल्या कवितेंत उर्दू, पर्शियन वगैरे शब्द फार घालतात असा त्यांच्यावर आक्षेप आहे. तो खरा असला तरी त्याचें 'श्रेयस्' हें त्याच्या 'प्रेयसा'हून वेगळें आहे, ह्यांत शंका नाहीं. पृष्ठ २१७-२१८ यांवर भाऊसाहेबांच्या बखरींतील एक उतारा देऊन त्यांतील अनेक परकी शब्दांऐवजीं संस्कृत किंवा मराठी शब्द घातले तरी हानि कशी होत नाहीं, हें त्यांनीं दाखविलें याबद्दल सावरकरांप्रमाणें आम्हीहि त्यांचे आभारी आहों. पण याहिपुढें जाऊन पृष्ठ २१८ च्या शेवटीं जीं ५-७ वाक्यें त्यांनीं लिहिलीं आहेत[७] तीं आम्हांला फारच आवडलीं. तो उतारा नसून तीं त्यांचीं स्वतःचीं वाक्यें आहेत आणि पटवर्धन हे इच्छा असल्यास फार्सी शब्द वगळून व जुने मराठी शब्द घालून उत्कृष्ट गद्य कसें लिहूं शकतात याचा तो एक उत्तम मासला म्हणून देण्यासारखा आहे. यावनी शब्दांमधील दांडगेपणाच्या अर्थाचा सहवास आमच्या फार दिवसांच्या परिचयाचा झाल्यामुळें केवळ यावनी शब्दांबाहेर आवेश नाहीं अशी आमची समजूत होऊन गेली. पण ही चूक आहे. आवेश हा शब्द-

---

[७] "हिन्दुस्थानाबाहेरील रांगड्या दांडग्यांनीं यादवीनें क्षीण झालेल्या या देशांत घुसून राज्यें स्थापिलीं. पुढें त्यांच्याच राजवटींत आमच्यांतहि शूर धारकरी निर्माण होऊन त्यांनीं ख्यात केली. कधीं हुतूतू घालीत कावे देत देत त्यांनीं शत्रूंचा दम छाटून टाकिला, तर कधीं खेतींत गाडून उभे

स्वरूपापेक्षां शब्दार्थांत अधिक असतो आणि अर्थाच्या दृष्टीनें संस्कृत किंवा मराठी भाषेंतील शब्द कमी आवेशयुक्त नाहींत. फक्त ते आवेशाच्या अर्थानें ऐकण्याची आपली संवय गेली इतकाच त्याचा अर्थ. पर्शियन शब्दांच्या या कोशकारांनीं, यावनी शब्दांची रेलचेल आपल्या कवितेंत करणाऱ्या या कवीनें मराठी भाषेला दिलेली ही थोरवी विशेष अभिनंदनीय होय."

"एका वाक्यांत ग्रंथपरामर्श करावयाचा तर आम्ही असें म्हणूं कीं, साहित्यशास्त्रासंबंधानें मराठींत जे कांहीं ग्रंथ उपलब्ध आहेत त्यांत या ग्रंथानें मौल्यवान भर घातलेली असून, विद्यापीठाच्या अभ्यासक्रमांत चालू करण्यासारखें पुस्तक मराठींत नाहीं असें म्हणणाऱ्यांना पटवर्धन यांनीं या ग्रंथानें सक्रिय असें उत्तर दिलें आहे. पटवर्धन यांच्या काव्याप्रमाणें त्यांचे गद्यग्रंथहि असेच आणखी निर्माण होवोत."

केळकरांसारख्या ज्येष्ठ व श्रेष्ठ साहित्यिकानें केलेलें हें गुणग्रहण व कौतुक माधवरावांना किती उत्तेजक व नव्या उद्योगाला प्रेरक वाटलें असेल त्याची कल्पनाच केलेली बरी. विशेषतः अनेक लब्धप्रतिष्ठित साहित्यिकांच्या हेटाळणीचा, कुत्सेचा विषय बनलेल्या व सहानुभूतीला पारख्या झालेल्या माधवरावांना केळकरांच्या या पाठ थोपटण्यानें दुप्पट बळ आल्यासारखें वाटल्यास नवल तें कोणतें ? बाकी केळकर ही त्या काळांतील एकच अशी वडीलधारी व्यक्ति होती कीं, जी वाङ्मयांतील गटबाजीपासून दूर राहून उदार संग्राहक वृत्तीनें व व्यापक सहानुभूतीनें कोणत्याहि कलाकृतीचा स्वतः स्वतंत्रपणें आस्वाद घेऊं शके व इतरांनाहि घ्यावयास प्रवृत्त करी. नव्या प्रवृत्ति नीट समजून घेऊन, यथार्थ गुणग्रहण करावें तर तें केळकरांनींच, अशी निदान त्या वेळच्या तरुण लेखकांची समजूत होती. केळकरांचा सहानुभूतीपर उत्तेजक शब्द हा होतकरू लेखकांना शुभशकुन वाटे. माधवरावांनाहि तो तसाच वाटला. त्यांचा उत्साह दुणावला. टवाळखोरांची

राहून अमित्रांशीं गाठ घालून भलीं झुंजें केलीं. पायउतार होऊन स्वांगें तरवारीनें खणाखणी करून, शत्रूस धुडकावून देऊन, विजयी ढालांभोंवतीं रणावरच जयघोष केला."

टीका किंवा निंदकांची निंदा त्याचे बाबतींत शून्यपरिणामी होऊं लागली. त्यांचें लौकिक नष्टचर्य हळूहळू संपुष्टांत येऊं लागलें. अपकीर्तीचा अंधार झपाट्यानें लुप्त होऊं लागून कीर्तीचा उत्साहवर्धक, नवजीवन देणारा प्रकाश त्यांच्या आयुष्यात पसरूं लागला होता.

'विरहतरंग' व 'सुधारक' या प्रदीर्घ काव्यांनीं त्यांना तत्कालीन कवींत अग्रपद मिळवून दिलें, तर 'फार्सी-मराठी कोश' व 'छंदोरचना' या ग्रंथांनीं एक स्वतंत्र व विवेचक बुद्धीचा पंडित म्हणून त्यांना ख्याति मिळवून दिली. जुन्या जमान्यांत वाढलेल्या गंभीर प्रकृतीच्या प्रौढ कवींना त्यांच्या या यशाबद्दल हेवा वाटत असला तरी नव्या पिढींतील त्यांच्या समकालीनांत व नुकतेंच डोकें वर काढीत असलेल्या, त्यांच्याहून धाकुट्या असलेल्या, साहित्यिकांत त्यांच्याबद्दल आदरयुक्त प्रेमाच्या व कौतुकाच्या भावना उद्भवूं लागल्या होत्या. या भावनांची अल्पशी कल्पना नागपूर येथें त्या वेळेस निघणाऱ्या 'वागीश्वरी' या मासिकांत प्रसिद्ध झालेल्या खालील विनोदी कवितेवरून येईल :

### सुधारक काव्य वाचून...

(वृत्त — सुधारक)

कवि : श्री. 'अबदुल रहिमान'

बडा कवी तो कोण खरोखर ?
घालि शिरावर पग्डि पुणेरी
मराठिची ? वा संस्कृत भर्जेरी
चालवितो जो चर्पटपञ्जरी ?
खरा कवी तो नसे बरोबर ॥ १ ॥

खरा कवी तो कोण मुकर्रर
रचूनि कवितेचा गोवर्धन
करीत काव्याचें बहु वर्धन
पुण्यामधें मा. त्रिं. पटवर्धन
खरा कवी तो हाच मुजफ्फर ॥ २ ॥

# पुन्हां पुण्यांत

साहित्याचा हाच अकब्बर
लावि मराठी-फारसि लग्नें
रूढींचीं नच मानी विघ्नें
सनातन्यांच्या मूर्ती भग्ने
नव्या मनूचा वा पैगम्बर ॥ ३ ॥

मराठिची हा राखे अब्रू
'गङ्गालाञ्जली' याची सुश्रुत
'विरहतरङ्ग'हि फारच प्रसृत
'सुधारका' सोडिती न श्मश्रुंत
आज दिसे हा एकच गब्रू ! ॥ ४ ॥

कवींतला हा गामा कल्लू
काव्य प्रकाशुनि साल गुदस्ती
इतर कवींची जिरवी मस्ती
सफाइनें कीं मारुनि कुस्ती
(नाहीं तर आहेतच उल्लू !!) ॥ ५ ॥

भाषेची या मुळिं नच पर्वा
कांहीं फारसी कांहीं अरब्बी
कांहीं मराठिच जुने मुरब्बी
शब्दांची तर औरच खुब्बी
व्याकरणाचा बहरच हिर्वा ॥ ६ ॥

मायबोलिची अश्रुत सेवा !
मराठींत लिहि गजल पुष्कळ
(म्हणोत कोणी जन त्या बाष्कळ
आहे त्यांची बड्बड वायफळ
जनक टिकेचा हृद्गत हेवा !) ॥ ७ ॥

हृद्भावांचें वर्णन मिठें
लम्ब कार्विय वा लघुकाव्यीं वा

चाले याची कलम् जशि हवा
लोकांकडुनी मिळवि वाहवा
(नाहीं तर इतरांचे गट्ठे !) ॥ ८ ॥

जिगदोस्त हा तरुण पिढीचा
देशहिताची अन्तरिं तळमळ
हृदयान्तरिं प्रीतीची जळजळ
विध्वांचीही फारच कळकळ
दुर्दम दुष्मन् जुन्या रुढीचा ! ॥ ९ ॥

जगो कवी हा वर्षें शम्भर !
मायबोलिचा इमानि बन्दा !
शाहिरांतला शाहिर खन्दा
रचो निरन्तर नवीन छन्दा
साहित्याचा जणुं औदुंबर !!! ॥ १० ॥

१९२७-२८ हा दोन वर्षांचा काळ माधवरावांच्या आयुष्यांतील एक प्रकारें संक्रमणाचाच काळ होता म्हटलें तरी चालेल. या दोन वर्षांत त्यांनीं लेखन तर पुष्कळच केलें, पण आपली वाङ्मयीन भूमिकाहि निश्चित केली. त्यांनीं आपल्या विचारांची बैठकहि दीर्घ चिंतनानें स्थिर केली. ही भूमिका आणि विचारांची बैठक यांना पुढील दहा वर्षांत त्यांनीं कधींहि ढळ पोचूं दिला नाहीं. आपलें जीवितकार्य कोणतें तें त्यांनीं आतां निश्चित ठरविलें होतें आणि त्याप्रमाणें त्यांनीं आपल्या भावि आयुष्याची आंखणी केली होती. एकच प्रश्न अनिर्णित राहिला होता आणि तो म्हणजे स्वतःच्या विवाहाचा. आर्थिक सुस्थितीवर तो अवलंबून होता. कोठें तरी स्थिर झाल्याशिवाय सुस्थिति साधणें शक्य नव्हतें. महाराष्ट्र एज्युकेशन सोसायटीच्या लोकांना त्यांचें काम पसंत होतें व ते त्यांना आजीव सभासद म्हणून घ्यावयास तयार होते. आणि त्यासंबंधींची रीतसर निश्चिती करण्यास सोसायटीनें विलंब लावला नसता तर माधवराव कोल्हापुरास न जातां कायमचेच पुण्यास राहिले असते. माधवरावांनाहि, या शाळेंत पैका कमी मिळत असला तरी पुण्यांत राहावयास सापडत आहे, तर तेथेंच चिकटून राहावें असें वाटूं लागलें होतें. शिवाय

पुण्यास आतां त्यांच्याभोंवतीं तरुण चाहती मंडळी गोळा होऊं लागली होती. आणि त्या मंडळींत त्यांचें मनहि रमूं लागलें होतें. त्यांनींच एके ठिकाणीं म्हटल्याप्रमाणें :

स्वप्नहीन ती रात्रीं निद्रा गाढ
दिनीं कष्ट अन् पाणी, भाकर जाड ;
सन्ध्याकाळीं विजन, स्नेही, कविता —
काय यापुढें साम्राज्याचा पाड.

अशी त्यांची या काळांतील वृत्ति बनत चालली होती. डेक्कन जिमखान्यावरील मार्केट बिल्डिंगमधील पहिल्या मजल्यावरील कोपऱ्यांतील त्यांची खोली ही त्या वेळच्या नवसाहित्यिकांच्या अड्ड्याचीच एक जागा असे. या अड्ड्यांतील बरीच मंडळी पुढें आपल्या कलमकौशल्यानें नांवारूपास आली. श्री. के. क्षीरसागर, गोपीनाथ तळवलकर, गं. भा. निरंतर, वि. बा. आंबेकर, मो. शा. शहाणे, भय्या उमराणी, यादव मुकुंद पाठक वगैरे व्यक्ती त्यांपैकीं प्रमुख होत. पाठक हे त्यांच्या शेजारच्याच खोलींत राहात असत. त्यांचें 'शशिमोहन' काव्य त्यावेळेस लिहिलें जात होतें. ते व त्याचे कांहीं काव्यप्रेमी स्नेही यांचें 'विहंगवृंद' नांवाचें एक वाङ्मयमंडळ होतें. वऱ्हाड–नागपूरकडचे कांहीं विद्यार्थी त्याचे सदस्य होते. शेजारपणामुळें साहजिकच या मंडळींशीं माधवरावांचा परिचय झाला. या सर्व मंडळींच्या नित्य सहवासामुळें व त्यांच्या आदरमिश्रित प्रेमाच्या स्निग्धतेमुळें त्यांना त्रस्त करणाऱ्या एकलेपणाचा दाह पुष्कळच कमी झाला होता. याच सुमारास, अत्यंत काटकसरीनें राहून व पैक्याची संचणी करून आपल्या डोईवरील कर्जाचा भार त्यांनीं दूर केला होता; आपल्यावर अवलंबून असलेल्या कुटुंबियांच्या योगक्षेमाची व्यवस्था, आवळस येथील शेतजमीन आणि पुणें येथील त्यांच्या चुलत्यांकडून त्यांच्या पश्चात् वारसा हक्कानें कुटुंबाकडे आलेलें घर हीं विकून जें कांहीं द्रव्य मिळालें होतें त्याची यथाप्रमाण वांटणी करून व तें ज्याचें त्यास देऊन, त्यांनीं नीट लावून दिली. अशा प्रकारें कौटुंबिक जबाबदारींतूनहि ते मुक्त झाले. भडोच-जवळ सिनोर येथें राहणाऱ्या त्यांच्या आत्याबाई आऊताई सोहनी याहि १९२७ त निवर्तल्यामुळें त्यांच्याहि पोषणाच्या जबाबदारींतून ते सुटले.

आत्याबाईंचा मृत्यु त्यांना बराच जाणवला. कुटुंबांतील दोन व्यक्तींवर त्यांची फार निष्ठा होती. एक त्यांचे चुलते दिनकरअप्पा व दुसऱ्या या आत्याबाई. आत्याबाईंच्या मृत्यूनंतर माधवरावांनीं रा. वि. म. यांना लिहिलें होतें: 'अप्पाकाकांच्या मृत्यूनंतर जर कुणाचा मृत्यु मला तीव्रतेनें जाणवला असेल तर तो आत्याबाईंचा. आतां आम्हीच आम्हांला वडील धाकुटे.'

आत्याबाईंच्या मृत्यूनंतर त्यांना त्यांच्या एका इच्छेचें वारंवार स्मरण होई. परिस्थितीमुळें व मताभिन्नतेमुळें आपण ती त्यांच्या हयातींत पुरी करूं शकलों नाहीं याबद्दल त्यांना फार वाईट वाटे. माधवरावांनीं आपल्या डोळ्यांदेखत लग्न करून संसारात स्थिर व्हावें अशी त्यांची फार इच्छा होती. त्या आचार-विचारानें कर्मठ होत्या. त्याना माधवरावांनीं ब्राह्मण – आणि तीहि कोंकणस्थ – मुलीखेरीज अन्य मुलीशीं लग्न करणें संमत नव्हतें. पण पुढें पुढें त्याचा तो आग्रह कमी झाला व त्या त्यांना म्हणत, 'माधव, तूं तुझ्या पसंतीप्रमाणें कुणाशींहि लग्न कर, पण एकदांचें कर व स्थिर हो.' माधवरावानाहि वाटूं लागलें कीं, आपला शहाणपणा आता पुरे झाला. त्यांच्या निकटवर्ती स्नेह्यांकडूनहि त्यांना वारंवार सूचना केल्या जाऊं लागल्या. प्रो. वामन मल्हार जोशी तर कित्येक दिवस त्यांच्या मागें होते. त्यानीं दोन-तीन स्थळें सुचवून त्यांपैकीं एका वधूच्या पित्याची भेटहि करविली. या वधुपित्याला माधवराव पसंत होते, पण वधूला माधवराव पसंत पडले नाहींत, इतकेंच नव्हे तर तिनें, 'असल्या विकृत मनाच्या माणसाशीं लग्न करण्यापेक्षां, विहिरींत जीव दिलेला काय वाईट?' असे तुच्छतेचे उद्गार काढले. या बाई पुढें टोपण नांवानें प्रसिद्ध केलेल्या आपल्या नवमतवादी वाङ्मयानें बऱ्याच गाजल्या. आपल्या अविकृततेची आणि शुचितेची ऐट मिरविणाऱ्या या बाईची त्यांत प्रकट झालेली कामप्रवृत्ति व पुं-स्त्रीसंबंध-विषयक विचारसरणी ज्यांनीं पाहिली, त्याना असल्या या बाईशीं माधवरावांची जन्माची गांठ पडली नाहीं हें पाहून हायसेंच वाटलें. प्रो. वामन मल्हार जोशांनीं त्यानंतर आणखी एका मुलीबद्दल त्यांजकडे शब्द टाकला. तिच्या गुणांची त्यांनीं खूप प्रशंसा केली. 'ही मुलगी तुमच्या सौंदर्यकल्पनेच्या कसोटीस कदाचित् उतरणार नाहीं, पण सुंदर अंतःकरणासंबंधीं तुमची

जी कल्पना असावी असें मला तुमचें काव्य वाचून वाटतें, तिला उतरणारी आहे. तिच्या सहवासांत तुम्हीं सुखी व्हाल.' वामनरावांसारख्यांचा शब्द मोडणें माधवरावांच्या जीवावर आलें. तरी पण त्यांनीं लगेच 'हो' म्हटलें नाहीं. पण वामनरावांनीं त्यांचा पिच्छा सोडला नाहीं. आणि त्यांच्या आग्रहावरून ते एक दिवस तिला पाहावयाला गेले. ही मुलगी वामनरावांचीच एक विद्यार्थिनी होती. 'गृहीतागमा'चे परीक्षेंत ती अनुत्तीर्ण झाल्यामुळें, तिचा विवाह उरकून टाकण्याच्या खटपटींत तिचे वडील होते. गंगुताई गरूड हें त्या मुलीचें नांव. माधवरावांनीं तिला पसंत केली आणि ती ता. २९ मे, १९२८ रोजीं मालती पटवर्धन [८] बनली. माधवराव गृहस्थ बनले, संसारी झाले.

माधवरावांचें लग्नाचें घाटत होतें त्याच सुमारास कोल्हापूरच्या राजाराम कॉलेजमध्यें फार्सी विषयाच्या अध्यापकाची जागा भरली जावयाची होती. या जागेसाठीं माधवरावांनीं प्रयत्न करावा असा त्यांच्या अनेक स्नेह्यांचा आग्रह पडल्यामुळें त्यांनीं अर्ज केला होता. माधवरावांना संस्थानांत नोकरी करणें मनापासून पसंत नव्हतें. परंतु स्नेहीमंडळी आग्रहच करीत आहेत, तर आपण आपला वैयक्तिक हट्ट चालवूं नये, या सर्वांच्या सदिच्छेमुळें आपलें जर भलें होण्याचा योग असेल, तर तसें होऊं द्या, असा त्यांनीं विचार केला. आणि परिस्थिति बदलत चालली होती म्हणून असो, मित्रमंडळीच्या सदिच्छेमुळें असो, किंवा त्यांच्या आयुष्याला स्थिरता यावी अशी भवितव्यतेची इच्छा होती म्हणून असो, त्यांची कोल्हापूरच्या राजाराम कॉलेजांत १९ जूनपासून नेमणूक केली गेल्याचा हुकूम त्यांच्या हातीं लग्नानंतर १० दिवसांनीं पडला. माधवरावांच्या सर्व स्नेह्यांस व हितचिंतकांस ते पूर्वपदावर स्थापित झालेले पाहून आनंद झाला.

माधवरावांच्या आयुष्याचें दुसरें पर्व संपून आतां तिसरें पर्व सुरू होत होतें.

---

[८] हें नांव सौ. पटवर्धन यांस न आवडल्यामुळें, कोल्हापुरास गेल्यावर तें बदलण्यांत येऊन मालतीताई, लीलाताई बनल्या.

# १२

## नव्या पर्वाला प्रारंभ

कोल्हापुरांत २० जून, १९२८ च्या सकाळीं त्यांनीं आपल्या पत्नीसह पाऊल टाकलें. दोन वर्षांपूर्वी अमळनेर सोडल्यावर, याच कोल्हापुरांतील एका शाळेंत [1] शिक्षकाच्या नोकरीसाठीं त्यांनीं अर्ज केला असतां, त्यांना नकार मिळाला होता. मोठ्या आशेनें त्या वेळेस ते कोल्हापुरांत आले होते. पण निराश होऊन त्यांना परतावें लागलें होतें. पुन्हां कधीं त्याच कोल्हापुरांत येण्याचा, आणि तोहि नोकरीनिमित्त, योग येईल असें त्यांना वाटलें नव्हतें. पण चित्रविचित्र घटनांनीं भरलेल्या त्यांच्या आयुष्यांत तो योग आला खरा.

राजाराम कॉलेजांत नेमणूक झाल्याचें कळलें तेव्हां माधवरावांचा, कोल्हापुरास आधीं एकटेंच जाऊन बिऱ्हाडाचें वगैरे नीट जुळविल्यावर, मागाहून सवडीप्रमाणें आपल्या पत्नीस नेण्याचा विचार होता. पण तो बेत एकाएकीं बदलून ते कोल्हापुरास सपत्निक गेले. बिऱ्हाडाची पूर्वयोजना कांहींच नसल्यामुळें ते पहिले तीन-चार दिवस विद्यापीठांत तोफखाने यांजकडे व पुढें एक आठवडाभर त्यांच्या बेझंट वसतिगृहांत राहिले. त्यांचे स्नेही (पुढें त्यांच्या भगिनी यमुताई यांच्याशीं विवाह होऊन मेहुण्याचें नातें जोडलेले) मोहनराव शहाणे विद्यापीठांत त्या वेळेस अध्यापनाचें काम करीत. त्यांनीं व प्रो. पंगु यांनीं, बाबुजमाल रस्त्यावरील नाडगोंडे यांचे घरांत जागा पाहून त्यांचें बिऱ्हाड थाटून दिलें. या जागेंत गेल्याच्या दुसऱ्या दिवशीं त्यांनीं रा. वि. म. यांना पुढीलप्रमाणें तेथील हकीकत लिहिली आहे : "आतां

[1] पुढें याच शाळेनें आपल्या एका संमेलनप्रसंगीं त्यांना अध्यक्षपद देऊन त्यांचा गौरव केला.

स्वतंत्र बिऱ्हाड केलेलें असून कालपासून सैंपाक घरींच करूं लागलों आहों. काल सुरुवातीला सारी जमवाजमव होऊन जेवणास दोन वाजले. बेत अर्थात् साधा म्हणजे खिचडी-भाजीचाच केला होता. आतां जरा इथें बरें वाटूं लागलें आहे, परंतु नव्या ठिकाणीं आधीं आठ-दहा दिवस कसेंसेंच वाटत असे. तरी विद्यापीठांतील स्त्री-पुरुषें प्रेमळ, सुसंस्कृत व फार खेळीमेळीचीं आहेत. बाकी वातावरण फार मागासलेलें आहे. आम्ही बाजारहाट करायला व फिरायला बरोबर जातों तेव्हां रस्त्यांत स्त्रीपुरुष मोठ्या व चमत्कारिक कुतूहलानें आमच्याकडे पाहतात. येथील शहराचें अधिष्ठान फार उत्तम आहे. परंतु नगररचना बोळाबोळाची व लोकांची गृहबाह्य रहाणी गलिच्छ, त्यामुळें मी शहरांतच रहातों पण आवडत नाहीं. आमचा विद्यापीठांत, कॉलेजकडे व फिरायला जायचा रस्ता अंबाबाईच्या देवळाच्या आवारांतूनच आहे. देऊळ मात्र भव्य, यवत येथील भुलेश्वराच्या देवळाच्या धाटणीचें व प्राचीन आहे. त्यांतच नव्या-जुन्याचा संकर डोळ्यास खुपतो. कॉलेजांतील वातावरण समाधानकारक आहे असें नाहीं. खटपटी लटपटी फार, उच्च बौद्धिक वातावरण नाहीं. पाहूं काय होईल तें. हुजूरची स्वारी शहरांतून मुख्य रस्त्यानें गेलें आलें तर तीन-चारदां तरी भेटायची. दरेक वेळीं गाडींतून पायउतारा होऊन मुजरा केला पाहिजे. हुजुरांचें लक्ष साहाजिकच क्वचित् असणार, परंतु निकटवर्ति लोकांची मात्र काकदृष्टि असते असें म्हणतात. यांत कितपत सत्य आहे ईश्वर जाणे. ”

संस्थानी वातावरणाबद्दल त्यांचें पहिल्यापासूनच मन साशंक असे; तेथें स्थिरता व मानसिक स्वास्थ्य लाभणें कठीण असाच त्यांचा ग्रह होता. कुजट, कोंदट, अप्रागतिक, स्वतंत्र वृत्तीला मारक अशा वातावरणांत आपल्यासारख्याला वावरावयाचा प्रसंग यावा, ही एकप्रकारें आपल्याला शिक्षाच आहे असें त्यांना वाटे.

कोल्हापुरास त्यांना, खऱ्या अर्थानें स्वास्थ्य असें कधींच लाधलें नाहीं. आणि त्यामुळें जरुरीपेक्षां एक दिवसहि अधिक ते तेथें राहावयास तयार नसत.

कोल्हापुरास आल्यावर प्रारंभीं प्रारंभीं त्यांच्या बऱ्याचजणांशीं ओळखी झाल्या. कवि सुमंत, कवि नागेश, कवि विरागी, डॉ. श्रीखंडे यांच्याशीं

काव्य-विषयक समान छंदामुळें परिचय होऊन, 'रविकिरणमंडळा' प्रमाणेंच 'साहित्य-स्नेह-मंडळ' या नांवाचें एक मंडळहि स्थापन झालें. यांतील मंडळी आळी-पाळीनें रविवारीं एकेका सभासदाकडे जमून खान-पान, कवितावाचन, काव्य-शास्त्र-विनोद यांत कांहीं काळ घालवीत. या मंडळानें कवि विरागी यांचा 'मधुसंभार' हा कवितासंग्रह आपलें पहिलें प्रकाशन म्हणून प्रसिद्ध केला. माधवरावांनीं 'निवेदना'चे चार शब्द त्याला जोडले होते. या मंडळाचे प्रा. पंगू हेहि कांहीं दिवस सभासद होते. पुढें 'कांहीं जुजबी गैरसमजामुळें' या दोघांचाहि त्या मंडळाशीं असलेला संबंध सुटला. माधवरावांना अशीं मंडळें निर्माण करून कांहीं विधायक कार्य होण्याऐवजीं वृथा वाद उत्पन्न होऊन मनें बिघडतात, मित्रत्व जोडलें जाण्याऐवजीं प्रच्छन्न शत्रुत्व जोडलें जातें, असा कटु अनुभव येऊं लागला. त्यामुळें ते पुढें पुढें असल्या 'मंडळां'-पासून दूर राहूं लागले. कॉलेजातील सहकाऱ्यांशींहि त्यांचा जेवढ्यास तेवढा संबंध असे. आपला पाणउतारा करावयास कोणालाहि कधीं संधि न देण्याकडे त्यांचा नेहमीं कटाक्ष असे. त्यांच्या स्वाभिमानाला डिंवचणारे प्रसंग कॉलेजांत कित्येकदा घडत, पण त्याचे परिणाम ते स्वतःवर कधीं होऊं देत नसत. अध्यापनाव्यतिरिक्त कॉलेजच्या कसल्याहि उठाठेवींत ते पडत नसल्यामुळें कोणाशींहि खटके उडण्याचा प्रसंग येत नसे. आपल्या सर्व सहकाऱ्याशीं ते खेळीमेळीनें वागत, पण विशेष असा संबंध ठेवीत नसत. आपण कोणाशीं लगट करावयाला जावयाचें नाहीं, आणि दुसऱ्या कोणालाहि आपल्याशीं लगट करूं द्यावयाची नाहीं असें त्यांचें धोरण होतें. कॉलेजातील अध्यापकमंडळींत प्रा. पंगू याचेशीं त्यांचा बरेच दिवस निकटचा व मोकळेपणाचा संबंध होता. प्रा. पंगू यांनीं माधवरावांच्या सहवासात घालविलेल्या दिवसांची आठवण आपल्या 'कोल्हापुरांतील जीवन'[२] या लेखांत पुढीलप्रमाणें दिली आहे:

"घर (माधवराव राहात तें) अत्यंत जवळ, त्यामुळें माझी त्यांच्याकडे ये-जा सारखी सुरू झाली, व माझ्याशीं त्यांचा परिचय वाढूं लागला. १९३३ पर्यंत माधवरावाचें या घरीं वास्तव्य होतें, व हा काळ आम्हां दोघांचाहि फार

[२] सह्याद्रि, जानेवारी १९४०

सुखाचा असा गेला. नित्य थट्टा, विनोद, विचारविनिमय, चर्चा यात वेळ जावा. सायंकाळीं रंकाळा, पद्माळा, नंगीवल्ली किंवा विद्यापीठाचें तपोवन, या बाजूस सहल करावी. माधवरावानीं एखादी नवीन कविता रचली किंवा लेख लिहिला असल्यास त्यांतील विषयावर व मुद्द्यावर चर्चा व वादविवाद करावा, असा आमचा नेहमींचा कार्यक्रम असे. माधवरावाची वृत्ति मोकळी व खेळकर होती. नोकरींत व संसारात स्थितिस्थापकता झाल्यामुळें त्याना नवीन उत्साह आला होता. गांवापासून लांब फिरावयास गेलों असतां, हसावें, गावें, मुलांप्रमाणें उड्या माराव्या, असें नेहमीं चाले. रंकाळ्यावर कधीं कधीं त्यांना चुरमुरे व शेंगदाणे घेण्याची हुक्की येई. चुरमुरेवाल्याकडून आम्ही दोघे खिशात दाणे-चुरमुरे घेत असूं. पण पुढून एखादा कॉलेजकुमार येतोसा पाहून चुरमुऱ्याची मारलेली फक्की तोंडात तशीच दाबून धरून, तो विद्यार्थी पुढें गेल्यावर, आम्ही आमचा रोमंथविधि चालू करीत असूं. कधीं कधीं फिरावयास आमच्याबरोबर लीलाताईहि असत, व त्यानाहि रंकाळ्यांतील माशाना शेंगदाणे टाकून, त्याची मौज पाहण्याची हौस वाटावी. असे हे दिवस गमतीचे गेले."

"माधवरावाचें व त्यांच्या पत्नीचें आमच्या घरीं येणे-जाणें होऊन लवकरच, आम्हा सर्व कुटुंबियाचा त्यांच्याशीं घरोबा वाढला, व पुढें तर आमच्यामध्यें काडीचाहि उपचार राहिला नाहीं. माधवरावानीं आमच्याकडे केव्हाहि यावें, सर्वांशीं गप्पा व्हाव्या, लहान मुलांशीं 'अवचित गेले गांवाला, माझ्या कोंबडीला कुणि मारलन् ग' अशा जानपद गीतांची शिकवण व्हावी, व चहापानोत्तर फिरावयास किंवा नवीन परिचय करून घेण्यासाठीं कोणातरी व्यक्तीकडे आमचें जाणें व्हावें, असे प्रकार चालत."

पटवर्धन दंपत्याचे कोल्हापुरातील पहिले कांहीं दिवस नव्या परिस्थितीशीं स्वतःचें जुळवून घेण्यांतच गेले. लीलाबाई वडिलापासून दूर अशा, आयुष्यात कधीं कुठें राहिल्या नव्हत्या. लहानपणींच त्याची आई वारल्यामुळें वडिलाचा लळा त्यांना फार. त्याना सख्खें भावंड नव्हतें. तेव्हां त्यांना मायेची अशी व्यक्ति फक्त वडीलच. बाबासाहेब गरुडांनीं लीलाबाईंच्या आईच्या मृत्यूनंतर पुनर्विवाह केला होता. ते मूळचे इंदूरचे. त्यांची जिव्हाळ्याची आतेष्ट मंडळी इंदुरासच. पण या पुनर्विवाहामुळें त्याना समाजाकडून, विशेषतः जवळच्या

नातेवाईकाकडून, फार त्रास झाला. त्यांनीं इंदूर सोडलें व ते पुण्यास राहावयास आले. सामाजिक सुधारणेविषयीं, विशेषतः स्त्रीशिक्षणासंबंधीं विशेष कळकळ असल्यामुळें कांहीं वर्षें महर्षि अण्णा कर्वे यांच्या अनाथ बालिकाश्रमांत त्यांनीं काम केलें व पुढें भारतसेवक गोपाळराव देवधर याच्या सेवासदन संस्थेंत आजीव सेवक म्हणून ते काम पाहूं लागले. देवधराच्या पश्चात् सेवासदनची चिटणिशी त्यांच्याचकडे आली होती. इंदूर सोडून पुण्यात स्थायिक होणें, हा त्यांच्या आयुष्यांतील एक योगायोगच होता म्हटलें तरी चालेल. परिस्थितीच्या प्रतिकूल प्रवाहात सापडल्यामुळेंच केवळ ते आपल्या खऱ्या कर्तबगारीच्या क्षेत्राला पारखे झाले व अंतरींच्या साऱ्या महत्त्वाकांक्षा त्यांना दूर लोटाव्या लागल्या. पण त्यामुळें त्यांच्या चेहऱ्यावर कधींहि असंतुष्टता, असमाधान, अशांतता दिसली नाहीं. जुन्या पिढींतील सामाजिक कार्यकर्त्यांत त्यांच्याइतकी सुसंस्कृत अभिरुचि, शुद्ध सौंदर्यभक्ति, सुशील व संयमी वृत्ति, त्यागी कष्टी जीवनांतहि कलात्मकता अबाधित ठेवण्याची चतुराई फार थोड्यात आढळेल. त्यांच्याकडे पाहिलें कीं देवालयाच्या गाभाऱ्यांत अखंड तेवत राहून मंद पण मंगल प्रकाश पाडणाऱ्या नंदादीपाची आठवण होते. अशा या पित्याच्या सहवासांत लीलाबाईंचें लहानपण व कुंवारपण गेलेलें. कविवर्य तांबे, इंदूरचे कवि रहाळकर हे बाबासाहेब गरुडांचे अत्यंत जिव्हाळ्याचे स्नेही, त्यामुळें त्यांचाहि निकट सहवास घडून काव्य, कला, गायन यांसंबंधींचे त्यांच्या मनावर चांगले संस्कार झालेले होते. त्यांचें उच्च शिक्षण प्रो. वामन मल्हार जोशी, प्रो. लागु, डॉ. कमलाबाई देशपांडे यांच्या हाताखालीं झालें होतें. त्यांच्या सापत्न आई, माई याच्या शिस्तींत त्यांचें सारें बालपण गेल्यामुळें संसारांत आवश्यक असलेले गृहदक्षता, टापटीप, कामाचा उरक वगैरे गुणहि त्यांच्यांत आले होते. अलीकडील सुशिक्षित गृहिणींत सामान्यतः आढळणारा पाककौशल्याचा अभाव त्याच्यांत आढळत नसे. स्वादिष्ट सैंपाक व सुंदर गृहव्यवस्था हें एक त्यांचें वैशिष्ट्य होतें. त्यासंबंधींची त्यांची हौसहि दांडगी असे. आपण एक उत्तम संसारी स्त्री होऊन प्रपंच सुखाचा करावा, पतीच्या यशांतच आपलें यश पाहावें अशी त्यांची सर्वसाधारण प्रवृत्ति होती. विवाहपूर्व आयुष्य कांहींसें दावांतच गेलें

असल्यामुळें त्यांच्या स्वभावात अंमळ कुढेपणा आला होता, पण त्यांत कडवटपणा नव्हता; घरच्या शिस्तीमुळें स्वतःच्या बाबतींत स्वतंत्रपणें निर्णय करून त्याप्रमाणें वागण्याची त्यांना संवय नसल्यामुळें त्यांची काहीं काहीं बाबतींत परावलंबी वृत्ति बनली होती. 'जा, स्वतंत्रतेची मौज चाख,' असें माधवरावांनी कितीहि मोकळेपणाने सागितलें, तरी त्याच्या कल्पनेप्रमाणें ती चाखावी, त्यांत कांहीं आगळी मौज आहे, असें त्यांना कधीं वाटत नसे. या उलट माधवरावांची वृत्ति होती. स्त्रीनें संसारदक्ष असावें हें जरी त्यांना मान्य होतें, तरी तिनें आपला सारा वेळ चूल आणि मूल यातच घालवावा हें त्यांना पसंत नसे. विशेषतः शिक्षण मिळालेल्या स्त्रियांनीं तरी तसा काळ घालवूं नये, याबद्दल त्यांचा कटाक्ष असे. स्त्रीनें परतंत्र न राहतां स्वतंत्र दृष्टीनें जगात वावरावें, पतीच्या कर्तबगारीचे पवाडे गात न बसतां, स्वतःसाठीं स्वतंत्र कार्यक्षेत्र आंखून त्यांत आपली कर्तबगारी दाखवावी; पतीला 'स्वामि' मानून आत्मविकासाला विघातक अशा दास्यत्वाची भावना आपल्यांत न रुजवितां, त्याला 'सखा' मानून आत्मविकासपोषक अशा समत्वाची भावना रुजवावी, वाढवावी व उभयतांचें जीवन समृद्ध करावें, अशा तऱ्हेची माधवरावांची विचारसरणी होती. त्यांच्या आप्तांपैकीं एका सुशिक्षित पतिपत्नींचें उदाहरण दाखवून ते लीलाबाईंना म्हणत, 'पहा ××× कशी संसार संभाळूनहि अध्यापन आणि आपल्या आवडत्या विषयांतील संशोधन करते! तीं दोघें किती बरोबरीनें आणि त्याचबरोबर एकमेकाविषयीं जिव्हाळा व आदर बाळगून वागतात! तुझें माझें वागणेंहि तसेंच असावें असें मला वाटतें." पण लीलाबाईंना तें पटत नसे. त्यांचा पिंडच वेगळा होता.

लीलाबाई सुशिक्षित होत्या खऱ्या पण त्याच्यात सांसारिक महत्त्वाकांक्षांखेरीज अन्य महत्त्वाकांक्षा नव्हत्या. ज्या सांसारिक गोष्टींना माधवराव गौण समजत त्याना लीलाबाई प्रधान मानीत. त्यामुळें प्रारंभीं प्रारंभीं परस्परांत खटके उडत आणि दोघेंहि विमनस्क होत. या विमनस्कतेंत आणखी भर पडावी म्हणून कीं काय, पुढील प्रसंगासारखा एखादा प्रसंग घडून येई; लीलाबाई आपल्या 'आमचीं अकरा वर्षें' या पुस्तकांत लिहितात: "एक दिवस नाशिकाहून एका गृहस्थाचें पत्र आलें. माधवरावांचें लग्न झालेलें त्या गृहस्थांना माहीत

नव्हतें. त्यांनीं माधवरावांना एक स्थळ सुचविलें होतें. मुलगी विधवा होती. तिची पुनर्विवाह करण्याची इच्छा होती. 'कर्तव्य असल्यास एकदा येऊन भेटून जावें' अशा अर्थाचें तें पत्र होतें. त्या दिवशीं प्रो. शंकरराव कानेटकर (कवि गिरीश) आमच्या घरीं पाहुणे होते. आमच्या नव्या बिऱ्हाडीं ते प्रथमच पाहुणे आले होते. ते व आम्ही दोघें जेवायला बसलों होतों. सकाळीं १०॥ च्या सुमाराला हें पत्र माधवरावांच्या हातीं पडलें. डाक आल्याबरोबर, कितीहि निकडीचें काम असो, तें बाजूला सारून आलेलीं पत्रें वाचल्याशिवाय त्यांना चैन पडत नसे. तसेंच त्या दिवशीं झालें. त्यांनीं तें पत्र वाचलें. आणि शंकररावांना वाचायला दिलें. दोघांनींहि वाचलें, परंतु मला मात्र कांहीं सांगितलें नाहीं. शंकरराव माझ्याशीं बोलत होते. माधवराव मात्र जे एकदम गप्प झाले, ते सबंध जेवण होईतों बोलले तर नाहींतच पण जेवणानंतर पलंगावर भिंतीकडे तोंड करून जे निजले ते साडेतीन-चार वाजेपर्यंत! डोक्यावरचें पांघरुणहि त्यांनीं काढलें नाहीं. मीं आपलें काम आटोपलें व नंतर मी व शंकरराव इकडल्या तिकडल्या गोष्टी बोलत बसलों होतों. पत्रामुळें झालेला बदल माझ्या व शंकररावाच्या तेव्हांच लक्षांत आला होता. परंतु काय कारण झालें होतें हें मींहि मुद्दाम विचारलें नाहीं. मला तसें करणें बरें वाटलें नाहीं, व शंकररावहि त्यासंबंधीं माझ्याशीं बोलले नाहींत. दुपारीं चार वाजतां चहा झाला, व माधवराव एकटेच कोठेंतरी फिरावयाला निघून गेले. संध्याकाळीं पांचाच्या सुमारास राजाराम कॉलेजांत शंकररावांचें काव्यगायन झालें. त्याला माधवराव हजर होते. नंतर ते व शंकरराव फिरायला गेले. ते रात्रीं साडेआठला घरीं आले."

"इकडे माझ्या मनाची स्थिति मोठी चमत्कारिक झाली. शंकररावांना आम्ही आमच्या जवळच्या स्नेह्यांतले समजतों व समजत होतों. परंतु कांहीं गोष्टींचा उल्लेख मित्रांच्या देखतहि करण्याचा संकोच वाटतो. त्यामुळें मीं आपल्या मनावर दडपण ठेवलें होतें. आपल्या स्वतःच्या खिन्नतेचें प्रदर्शन करणें मला बरें वाटलें नाहीं; म्हणून मी स्वतःला झालेलें दुःख लपविण्याचा प्रयत्न करीत होतें. मीं स्वयंपाक केला. रात्रीं नवाला आमचीं जेवणें झालीं. तरी माधवराव अस्वस्थच होते. पुढें दुसरे दिवशीं ते पुन्हा पूर्वींप्रमाणें बोलूं लागले. त्यांची चूक त्यांना कळून आली. त्यांनीं त्यांच्या उदासीनतेचें कारण

मला सांगितलें व 'अशा मधून मधून न बोलण्याच्या लहरी मला येतात या गोष्टीचा परिणाम तूं आपल्यावर होऊं देऊं नकोस,' असें मला सांगितलें."

"माधवरावांच्या आयुष्यांतील वैवाहिक ध्येय म्हणजे प्रेमविवाह. तो नच साधल्यास निदान पुनर्विवाह किंवा एखाद्या पतितेशीं लग्न करून तिचा उद्धार करावा असें होतें; परंतु ही त्यांची इच्छा पूर्ण झाली नाहीं. आणि त्यांनीं प्रतिष्ठित समाजांत रूढ असलेल्या चालीप्रमाणें नाइलाजानें माझ्याशीं लग्न केलें आणि लग्न करून आतां संसार करायचा निश्चय करून ते त्या मार्गाला लागले असतां, ह्या पत्रानें डिंवचलें होतें."

"कारण मला समजलें. मीं तें समजून घेण्याचा प्रयत्न केला. परंतु त्यांच्या चमत्कारिक वागण्यामुळें मला जें दुःख झालें, त्यानें माझी अर्धी शक्ति नाहींशी झाली. ह्याच प्रसंगाला उद्देशून, 'सर्वस्वाचा यज्ञयाग' ही कविता निर्माण झाली. ह्या कवितेची तारीख म्हणजेच त्या प्रसंगाची तारीख २२ सप्टेंबर, १९२८ ही मी विसरणें शक्य नाहीं. ही कविता वाचली कीं माधवरावांची त्या वेळची मूर्ति माझ्या डोळ्यांपुढें उभी राहते आणि अजूनहि मला कसें तरी होतें."

अशा तऱ्हेचे प्रसंग व त्यांमुळें माधवरावांना येणारे लहरींचे झटके लीलाबाईंची पांचावर धारण बसवीत. त्या गोंधळून जात. त्यांना काय करावें हें समजत नसे. माधवराव या अशा लहरींत कोणाचे नसत. आपल्या सहवासांतील माणसाला केवढा त्रास होतो याचें अवधानहि त्या वेळेस त्याना राहात नसे. तासचे तास ते अबोल राहात. लीलाबाई लिहितात: "मी घरांत एकटी आणि अशा वेळीं तर मला एकलेपणाची जाणीव अधिक होई. आतां आपलें कसें होईल, आपलें ह्यांच्याशीं कसें पटेल, अशी भीति वाटे. केव्हां केव्हां माधवराव जे सकाळीं घराच्या बाहेर पडत ते दुपारीं दोन-तीन वाजले तरी त्याचा घरीं पत्ता नसायचा. मी वाट पाहून थकून जात असें. सर्व स्वयंपाक करून ठेवावा आणि खिडकींत तासचे तास वाट पाहात बसून राहावें, असे प्रसंग कित्येक वेळेला घडत. त्यांना आपण करतों हें गैर करतों, हें समजत असे. स्वतःची चूक ध्यानांत आली म्हणजे ते म्हणत, 'आजपर्यंत मी एकटा

होतों. मला आपलें लग्न झालें आहे ह्याचें स्मरण राहात नाहीं. तूं रागावूं नकोस.' मी निरुत्तर होई."

कोल्हापुरांतील पहिली सहामाही दोघांनींहि अस्वस्थ मनस्थितींतच घालविली. लीलाबाईंना तर वाटूं लागलें, कीं आपण कांहीं दिवस माधवरावांपासून दूर राहावे हें बरें. आणि त्याप्रमाणें माधवरावांच्या संमतीनें दिवाळीच्या सुटीचे आधींच त्या पुण्यास माहेरीं आल्या. सुट्टी संपल्यावरहि त्या कोल्हापुरास परत गेल्या नाहींत. माधवरावांच्या आग्रहावरून त्या एरंडवणें येथील कॉलेजच्या वसतिगृहांत 'गृहीतागमा' परीक्षेचा अभ्यास करण्याकरितां सहा महिने जाऊन राहिल्या.

दोघेंहि अल्पकाळ का होईना, एकमेकांपासून दूर राहिल्यामुळें, दोघांसहि अंतर्मुख होऊन विचार करावयास व परस्परांच्या मनांतील गैरसमज दूर करावयास संधि मिळाली. माधवराव स्वतःशीं विचार करूं लागले, म्हणजे आपल्या वागणुकींतील अविचारीपणा त्यांना कळे. आपला अतिरिक्त स्वप्नाळूपणा आपल्याला असल्या या चमत्कारिक लहरींत ओढतो व आपल्या हातून व्यावहारिक मनुष्याकडून कधींहि होऊं शकत नाहीं अशा तऱ्हेचा त्रास आपल्या निकटवर्ति व्यक्तीला सहन करावा लागतो, हें त्यांच्या लक्षांत येई. त्यांचें अंतःकरण अनुकंपेनें भरून येई आणि ते लीलाबाईंना म्हणत: "काळानें व अनुभवानें मी असा कठोर बनलों आहें. आयुष्यांतील बऱ्यावाईट अनुभवांनीं स्वभावात एकप्रकारचा तेढेपणा आल्यावर तुझी माझी ओळख कां झाली? १९१७-१८ च्या काळात जेव्हां माझें मन अत्यंत निरामय व सुस्थित होतें, तेव्हां जर आपली ओळख होऊन विवाह होता तर संसारातील मादक उल्हासाचाहि आपण सहकारानें उपभोग घेतला असता. पण अजून वेळ अगदींच टळली नाहीं. आपण अजूनहि सुखी होऊन सहकार्यानें कार्य करीत राहूं."

एरंडवणें येथे कॉलेजच्या वसतिगृहात लीलाबाई राहावयास गेल्या त्या महिन्यांत माधवरावांनीं कोल्हापुराहून त्याना लिहिलें होतें: "तुझें साध्या भाषेंत लिहिलेलें जिव्हाळ्याचें पत्र वाचून मला फार समाधान झालें. तसें पत्र मला लिहितां येत नाहीं याबद्दल मला माझ्या बोजड विद्वत्तेचा फार राग येतो. 'खरोखर चतुर फार बायका!' यांत कांहीं शंका नाहीं. 'चुकचुकल्यापरि वाटे

अंतरिं' अशा स्थितींचें वर्णन तूं किती हृदयंगम लिहिलें आहेस! आणि पुन्हा तूं टोमणा मारतेस कीं, 'मला ठाऊक आहे कीं, तूं ह्यावर मला लांबलचक एक व्याख्यान देशील.' पण मी व्याख्यान देण्याच्या मनःस्थितींत नाहीं. इथें मलासुद्धां या घरांत एकटें येतांना व वावरतांना कसेंसेंच झालें! जुन्या आठवणी भरतीच्या लाटाप्रमाणें भराभर मनाच्या किनाऱ्यावर आदळूं लागल्या. मूर्खपणामुळें वा असमंजसपणामुळें तुला त्रास दिल्याच्या आठवणी झाल्या कीं, फारच कालवाकालव होऊन डोळ्यात पाणी उभें राही. प्रिय पोरी, केवळ असमंजसपणामुळें माणसें एकमेकांना किती दुःख देतात! आजपर्यंत जवळच्या माणसांनीं तुला दूर लोटली असेल; पण मी तुला दूर लोटीन ही शंकासुद्धां मनाला शिवूं देऊं नकोस. माझ्या डोळयांतील या वेळचीं टिपें तुला दिसलीं असतीं तर शब्दांनीं अर्थ व्यक्त करण्याची जरूरीच पडली नसती. भावना अवश्यमेव पाहिजे, दृढभाव पाहिजे पण रोगट भावनातिरेक नको. म्हणूनच मीं तुला थाब्यावर ( स्टेशनवर ) पाठीवर थाप मारून 'Be bold and brave' असें म्हटलें आणि ईश्वराजवळ माझी अशीच प्रार्थना आहे. म्हणून मनांतील शंकाकुशंका काढून टाक आणि आनंदानें, नव्या हुरुपानें व चिकाटीनें आपल्या कार्यास लाग."

माधवरावांचें हें पत्र वाचून, लीलाबाईच्या अंतःकरणांतल्या कोठल्या तरी कोंपऱ्यात कांहीं असमाधान दडून राहिलें होतें असेल तें पार निघून गेलें; त्याचे डोळे भरून आले. त्यानीं त्याना लिहिलें:

"माधव! तुझें पत्र वाचून मनाला अत्यंत समाधान वाटलें. तुझ्या पत्राची मी वाट पाहातच होतें. आणि योग्य वेळींच तें मला मिळालें. तुझें पत्र वाचण्याची उत्सुकता इतकी दुणावली होती कीं थट्टा करणाऱ्या चावट ×× च्या हातून तिला व कॉलेजातील इतर मुलींना एक चहापार्टी देण्याचें कबूल केलें तेव्हां तिनें मला तुझें पत्र दिलें. नाहीं तर तिनें मला सबंध दिवस दाद लागूं दिली नसती. तिला बिचारीला काय कल्पना!"

"तुझें पत्र वाचताना माझे डोळे वरचेवर भरून येत होते. आज नवीनच एक प्रकारचें समाधान तुझें पत्र वाचून वाटलें. असें पत्र तुझ्याकडून पहिल्यांदाच आलें. काहीं कांहीं वेळेस मनाच्या मूकवृत्तीनें दुसऱ्याच्या अंतःकरणांतल्या

भावना मंद बुद्धीच्या माणसांना कळत नसतात. त्यांपैकींच मी एक आहें. मला आतांपर्यंत असेंच वाटत होतें कीं तूं थोडासा मनाचा निर्दय आहेस. पण आजच्या पत्रानें माझी गैरसमजूत पार नाहींशी झाली. आपल्या थोड्याशा दुसऱ्याच्या कलाप्रमाणें वागण्याच्या प्रवृत्तीनें दुसऱ्याला किती समाधान होत असतें ह्याची जाणीव, माधव, तुझ्यासारख्या समजुतदार माणसाला तरी खास करून द्यायला नको आहे. पण मन राहात नाहीं ! इतकेंच. तुझ्या इच्छेप्रमाणें, रोगट भावनातिरेकवश मी होणार नाहीं. पण कोणीहि जरा गोड बोललें कीं, भुकेलेला कुत्रा धन्यानें दाखविलेला भाकरीचा तुकडा जसा शेपटी हलवीत हलवीत तोंडांत घेण्यास धावतो तशी माझी स्थिति पुष्कळ वेळां होते. त्यांत दोष कोणालाहि काढतां येणें शक्य नाहीं."

"माधव ! मागील पत्र जरा भावनावश होऊन लिहिलेलें होतें. त्यानें तुझ्या सदय अंतःकरणास दुखविलें काय ? मनुष्य विकाराच्या भरांत काय काय भरकटत सुटेल त्याचा नियम नसतो. तशी स्थिति त्यावेळेस माझी झाली होती."

"नवरा-बायकोच्या (जनदृष्ट्या हा शब्द वापरल्यास मला वाटतें तुझी हरकत होणार नाहीं) नात्यांत मित्र–मैत्रिणींच्या नात्यापेक्षा फार मोठी तफावत असते असें माझ्या अल्प बुद्धीला वाटतें. मित्रावर मैत्रिणीची जबाबदारी नसते. तिचा सहवास तितकाच गोड असतो, पण इतकें निकट सान्निध्य त्याच्यांत येत नाहीं. त्यामुळें वरील नवरा-बायकोच्या सहवासांतील परस्परांची आठवण वारंवार झाल्यास त्यांत नवल कांहींच नाहीं......माधव ! तूं मला फक्त त्रासच दिलास दुसरें सुख मला तुझ्यामुळें काहीं झाले नाहीं असें तूं समजूं नकोस. तूं मला त्रास दिलास तसा मींहि तुला दिला आहे. पण कांहीं वेळेस रात्रीं तूं माझ्याकडून 'सिंबेलाइन'[3] वाचून घेतल्यानंतर 'आता संपलें बाईसाहेब, या जवळ' म्हणून जवळ ओढून घेत होतास व त्या स्थितींत तुझ्या कुशींत मी किती तरी वेळ पडून राहात होतें. माधव, असा तुझ्याजवळ तुझी इच्छा

[3] 'गृहीतागमा' परीक्षेसाठीं पाठ्य पुस्तक म्हणून लावलेलें हें नाटक माधवराव लीलाबाईंना शिकवीत असत.

नसतांनाहि येण्याचा लहान मुलासारखा हट्ट मीं कितीदां केला. पण तो तूं पुरवलास. त्या वेळेस तूं जर 'तूं माझ्याजवळ आतां येऊं नकोस' असें म्हणाला असतास तर जास्त वाईट वाटलें असतें. हें सुख दिलेंस तें कांहीं कमी नाहीं. रात्रीं बेरात्रीं मीं तुझी ह्या माझ्या मूर्खपणानें झोंप मोडली आहे. आणि तूं जवळ घेतलें आहेस. रात्रभर तळमळणाऱ्या माझ्या आत्म्याला त्या वेळीं किती समाधान होत होतें ह्याची कल्पना तुला करून द्यावयाला पाहिजे काय? त्या वेळेत तूं माझा नवरा आहेस ही भावना कधींच मनांत आली नाहीं. तूं कोणी तरी परमेश्वरनिर्मित माझा आश्रयदाता आहेस असेंच वाटत होतें. तूं मला त्रास दिलास म्हणून रात्रभर चलबिचल झाली आणि म्हणून तुझ्या कुशींत मी आलें असें मला त्या वेळेस कधींच वाटलें नाहीं. आईच्या कुशींत जशी मुलगी शिरते तशी स्थिति माझी होत होती."

"हें बघ! वेड्यासारखें कांहीं तरी मनाला लावून घेऊं नकोस. तूं मला कांहीं त्रास दिला नाहींस. अगदींच ओळख नसलेलीं आपण दोन माणसें एकत्र आलों. तेव्हां आपलीं परस्परांचीं मतें समजून घेतांना असा त्रास होणारच. त्यांत तूं मला यत्किंचितहि दुखविलें नाहींस. खुळा कुठला!...... माझ्या राजा! तूं त्रास दिल्याची आठवण नाहीं मला होत. पण तुझ्या प्रेमळ सहवासाची होते. त्रास दिल्याशिवायहि एखाद्याबद्दल प्रेम उत्पन्न होणें शक्य नाहीं, हें मीं का तुझ्यासारख्या हुषार व विद्वान् माणसाला सांगायला हवें? मी अभ्यास करीत आहें. इतकें जरी आहे तरी मी कर्तव्याला माघार घेत नाहीं व घेणार नाहीं."

लीलाबाईच्या या पत्राला माधवरावांनी अत्यंत शांत व समाधान वृत्तीनें पुढीलप्रमाणें उत्तर धाडलें:

"माझें गेलें पत्र वाचून तुला समाधान होईल असें मला वाटलें होतेंच. मी निर्दय आहें असें तुला आजपर्यंत वाटत होतें — आणि होय, कित्येकदां जेव्हां इतर माणसें हटकून द्रवतात तेव्हा मी निर्विकार राहतों हें खरें आहे. पण माझ्या अंतःकरणात करुणेचा व भावनेचा सांठा इतका मोठा आहे कीं, माझी मलाच भीति वाटते! हक्क सांगून कुणी कांहीं मागूं लागला कीं झरा

आटतो आणि नाहींतर यःकश्चित् गोष्टीसाठीं व व्यक्तीसाठीं तो दुथडी भरून वाहूं लागतो. याच कारणानें मला मैत्रीचें महत्त्व विशेष वाटतें. मैत्रींत एकमेकाना एकमेकांचा आदर ठेवावाच लागतो. अतिपरिचयात् अवज्ञा सहज होऊं शकत नाहीं. शिवाय भावनेचा आविष्कार हा सात्त्विक भावानीं होण्यापेक्षां कृतीनीं व्हावा असें मला वाटतें तें यामुळेंच. तथापि तुझें मागील पत्र भावनावश होऊन लिहिलेलें होते म्हणून 'माझ्या अंतःकरणास दुःख झालें' असें मुळींच समजूं नकोस. मी तें तशाच संवादी भावनेनें वाचलें. परंतु चुटपुट लागून राहिल्यामुळें कर्तव्यें राहून जातात असें होत असलें, तर ती चुटपुट वा लागणी मला श्रेयस्कर व स्तुत्य वाटत नाहीं. मलाच पहा गैरसमजुतीमुळें तुझ्या येथील रहिवासात तुला जितकें सुखी करितां येणें शक्य होतें तितकें झालें नाहीं म्हणून हळहळ वाटते; परंतु मी नुसता रडतच बसलों तर तेवढ्यानें मागील कृति अकृत होत नाहीं आणि पुढील योग्य कृतीला मात्र खोळंबा होईल. तेव्हां हळहळत बसण्यापेक्षा मी तुला एखादें गोड पत्र लिहिण्यांतच हा काळ खर्च करीन. तूं जवळ असतीस तर 'ये बाळ!' म्हणून मीं तुला पोटाशीं धरिलें असतें. पूर्वीं तुझा आत्मा रात्रभर तळमळत असे तेव्हां तुझ्या डोक्यास शांति मिळेल असें कांहीं करण्यापेक्षां असमंजसपणानें मी एखादें व्याख्यान देत असें. आणि कांहीं प्रसंग तर असे असतात कीं तेव्हां अमोल उपदेशहि फोलच ठरतो. पण मी सुधारेन. तूं मात्र हळूहळू मला वागवून घेतलें पाहिजे. आतां तूं तुझ्या कर्तव्याला जोरानें सुरुवात केली आहेस हें वाचून किती बरें वाटतें सांगूं!"

याच सुमारास, फर्ग्युसन कॉलेजप्रकरणाला कारण झालेल्या मुलीचा विवाह कोल्हापुरातील एका गृहस्थांशीं जुळविण्याच्या खटपटींत ते होते. तिच्या आयुष्याला स्थिरता यावी, तिला सुस्थिति प्राप्त व्हावी अशी त्याची फार इच्छा होती. यासंबंधींची हकीकत त्यांनीं शंकरराव कानेटकर (गिरीश) यांस कळवून त्यांचा अभिप्राय विचारला होता. शंकररावांनीं तें पत्र लीलाबाईस दाखविलें. त्यानाहि त्यांच्या खटपटीची हकीकत ऐकून बरें वाटलें. त्याप्रमाणें त्यांनीं आपल्या पत्रांत माधवरावांना लिहिलेंहि. पण स्त्रियांची विशिष्ट मनोवृत्ति त्यांतून किंचित् डोकावलीच. त्यांनीं त्यांना लिहिलें: "तूं

करीत असलेली गोष्ट स्तुत्य आहे. परतु स्त्रियांचीं मनें स्त्रियाच जाणूं शकतात. ××× बाईना ××× कितपत पसंत पडतील ह्याची जरा मला शंकाच वाटते. त्यांतून झालें तर बिचारीचें कल्याण होईल. आणि मलाहि एका पोळलेल्या अंतःकरणाचें कल्याण झालें म्हणून अतिशय आनंद होईल. पुष्कळ वेळेस माझ्या मनात तुझ्याशीं माझेच लग्न व्हावें ह्यात ईश्वरेच्छा काय आहे, ह्याबद्दल गौडबंगाल वाटतें. त्यापेक्षा तिच्याशीं झालें असतें तर अधिक चागलें झालें असतें. माझें काय? ‘ असेल हरि तर देईल खाटल्यावरी ’ ह्या म्हणीप्रमाणें कल्याण झालें असतें. किंवा नसतेंहि. पण कसेंहि झालें असतें तरी तुझ्या-सारख्या ज्याला माझी परिस्थिति आजपर्यंत ठाऊक नव्हती त्याच्या तरी अंतःकरणाला सदोदित तळमळ लागून राहिली नसती. असो. तरी आपण सुखी होऊं, अशी माझी मनोदेवता मला सागते. जरी दोन अनोळखी परस्परांना न साजणारे असे जीव एकत्र आले असले तरी अंगांत जर ताकद असली तर अशाहि अयोग्य परिस्थितींत आपण आनंदात राहूं. तूं काळजी करूं नकोस. एकाद वेळेस तशी तुझ्या मनांत भीति जरी उत्पन्न होत असली तरी तशी होऊं देऊं नकोस. मी खंबीर आहें. ”

माधवरावांना लीलाबाईचें हें लिहिणें तितकेंसें रुचलें नाहीं; कदाचित् नवीन गैरसमज निर्माण होतील असेंहि त्याना वाटलें असावें. त्यानीं त्यांना त्यावर लगेच लिहिलें :

“ मीं शंकररावांना लिहिलेलें पत्र त्यांनी तुला वाचावयाला दिलें व तें तूं वाचलेंस या दोन्ही गोष्टी चागल्या झाल्या. तुला मी नुकतेंच पत्र लिहिलें होतें, नाहींतर त्या दिवशीं माझ्या मनात जी विचाराची धुमश्चक्री चालली होती तिची तीव्रता तुलाच पत्र लिहून कमी केली असती. कित्येक वेळा मित्र कांहीं करूं शकत नाही; पण गैरसमजाची भीति न राहतां पोट-उकाला करायला मिळतो व त्यामुळें हलकें वाटतें हा काय कमी फायदा आहे? मला तिचें उत्तर आलें आहे; पण तें निराशाजनक तरी नाही. रा. ××× हे तिला आवडावेतच असा माझा आग्रह नाहीं, पण तिला परिस्थिति कळून ती सुधारण्याची संधि मिळाल्यास ती मिळवून देणें हें माझें कर्तव्य आहे. या बाबतींत तूं लिहितेस कीं, ‘ त्यापेक्षां तिच्याशीं झालें असतें, तर अधिक

चांगलें झालें असतें, माझें काय ?' असें तूं कां लिहावेंस ? मला तसें वाटत नाहीं, अजून वाटत नाहीं. तिला आरंभीं समाधान वाटलें असतें यांत शंका नाहीं, परंतु हें समाधान फार दिवस टिकलेंच नसतें आणि मग ?—माझें तिच्यावर प्रेम असलें, तरी तिला तें ज्या प्रकारचें असावें असें वाटलें असतें, तसें नसल्यामुळें तिला असमाधान वाटून त्याची तीव्रता हक्काच्या जाणीवीनें उलट वाढली असती. माझ्या अंतःकरणाला लागून राहिलेली तळमळ तुला वाटते तशा प्रकारची नाहीं. मला केव्हां केव्हां वाटतें कीं मी खरोखरीच इतर लोकांहून भावनांच्या बाबतींत वेगळा आहें. हवें तर विक्षिप्त आहें असेंहि म्हण. तथापि 'आपण सुखी होऊं' असें ज्याप्रमाणें तुझी मनोदेवता सांगते त्याचप्रमाणें माझीहि सांगते. लग्नाच्या पूर्वी तुला एकहि क्षण सुखाचा गेला नाहीं असें तूं लिहितेस, अर्थात् लग्नानंतर कांहीं तरी घटिका सुखाच्या गेल्या असतील. त्याचें थोडें तरी श्रेय माझ्या वांट्याला येणार हें पाहून मला धन्यता वाटते, तथापि माझ्या उतावीळपणामुळें, मीं तुला जितक्या हळुवारपणानें वागवायला हवें होतें तितक्या हळुवारपणानें वागवूं शकलों नाहीं याचें वाईट वाटल्यावांचून राहात नाहीं."

लीलाबाई हें पत्र वाचून निःशंक झाल्या आणि थोडेंसें खुशींतच येऊन त्यांनीं खेळकरपणानें माधवरावांना लिहिलें: "हें बघ, आतां तुला 'हळुवारपणानें' मला वागवितां आलें नाहीं म्हणून वाईट वाटत असेल तर संधि येतेच आहे,[४] उगीच वाईट वाटून घेऊ नकोस. तूं पुण्याला लवकर ये म्हणजे मग आपण त्याचें उट्टें जरूर काढूं ...... लग्न झाल्यानंतर जे कांहीं थोडेसे सुखाचे क्षण गेले त्याला तूंच कारण आहेस, पण त्याची शाबासकी मीं द्यायची का आपणच आपली पाठ थोपटून घ्यावयाची ! महाराज ! हा बरा दिसतो आहे आपला रोजगार !"

माधवराव हे, विवाहबंधन हे शुद्ध स्नेहात बिघाड आणते; विवाहामुळें पतिपत्नींत प्रेम व आदर याची उत्कटता उत्पन्न होण्याऐवजीं सत्ता व हक्क यांच्या जपणुकीचीच उत्कटता अधिकाधिक वाढूं लागते; मित्र-मैत्रिणीच्या

[४] दिवाळीची सुट्टी लवकरच पडावयाची होती.

सहवासांतील निरागस आनंदाची अवीट मौज चाखणें अशक्य होतें; अशा विचारसरणीचे होते. हक्क सांगणारें, सत्ता गाजविणारें प्रेम तें प्रेमच नव्हे, असें त्यांचें म्हणणें असे. ते परिचयोत्तर विवाहाचे पुरस्कर्ते होते. ते म्हणत: "स्त्री-पुरुषांनीं एकत्र येऊन संसार थाटणें हें जितकें स्वाभाविक आहे, तितकेंच त्यांनीं परस्परांवर आधीं अनुरक्त व्हावें हें स्वाभाविक आणि अवश्य आहे. प्रेमाचें पर्यवसान परिणयांत होणें म्हणजेच सौभाग्य होय. प्रेमावांचून संसार म्हणजे तडजोडीचा रुक्ष व्यवहार होय. प्रेम हें संसाराचें मीठ आहे."

दिवाळीच्या सुट्टींत ते जेव्हां कोल्हापुराहून पुण्यास आले तेव्हां त्यांची मनःस्थिति बरीच निवळलेली होती. लीलाबाईहि वडिलाच्या सान्निध्यांत, त्यांजकडून वारंवार मिळत असलेल्या व्यावहारिक सल्ल्यामुळें, गोंधळलेल्या मनःस्थितींतून बाहेर येत होत्या. आणि त्यामुळें दोघेंहि पुन्हा एकत्र येतांच कोल्हापुरांतील त्या उदासवाण्या विचारांना दूर लोटून उल्हसित वृत्तीनें वागूं लागलीं. स्नेह्यांच्या भेटीगांठी, सहली, चांदण्या रात्रींतील 'कविकातळा'वरील बठकी, पाहुण्यांचा परामर्श यांत उभयतां रंगून गेलीं. त्यांचे हे दिवस रम्य शांततेंत चाललेले होते. अशाच एका दिवशीं मुळा-मुठेवर मोहनराव शहाणे, गिरीश व लीलाबाई यांसह ते नौकाविहारास गेले असतां सर्वांनीं गाणीं म्हटलीं. त्या प्रशान्त समयीं लीलाबाईच्या गोड गळ्यांतील भावनापूर्ण गाणें ऐकून ते मुग्ध झाले. जुन्या काव्यात्म काळांतील त्यांच्या सुखद स्मृति जाग्या झाल्या आणि सखीच्या आणि स्नेह्यांच्या सहवासांत असाच सान्ध्यसमय घालविण्याचीं आपलीं जुनीं स्वप्नें प्रत्यक्षांत अनुभवावयाला मिळालेलीं पाहून त्याना अतीव आनंद झाला आणि पुढील 'नौकासंगीत'[५] त्यांना स्फुरलें.

---

[५] ही कविता 'स्वप्नरंजनां'त 'नावेंतील गाणें' या नांवानें मुळांत बरीच सुधारणा करून छापली आहे. येथें दिलेली कविता ता. ७ नोव्हेंबर, १९२८ रोजीं त्यांनीं जशी लिहिली तशीच दिली आहे. रा. वि. म. यांस ता. १२ नोव्हेंबर रोजीं धाडलेल्या पत्राबरोबर त्यांनीं ही नकलून पाठविली होती. आपले श्वशुर बाबासाहेब गरुड यांनाहि त्यांनीं ही कविता त्या वेळेस धाडून

काय गाउं मी ? कुठली काय रागदारी ?
तूंच बसुन नाळावर गा गीत कष्टहारी ॥ ध्रु० ॥
कुठें चारु संस्कृति ललिता, ब्रह्मसुता राणी,
कर्णधार कष्टकरी हा कुठें मी अडाणी !
गात रहा वागीश्वरि तूं तरल भावगाणीं,
भरुन टाक छत सूरांचें नील छतीं भारी. १

स्वर्णसलिल चुंबित हासे दूर ती प्रतीची,
लीन शांत होउन जाती सरित्सलिल वीची
लीन शांत त्यांतच झाडी होय दो तटींची
सांजदीप उजळे गगनीं, मार वर भरारी. २

गान हेंच जीवन तूझें शांत हवेमाजीं,
सहज तुझी नौकायानीं लहर फिरे आजी,
आणि पुरामाजीं कितिदा नाव पडे माझी,
ताल धरित तूज वल्ह्यांनीं नेइं मी किनारीं. ३

लीलाबाईंनीं गाण्याचा जरी शास्त्रोक्त अभ्यास विशेषसा केलेला नव्हता, तरी त्या गाणीं फार मधुर म्हणत. ताबे यांच्या कविता, विशेषतः 'घन तमीं शुक्र बघ राज्य करी,' 'वाटलें, नाथ हो, तुम्हीं उतरतां खालीं' या कविता त्या इतक्या तन्मयतेनें म्हणत कीं, त्या ऐकणाऱ्याचें चित्त हरपून तल्लीनच व्हावें. माधवरावाचे गजलहि त्या स्वतंत्रपणें चाली लावून, आपल्या साऱ्या भावना त्यात एकवटून गात. त्याच्या श्रवणानें माधवरावाचे डोळे तरारून येत. अगदीं निकटवर्ति मंडळींतच त्या गात. कवीची गाणारी पत्नी म्हणून मिरविण्याची हौस त्यांना नव्हती. अंतर्यामीं त्या त्यांच्या पूजक होत्या, त्यांच्या कवितांचें त्यांचें गायन स्वतःचे व स्वतःला पूज्य वाटणाऱ्या व्यक्तीचें मन रिझविण्यापुरतेंच असे.

---

लिहिलें होतें : "It is gratifying to see how you like it, for I like it immensly myself. I wish I had written a century of such beautiful lyrics."

## नव्या पर्वाला प्रारंभ

लीलाबाई ह्या वरवर पाहणाऱ्यांना कुढ्या मनाच्या व आत्मकेंद्रित वाटत, पण वस्तुतः त्या तशा नव्हत्या. अंतःकरणाच्या अतिशय हळव्या, कनवाळू व प्रेमळ, आणि मनाच्या धीर व संयमी होत्या. त्यांचें बाल्य व कुंवारपण कांहींसें दाबांत व परावलंबी स्थितींत गेलें असल्यामुळें, निसर्गतः त्यांची वृत्ति मोकळी असूनहि कसल्या तरी बंधनांत अडकल्यासारखी वाटे. त्यांच्या नजरेंत कित्येकदा कारुण्य आणि असहायता यांचें चमत्कारिक मिश्रण आढळे. पण तें असफल इच्छांचें दर्शक नव्हतें, तर माधवरावांबद्दल वाटणाऱ्या कारुण्याचें व त्यांची मनःस्थिति कळत असूनहि त्यांच्याशीं समरस होऊन सहकार्य करण्याच्या बाबतींतील स्वतःच्या असमर्थतेचें द्योतक होतें. माधवरावांच्या लहरी स्वभावामुळें प्रारंभी त्या संभ्रमांत पडल्या खऱ्या पण त्यांच्याशीं त्यांचा सहवास जसजसा अधिकाधिक वाढत गेला, त्यांच्या जिव्हाळ्याच्या स्नेह्यांची त्यांच्याशीं असलेली वागणुक त्यांना जसजशी पाहावयाला मिळूं लागली तसतसें आपलें वैवाहिक जीवन सुखी होण्यासाठीं आपली वृत्ति कोणत्या प्रकारची बनली पाहिजे याची नीट कल्पना त्यांना येऊं लागली. मला त्यांनीं एकदा कोल्हापुराहून लिहिलें होतें: "त्यांचा स्वभाव समजून घेण्याचा आटोकाट प्रयत्न मी करीत आहें. स्वतःच्याच विचित्र स्वभावामुळें मी स्वतःच कांहीं कांहीं वेळेस चमत्कारिक वागतें, आणि स्वतःला त्रास करून घेतें. पण आतां मी जरा शहाणपणानें वागणार आहें...... येथे आम्ही सध्यां हांसून खेळून दिवस काढीत आहोंत. मजेंत आहोंत. आम्ही दोघेंहि दुःखी तर खास होणार नाहीं अशी माझी पक्की खात्री आहे. प्रथम हे असे गैरसमजुतीचे खेळ व्हावयाचेच. आणि ते माधवरावांच्या बाबतींत झाले नसते तरच नवल. पण आजन्म दुःखी तर होणार नाहींच." हें पत्र एरंडवण्याच्या वसतिगृहात राहून 'गृहीतागमा' ही पदवीपरीक्षा उत्तीर्ण झाल्यावर लिहिलेलें आहे. १९२८ तील त्यांच्या वृत्तींत आता कसा हळूहळू पालट घडून येत होता हें यावरून दिसतें.

लीलाबाई १९२८च्या ऑक्टोबर महिन्यात जेव्हा माहेरीं गेल्या तेव्हा माधवरावांनीं १९२७ सालीं, पुण्यास असताना मूळ फार्सीवरून तयार केलेलें उमर खय्यामकृत रुबायांचें भाषांतर पक्कें लिहून काढण्याचें काम हातीं घेतलें.

मनाला गुंतवून ठेवावयाला त्यांना कांहीं तरी उद्योग हवाच होता. हें भाषांतर, मुंबईतील उमर खय्यामचे एक भक्त जमशेदजी एदलजी सकलातवाला यांच्या आग्रहामुळें माधवरावांनीं हातीं घेतलें. मुंबई विद्यापीठांतील फार्सी भाषेच्या परीक्षकांपैकीं एका पारशी परीक्षकानें या गृहस्थांशीं त्यांची ओळख करून दिली होती. सकलातवाला हे युयुक्षुवादी (मिस्टिक) वाङ्मयाचे भोक्ते असून उमर खय्यामचे विशेष भक्त होते. एतद्विषयक ग्रंथांचा त्यांचा संग्रहहि मोठा होता. उमर खय्यामच्या रुबायांचीं अनेक भाषांतील भाषांतरें व त्यांच्या विविध आकारांच्या व बांधणीच्या प्रति त्यांच्या या संग्रहांत आढळत. या गृहस्थांच्या आयुष्याचा सायंकाळ सुरू झाला होता. तरी ग्रंथ गोळा करून संग्रह करण्याचा त्याचा नाद एखाद्या छांदिष्ट तरुणालाहि लाजवील इतका उत्कट होता. एक नोकर व आपण असे हे एखाद्या वानप्रस्थासारखे राहात. ग्रंथवाचन हाच त्यांचा आयुष्यांतील विरंगुळा असे. मी एकदा माधवरावांबरोबर या गृहस्थांकडे गेलों होतों. एका एकमजली छोट्या बंगलींत ते राहात. पहिल्या मजल्यावर त्यांच्या खास बैठकीची जागा असे. या बैठकीकडे जाणाऱ्या जिन्याच्या पायऱ्या जेथून सुरू होत तेथूनच भिंतीला लागून याच्या पुस्तकाच्या कपाटांना प्रारंभ होई. बैठकीच्या जागेत चारी बाजूंना पुस्तकें आणि दुर्मिळ चित्राचे संग्रह काळजीपूर्वक रचून ठेवलेले आढळत. मी अनेक ग्रंथशौकीन पाहिलेले आहेत, पण या गृहस्थाइतका पद्धतशीर रीतीनें ग्रंथ जमवून त्यांचा संग्रह व त्यांचें संरक्षण करणारा ग्रंथशौकीन, नव्हे ग्रंथवेडा, तत्पूर्वी तरी पाहिला नव्हता.

उमर खय्यामच्या रुबायांचें हें भाषांतर पदरचा पैका खर्च करून प्रसिद्ध करण्याइतकें अगत्याचें आहे असें माधवरावांना वाटलें नव्हतें. सकलातवाल्यांनीं द्रव्यसहाय्य करण्याचें आश्वासन दिल्यामुळेंच ते या उद्योगात पडले. भाषांतर त्यानीं पाऊण महिन्यात पुरे केलें. तदनंतर 'निरनिराळया आवृत्त्या पाहून पाठभेदांतून निवड करून भाषांतर मूळाशीं अधिकाधिक धरून सरस व प्रसन्न करण्याचें काम सुरू झालें. शिवाय सर्व रुबायांचा अर्थानुसार अनुक्रम लावणें अगत्याचें वाटलें. या साऱ्या किचकट कामानें मात्र वर्ष खाल्लें.' मुद्रणप्रत तयार होतांच ते सकलातवालांना भेटले. आपल्या आश्वासनाप्रमाणें त्यांजकडून द्रव्यसहाय्य मिळेल अशी त्यांची अपेक्षा होती. पण त्यांनीं कांहीं प्रति विकत

घेण्यापलिकडे, आपल्याकडून कांहीं अधिक उत्तेजन मिळण्याची शक्यता नाहीं असें सांगितलें. माधवराव सर्दच झाले. एखादे स्वतंत्र विषयावरील लेखनाचें काम हातीं न घेतां पैका किंवा प्रसिद्धि यापैकीं कशाचाहि लाभ होण्याची शक्यता नसतां, केवळ एका उमर खय्यामभक्ताच्या आग्रहाखातर व स्वतःचीहि थोडीशी हौस म्हणून एवढे कष्ट केले, ते वाया जाण्याची वेळ आली. पुस्तकाच्या प्रकाशनाची काय व्यवस्था करावयाची याचा प्रश्न आतां उभा राहिला. त्यांनीं ‘ इंदूर ग्रंथोत्तेजक मंडळा ’कडे त्याच्या ‘ होळकर ग्रंथमालें ’तून पुस्तक प्रसिद्ध होऊं शकेल किंवा काय यासंबंधीं चौकशी करून पाहिली. त्यांजकडून नकार आला. त्याचे स्नेही, आर्यसंस्कृति मुद्रणालयाचे धनी डॉ. वासुदेवराव पराजपे यांचे कानावर, ही गोष्ट जातांच त्यांनीं त्याच्या प्रकाशनाची जबाबदारी आपल्यावर घेऊन, तें १५ ऑगस्ट, १९२९ रोजीं प्रसिद्ध केलें.

फिज्जेरल्डच्या इंग्रजी रुबाया वाचून उमर खय्यामबद्दल प्रेम निर्माण झालेल्या रसिकांना हें भाषांतर विशेषसें आवडलें नाहीं. फिज्जेरल्डच्या रुबायातील रस त्यांना यांत आढळेना. यावर माधवरावाचें म्हणणें असें कीं, मूळ रुबायाच तशा आहेत. “ शब्दशः पाहिल्यास अगदींच शिथिल, पण स्वतंत्र वाचल्यास अभिनव, सरस व चटकदार असें फिज्जेरल्डनें भाषांतर तयार केलें. रस काढून घेऊन चोथा त्यानें टाकून दिला. मूळातील भावनेचा आभास वा अभाव याच्याऐवजीं शांतिल करुणरसाची त्यानें योजना केली आणि मूळातील केवळ चमत्कृतिजनक अशा अनुप्रासश्लेषादि अलंकारांच्या ठिकाणी त्यानें अर्थगांभीर्य, नादगौरव आणि अंधुक व्यंजना यांची स्थापना केली. त्याच्या कांहीं रुबायांना मूळात आधारच नाहीं. कांहींत हाफिझ् वगैरे कवींचे प्रतिध्वनि आहेत.......प्रतिभेची किमयाच अशी आहे कीं, तिच्या हातगुणानें मूळातील हीन पितळाचें बावनकशी सोनें व्हावें. फिज्जेरल्डची कृति वाचून जी एक सुखकरुण काव्यमय संवेदना होते ती फार्सी मूळ वाचून मुळींच होत नाहीं. ” माधवरावांच्या या मताप्रमाणेंच या काव्याच्या संशोधकांचेहि मत आहे. पण सर्वसामान्य रसिक इतक्या खोलांत जाऊं इच्छित नाहीं आणि त्याला त्याची जरूरीहि नसते. उमर खय्यामच्या काव्याचें मूळ स्वरूप जाणून घेण्याची उत्सुकता तत्त्वज्ञानाचा तुलनात्मक अभ्यास करणाऱ्या कांहीं ठराविक लोकांनाच असणार.

माधवरावांचा हा भाषांतराचा उद्योग प्रसिद्धि किंवा पैका या दोन्ही दृष्टींनीं अयशस्वी ठरला. मात्र या पुस्तकास 'ज्या डेक्कन व्हर्नाक्युलर ट्रान्सलेशन सोसायटीला विरहतरंग, सुधारक हीं काव्यें पुरस्कारार्ह वाटली नाहींत, तिनें खानबहादुर प्रो. शेख अब्दुल कादिर सर्फराझखान यानीं या भाषांतरावर उत्तम अभिप्राय दिल्यामुळें पारितोषिक दिलें.'

कोल्हापुरातील १९२८–२९ हा माधवरावांचा काल लेखनाच्या दृष्टीनें असा तसाच गेला, असें म्हटलें तरी चालेल. लेखनसुधारणेसंबंधीं त्यानीं बराच काळ चिंतन करून आपले कांहीं विचार निश्चित केले होते, ते 'शुद्धलेखनविचार,' 'बा. अ. भिडे व लेखनसुधारणा,' 'शीर्षबिन्दु का परसवर्ण?' या लेखांत त्यांनीं मांडले; त्या व्यतिरिक्त 'उमर खय्याम'वर दोन लेख; 'स्वतंत्र, रूपांतर आणि भाषांतर' हा निबंध आणि गोपीनाथ तळवलकर यांच्या 'दुर्वांकुर' या कवितासंग्रहाचें परीक्षण, असें संकीर्ण लेखन झालें. कवि रेंदाळकर यांची अखेरची जीवनयात्रा आठवून त्यानीं 'सर्वा खल्विदं माया!' ही प्रसिद्ध कविता याच कालांत (६ जानेवारी, १९२९) लिहिली. रेंदाळकरांच्या रेंदाळ या गांवीं जाऊन, त्यांनीं ज्या घरीं आपला देह ठेविला, तें घर पाहावें व तेथेंच राहात असलेल्या त्यांच्या दोन मुलींना भेटून त्यांचा कुशलसमाचार घ्यावा असें त्यांच्या मनात एकदा आलें. त्याप्रमाणें ते तेथें गेले असतां, रेंदाळकरांच्या आप्तांनीं व त्यांच्या मुलींनीं त्यांचे यथोचित स्वागत केलें. ज्या खोलींत व ज्या पलंगडीवर रेंदाळकरानीं आपला देह ठेविला, त्या खोलींत जाऊन ते त्या पलंगडीवर बसले. रेंदाळकरांचा सारा जीवनपट त्यांच्या डोळ्यांपुढून सरकूं लागला. ते सद्गदीत झाले. रेंदाळकरानीं आपल्या शेवटच्या दिवसात लिहिलेल्या कवितेंतील 'अजुनि चालतोंचि वाट! माळ हा सरेना! विश्रान्तिस्थळ केव्हां यायचें कळेना!' या पद्यपंक्ति त्यांच्या कानात घुमूं लागल्या. ते अस्वस्थ झाले. त्यांचें अंतःकरण करुणेनें आणि सहानुभूतीनें भरून गेलें. त्यांच्यांत सहकंपना निर्माण झाली आणि त्यांनीं तेथल्या तेथेंच "नादावुनि केलें मी भ्रमण किती अहो तें! विश्रांतिस्थळ अंतीं हेंच हाय होतें!" या पद्यपंक्तींनीं प्रारंभ होणारी 'सर्वा खल्विदं माया' ही कविता रचली.

## नव्या पर्वाला प्रारंभ

१९३० सालच्या जानेवारी महिन्यांत धारवाड येथें तेथील कर्नाटक कॉलेजच्या मराठी वाङ्मयमंडळाच्या वार्षिक सम्मेलनाचे अध्यक्ष म्हणून ते गेले असतां, त्यानीं तेथें दोन व्याख्यानें दिलीं. एका व्याख्यानात त्यानीं तांबे यांच्या कवितेचा परिचय करून दिला व दुसऱ्या व्याख्यानात आधुनिक मराठी कवितेचा इतिहास सागून काहीं स्वतःच्या व काहीं इतरांच्या कविता वाचून दाखविल्या. याचा परिणाम असा झाला कीं, 'तांबे यांच्या कवितासंग्रहाच्या सहा प्रती खपल्या'; शहरांतील कांहीं मराठी वाङ्मयप्रेमी मंडळीशीं ओळखी झाल्या; नवीन सहानुभूति उत्पन्न झाली. महाराष्ट्राबाहेरील स्वभाषाबांधवास भेटण्याचा व त्याच्याशीं विश्रंभालाप करण्याचा योग आल्याबद्दल व त्यांचीं मराठीविषयींचीं मनोगतें समजून घेण्याची संधि मिळाल्याबद्दल त्यांना फार आनंद झाला. स्वभाषा व वाङ्मय यासंबंधींची महाराष्ट्राबाहेरील मराठी भाषिकाची सहानुभूति, मराठी साहित्यिकांनीं व्याख्याने, काव्यगायनें, साहित्यसंवाद याद्वारा सतत जागृत ठेवणें किती अत्यावश्यक आहे याची जाणीव त्यांना येथें तीव्रतेनें झाली. आणि त्यांनीं स्वतःपुरता एक विचार निश्चित करून टाकला कीं, ज्या ज्या वेळीं महाराष्ट्राबाहेर प्रवास करण्याची संधि आपल्याला येईल त्या त्या वेळीं स्वभाषाविषयक कर्तव्य म्हणून महाराष्ट्रीय मंडळींत मिसळून, जेथें जशी परिस्थिति असेल त्याप्रमाणें ह्या कार्यक्रमाची बजावणी करावयाची. पुढील आठ वर्षांत त्याप्रमाणें ते वागलेहि. ते जेथें जेथें जात तेथें तेथें

**जरी मान्यता आज हिंदीस देई उदेलें नवें राष्ट्र हें हिंदवी,**
**मनाचे मराठे मराठीस ध्याती हिची जाणुनी योग्यता, थोरवी;**
**असूं दूर पेशावरीं उत्तरीं वा असूं दाक्षिणीं दूर तंजावरीं,**
**मराठी असे आमुची मायबोली, अहो ज्ञानदेवीच देखा खरी.**

या जाणीवेची जागृती निर्माण करीत.

माधवरावांत आतां हळूहळू स्थित्यंतर घडून येत होतें. एके काळीं हृदयाचे चोचले पुरविणारे लहरी माधवराव मराठी भाषेचे एक ध्येयवादी खंबीर पायिक व निष्ठावंत प्रचारक बनत चालले होते. स्वप्नसृष्टींतून ते सत्यसृष्टींत वावरूं लागले

होते. स्वभाषेसाठीं कांहींतरी निश्चित विधायक कार्य करण्यासाठीं त्यांचें यापुढील प्रत्येक पाऊल पडत होतें. त्यांच्या काव्याचे चाहते त्यांना म्हणूं लागले कीं, " माधवराव, हें तुम्हीं काय आरंभलं आहे ? तुमच्या हृदयांतील प्रेमाची हिरवळ एकदम कशानें वाळली ? आम्हांला तुमच्या प्रणयसतारीच्या गति नित्य ऐकूं द्या. " पण या चाहात्याना काय ठाऊक कीं, माधवरावांनीं प्रणयाला आतां कायमची गति दिली होती आणि स्वभाषेचें वैभव व सामर्थ्य कसें वाढेल याचा एकच एक ध्यास त्यानीं लावून घेतला होता ! प्रणयगीतांकडे पाठ फिरवून ते जरी पाण्डित्याकडे वळूं लागले होते, तरी त्याच्यातील काव्य लुप्त झालेलें नव्हतें, त्याचे विषय व त्याचें स्वरूप फक्त बदलत चाललें होतें. वैयक्तिक लागणींचीं गीतें आता थाबलीं होती. प्रमदेचा प्रणय आळविण्यापेक्षां रसरसलेल्या प्रतिभेनें ' पुरुषार्चा छाती ' वर्णन करण्यात त्यांना धन्यता वाटत होती. " स्त्री-पुरुषसहवास हा विषय कितीहि रम्य असला तरी तो म्हणजे काहीं सारा संसार नव्हे. प्रीतीस पराक्रमाची जोड पाहिजे, कष्टाळू उत्साहाचीं, दुर्दम्य झुंजार विजिगीषेचीं स्फुरितें पाहिजेत, " असें ते म्हणूं लागले होते.

# १३

# काव्यचिकित्सा व छंदोरचना

‘छंदोरचना’ प्रसिद्ध होऊन तीन वर्षे झालीं होतीं. ग्रंथाला आश्रयहि चांगला मिळत होता. विद्वानाचें, त्याचप्रमाणें कविजनांचें त्याबद्दल उत्तम मत बनलें होतें. पण माधवरावाना त्याबद्दल समाधान वाटत नव्हते. ग्रंथांत अनेक उणीवा राहून गेल्याचें त्याना दिसत होतें. ‘प्राकृत पैङ्गलाचा उपयोग करून घेण्यांत आला असला तरी प्राचीन संस्कृत छंदःशास्त्रकारानीं वृत्ताची चर्चा कशी केली आहे आणि संस्कृत कवींनीं त्यांची संभावना कशी केली आहे, याचा विचार करण्यात आलेला नव्हता. पुन्हा जाति आणि छंद यात आढळणारी आवर्तनात्मकता वृत्तांत कोठें आणि कशी आढळते याचाहि शोध घेण्यात आला नव्हता.’ यासाठीं त्यानीं पुन्हा या विषयाच्या अभ्यासाला सुरुवात (१९३०) केली. भरत-पिंगलादि संस्कृत छंदःशास्त्रकारांचे ग्रंथ अभ्यासून, संस्कृत व मराठी वाङ्मय डोळयांखालीं घालून नवीन सामग्री मिळविण्यास त्यांनीं प्रारंभ केला. साहजिकच आधुनिक मराठी कविताहि त्याजकडून बारकाईनें वाचली जात होती. या त्यांच्या वाचनाचा फायदा कवि व काव्यरसिक यांस देतां आल्यास, काव्यचिकित्सेच्या दृष्टीनें, तो उपयुक्त होईल असें मला वाटूं लागलें. त्या वेळेस, मुंबईस प्रा. त्र्यंबक शंकर शेजवलकर यांच्या संपादकत्वाखालीं ‘प्रगति’ नांवाचें साप्ताहिक नुकतेंच सुरू झालें होतें. त्या पत्राच्या वाङ्मयविभागाचें संपादन मजकडे असे. या पत्राच्या लेखकवर्गात त्यावेळच्या अनेक नवोदित साहित्यिकास मीं ओढलें होतें. माझे जवळ जवळ सर्व साहित्यिक स्नेही या पत्रांत लिहीत. माधवरावांचेंहि लेखन ‘प्रगति’च्या प्रथमांकापासूनच त्यांत येऊं लागलें होतें. माधवरावाना माझी काव्य-चिकित्सात्मक लेखमालेसंबंधींची कल्पना पसंत पडली आणि त्यांनीं ३१ जुलै,

१९३० च्या 'प्रगति'च्या अंकांत कवि यशवंत यांच्या 'न्याहरीचें गाणें' या कवितेवर चिकित्सात्मक लेख लिहून, या मालेला प्रारंभ केला. या लेखमालेला 'काव्यचिकित्सा' असें नाव देण्यात आलें होतें. ही लेखमाला लिहिण्यातील आपला हेतु माधवरावांनीं पुढीलप्रमाणें निवेदन केला होता: "अलीकडे मराठी कवितेला बरीच लोकप्रियता मिळाली आहे. रसाळ कवितेचा खप हळूहळू वाढत आहे. पंडिती दोषैक दृष्टि निवळली असेल पण रसिकाची वृत्ति चिकित्सक राहिली नाहीं. किंबहुना जो चिकित्सक तो रसिकच नव्हे, अशी एक भ्रामक समजूत पसरलेली दिसते. ज्याप्रमाणें न्याय आणि दया हीं एकत्र असूं शकतात, त्याचप्रमाणें रसिकता आणि चिकित्सकपणा हींहि एकत्र असावयाला कांहीं प्रत्यवाय नाहीं. रसिकता नष्ट न होता चिकित्सकपणा टीकेंत यावा म्हणून मधून मधून कांहीं प्रसिद्ध भावगीतांचें सविस्तर परीक्षण करावयाचें आम्हीं योजिलें आहे. परीक्षणासाठीं जीं भावगीतें आम्ही घेणार आहों, तीं आम्हांलाहि अत्यंत आवडतात म्हणूनच आम्ही घेणार आहों. तेव्हा त्या बाबतींत वाचकांनीं व विशेषतः कवींनीं गैरसमज करून घेऊं नये, अशी त्यांस आरंभीं सविनय विज्ञापना आहे.

काव्यचिकित्सेसाठीं त्यांनीं पुढील दहा भावगीतें निवडलीं होतीं. यशवंतकृत 'न्याहरीचें गाणें', टिळककृत 'पाखरा, येशिल का परतून ?', गिरीशकृत 'शूर्पणखा', तांबेकृत 'रुद्रास आवाहन', प्र. के. अत्रेकृत 'परिटा, येशिल कधिं परतून ?', दत्तकृत 'विश्वामित्रीच्या कांठीं', अज्ञातवासीकृत 'सरदार धन्य एवढा', केशवसुतकृत 'हरपलें श्रेय', मायदेवकृत 'गाई घरा आल्या', केशवसुतकृत 'झपुर्झा'. 'प' या टोपण नांवानें ही लेखमाला प्रसिद्ध झाली.

काव्यचिकित्सेचा हा प्रकार नवीनच होता. काहींना तो रुचला नाहीं. प्रो. वामन मल्हार जोशी यांनीं या मालेबद्दल प्रशंसापर उद्गार काढले होते. प्रारंभीं प्रारंभीं वाचकांकडून चिकित्साविषय बनलेल्या कवितेवर रसग्रहणात्मक बरीच चर्चा झाली. विशेषतः 'पांखरा येशिल का परतून ?' व 'शूर्पणखा' या कवितांवरील लेखांवर तर खूपच चर्चा झाली व ती चांगली रंगलीहि. या चर्चेंत भाग घेणाऱ्यांत प्रा. पंगू, कवि बोरकर, कवि गिरीश, बा. कृ. गलगली, स. ह. मोडक, अ. तु. वाळके, रा. स. शिरवलकर, प्र. कृ. प्रधान,

गो. ह. मंगरूळकर, अ. ह. कडणे, इत्यादींचीं नावें आढळतात. या लेखमालेवर कांहींजणांकडून, लेखक 'विद्वत्तेचें गैरवाजवी प्रदर्शन करीत आहे,' 'कवीवर स्वतःच्या डोक्यांतून काढलेल्या अर्थाचा विनाकारण आरोप करीत आहे,' अशा तऱ्हेचेहि आक्षेप घेण्यांत आले. माधवरावांनीं या आपल्यावरील आक्षेपांस पुढीलप्रमाणें उत्तर दिलें होतें: "काव्यचिकित्सा म्हणजे विद्वत्तेची कसरत नव्हे आणि निवडून काढलेलें भावगीत म्हणजे केवळ त्या पांडित्यप्रदर्शनासाठीं पुढें केलेलें निमित्तहि नव्हे. काव्यरसाची साधारण माधुरी कुणालाहि चाखतां येते; परंतु तौलनिक काव्यचिकित्सा म्हटली कीं, पांडित्य ओघानेंच येतें. मंजुळ गायन कुणालाहि गोड लागतें आणि ते गोड लागायला विद्वत्तेची, संगीतशास्त्राच्या ज्ञानाची जरूरी नाहीं. ज्यांना गाणें कळतें अशा लोकांत गाण्याची चर्चा होऊं लागली कीं, सामान्य जनांना दुर्बोध वाटणाऱ्या पारिभाषिक शब्दांचे प्रयोग होणें म्हणजेच पर्यायानें पांडित्यप्रदर्शन होणें हें अपरिहार्यच होतें. कलाकृतीपासून थोडा तरी आनंद ग्रहण करण्याची शक्ति प्रत्येक मनुष्यांत उपजतच असते. ही सुसंस्कृत होण्यास, नवीन नवीन कृतींतील आनंद उपभोगण्यास समर्थ होण्यास या पंडिती चर्चेचा उपयोग होतो. असा विकास होण्यास मदत व्हावी, आणि काव्यपरीक्षणसमयीं उद्भवणाऱ्या अनेक संशयीभूत मुद्द्यांची साधकबाधक चर्चा व्हावी म्हणूनच ही माला सुरू करण्यांत आलेली आहे."

"रसज्ञता व पांडित्य हीं एकत्र असूं शकत नाहींत असा एक समज प्रचलित आहे. पंडित म्हटला कीं, कुणी प्रौढ, उल्लासविमुख, खफछटादि किंवा घटपटादि नीरस विषयावर वाक्पाटव दाखविणारा मनुष्य असावा असें लोकांना वाटतें. परंतु अशा रीतीनें शुष्क विद्वज्जडांची टवाळी करणारा रसज्ञ कवि जगन्नाथराय हा स्वतःला 'पंडितराजराजितिलक' म्हणवितो हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. अमूक गुणांनीं युक्त व अमूक एक व्याख्येच्या साच्यात बसेल तेंच काव्य, असें प्राचीन साहित्यशास्त्रज्ञांनीं म्हटलें आहे; म्हणून ज्या पंडिताची रसग्राहकता त्या मर्यादेपाशीं थांबते आणि वयपरत्वें तद्व्यतिरिक्त काव्यप्रकारातील रस ओळखण्यास व चाखण्यास असमर्थ होते, त्या पंडिताची चर्चा पांडित्यकल्लोलिनी झाली तरी रुक्ष होईल. परंतु

विद्वत्तेमुळें ज्याची रसज्ञता खोल व विस्तृत झाली आहे अशा पंडिताचें विवेचन सकृद्दर्शनीं दुर्बोध वाटलें तरी परिणामीं उद्बोधक झाल्यावांचून राहाणार नाहीं."

"एखादी कविता वाचून टीकाकाराच्या मनावर जो ठसा उमटला असेल, त्या ठशाविषयींच त्यानें चर्चा करावी हें युक्त आहे. तो ठसा जर इतरांच्या मनावर उमटत नसेल तर त्यानें आपल्या मनोभूमीची व इतरांच्या मनोभूमीची तुलना करून ठसे निराळे निराळे का उमटतात याचेंहि विवेचन करणें जरूर आहे."

"कवीवर स्वतःच्या डोक्यातून काढलेल्या अर्थाचा आरोप करूं नये हें सकृद्दर्शनीं युक्त वाटतें. याचा अर्थ इतकाच करावयाचा कीं, कवितेंतून जो अर्थ काढण्यात येतो, तो विचारी मनुष्यास पटेल असा पाहिजे. त्यात हठाकृष्टता येतां कामा नये. परंतु कवीलाच कधी कधीं त्यानें मागें लिहून ठेवलेल्या कवितेत एखादें नवीन रहस्य आढळून सानंद आश्चर्य वाटते. त्या वेळीं तो तें रहस्य लिहिताना अभिप्रेत नव्हतें म्हणून त्याचा निषेध करतो काय? काव्य हें अंशतः तरी अज्ञात मनात जन्म पावत असल्याकारणाने असे चमत्कार अनेकदां संभवतात. टीकाकाराच्या दृष्टीस कित्येकदा प्राचीन कृतींत असेंच अभिनव रहस्य दिसूं लागतें. माझ्या मनात अमूक एकच अर्थ आहे असें कवि कुठवर सागत राहणार? कविता वाचकांपुढें आली कीं, जो अर्थ विचारी वाचकाच्या मनात येईल, तोच त्या कवितेचा अर्थ असें धरून चाललें पाहिजे; मग तो अर्थ कवीच्या मनांत असो वा नसोहि."

ही 'काव्यचिकित्सा' व तिच्यावरील इतरांची चिकित्सक चर्चा 'प्रगति'-मधून मार्च १९३१ पर्यंत चालू होती. ही लेखमाला लिहिली जात होती त्याच काळात त्यांनीं माझ्या 'अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक' या ग्रंथासाठीं 'केशवसुत,' 'दत्तात्रय कोंडो घाटे,' व 'बालकवि ठोमरे' यांवरील समीक्षणात्मक लेख लिहिले. त्यांपैकीं 'केशवसुता'वरील त्याचा लेख पुष्कळच गाजला. या लेखासाठीं त्यांनीं अतिशय परिश्रम केले. त्यांनीं मला, हा लेख

धाडतांना लिहिलें [1] होतें: " ज्यांनीं केशवसुतांचा काळजीपूर्वक अभ्यास केला आहे, परंतु ज्यांचीं मतें माझ्या मतांच्या विरुद्ध आहेत अशा कांहीं जणांशीं चर्चा करून, माझ्या मतांची पूर्ण छाननी करून घेऊन, भाषादृष्टयाहि तो कसोशीनें सुधारून पुन्हा अथपासून इतिपर्यंत लिहून काढण्यांत आला आहे. कर्तव्यांत कांहींच कसूर झालेली नाहीं, तेव्हां तो वाचनीय व विचारणीय वाटेल अशी आशा आहे." हा लेख लिहितांना त्यांनीं जी विशिष्ट दृष्टि ठेवली होती, ती लक्षांत घेतां 'माझा लेख बहुजनसमाजास रुचेल असें मला वाटत नाहीं' असें जें त्यानीं मला त्याचे आधींचे एका पत्रात [2] लिहिलें होतें तेंच अखेर प्रत्ययाला आलें.

१९३१ च्या उत्तरार्धांत त्यांनीं काव्यचर्चेमधून आपलें लक्ष काढून घेऊन, तें छंदःशास्त्राच्या अभ्यासांत अधिक गुंतविलें. दोन-तीन वर्षांपूर्वी, फिज्जेरल्डच्या रुबायाचे केलेले 'द्राक्षकन्या' हें भाषांतर, त्याचे अनेक वेळा परिष्करण होऊन, स्वतःचें पूर्ण समाधान झाल्यावर ता. १५ ऑगस्ट, १९३१ रोजीं त्यानीं प्रसिद्ध केलें. आपल्या भाषांतरविषयक मताचें प्रात्यक्षिक देण्यासाठी 'फिज्जेरल्डनें उमर खय्यामचें जें सुंदर भाषांतर, नव्हे तर रूपांतर केलें आहे, त्याचें भाषांतर चुरशीनें करून त्या इंग्रजी जवळ जवळ स्वतंत्र अशा काव्याची मराठी प्रस्तावना, भाषांतर आणि टीपा यांसह आवृत्ति काढली. अशा तऱ्हेचा प्रयत्न हा मराठींत पहिलाच असेल.' माधवरावांनी हें भाषांतर निर्दोष व सर्वांगसुंदर व्हावें यासाठी जी काळजी घेतली व जे कष्ट केले त्याची बूज मात्र विशेषशी झाली नाहीं. 'द्राक्षकन्ये'च्या पन्नासांहून अधिक प्रती विकल्या गेल्या नाहींत. याला बव्हंशीं कारण, उमर खय्यामच्या भोक्त्याचा महाराष्ट्रांतील अभाव, हेंच असावें असें वाटतें. महाराष्ट्रीयाच्या मनाला मोहवील असें त्याच्या तत्त्वज्ञानात कांहीं नाहीं. तरुणपणीं 'बंडखोरीच्या व शंकेखोरीच्या विचारलहरी मनुष्याच्या मनांत प्रसंगोपात्त अनेकदा उद्भवतात,' अशा प्रसंगीं त्याच्या भावनाना साथ देऊन हें काव्य, त्याच्यात एक प्रकारच्या सुख-करुण काव्यमय संवेदना उत्पन्न करून, त्याला क्षणभर रिझवितें. त्यामुळें त्याची लोकप्रियताहि भारतांत

[1] ५ जून, १९३१. [2] ता. १८ डिसेंबर, १९३०.

मर्यादितच आहे. असलें काव्य, भाषांतरकारानें तें कितीहि निर्दोष स्वरूपांत लोकांपुढें ठेवण्याचा कसोशीनें प्रयत्न केला तरी व्यावहारिक दृष्ट्या अयशस्वीच ठरणार. पण हौसेला मोल नाहीं; ईर्षेपुढें व्यवहारवादाचें कांहीं चालत नाहीं.

'द्राक्षकन्या' व्यावहारिक दृष्ट्या यशस्वी होवो वा न होवो, भाषांतराचा एक आदर्श नमुना म्हणून तरी त्याचें कौतुक व्हावें अशी माधवरावाची अपेक्षा होती. अगदीं मोठ्या चुरशीनें आणि आपलें सारें भाषांतरकौशल्य खर्च करून त्यानीं हें काव्य तयार केलें, पण 'टीकाकारांकडून त्याची बूज झाली नाहीं,' अशीच तक्रार त्याची राहिली. त्यानीं 'मी व माझे टीकाकार' या लेखात यासंबंधीं पुढीलप्रमाणें उद्गार काढले आहेत: "भाषांतर इतकें अनुरूप उतरायला काय अधिकार लागतो आणि किती कष्ट पडतात याचा विचार न करितां कित्येकांनीं भाषांतर यथाशब्द दिसतें यावरूनच तें नीरस असलें पाहिजे, असें ठरवून द्राक्षें आंबट आहेत असें म्हणणाऱ्या कोल्ह्याची वृत्ति प्रगट केली. पण मूळ भावार्थ जर सुंदर आहे आणि भाषांतराची भाषा जर सुबोध आणि एकतोलाची पडली आहे, तर रसाचा लोप होऊंच शकत नाहीं, हें या दुराग्रहानें पछाडलेल्या टीकाकारांना समजावून सांगितलें तरी उमजत नाहीं. भाषांतरकार या नात्यानें माझा दोष म्हटला तर हाच म्हणतां येईल कीं, मूळात कित्येक ठिकाणीं असलेला दूरान्वय आणि उच्चारकाठिण्य हे दोष मीं भाषांतरांत उतरूं दिले नाहींत. प्रो. ना. सी. फडके यानीं मात्र मला स्पष्ट सांगितलें कीं, माझें भाषांतर मूळाहून सुबोध आणि सुरस झालें आहे. 'अभिनव काव्यप्रकाशा'चे कर्ते प्रो. रा. श्री. जोग यानीं नाशिक कॉलेजच्या नियतकालिकांत जें सूक्ष्म परीक्षण केलें आहे, त्यात त्यांनीं स्पष्ट म्हटले आहे कीं, 'किंबहुना इतक्या अडचणींतून मार्ग काढून यापेक्षा अधिक यशस्वी भाषांतर करणें अशक्यप्रायच आहे असें म्हणतां येईल.' परंतु हें परीक्षण कोंपऱ्यात पडून राहिलें आणि इतर प्रतिकूल परीक्षणानीं मात्र आपला कावा साधला."

टीकाकारांकडून 'द्राक्षकन्ये'च्या बाबतींत जाणून बुजून अन्याय घडला अशीच असंतोषाची भावना त्याच्यांत अखेरपर्यंत राहिली. भाषांतराबद्दल त्याना पूर्ण समाधान वाटत असूनहि, टीकाकाराच्या त्याजसंबंधींच्या प्रतिकूल

वृत्तीमुळें ते असमाधानी राहिले. पण त्याबरोबरच, अभ्यासाचा आणि सूक्ष्म दृष्टीचा अभाव असल्यामुळें ज्यांच्या परीक्षणाना वाङ्मयीन मूल्य कांहींहि राहिलेलें नाहीं, त्यांच्या टीकाना आपण महत्त्व तरी कशाला द्यावें असाहि विचार त्याच्या मनांत डोकावे.

टीका ही समर्पक व व्यक्तिनिरपेक्ष असावी; ती कितीहि निष्ठूर असली तरी चालेल, पण ती अभ्यासपूर्ण व तत्त्वनिष्ठ पाहिजेच पाहिजे; सार्वजनिक अभिरुचीची शुद्धि आणि वृद्धि करणें हें टीकाकाराचें ध्येय असावयाला पाहिजे आणि तें साधण्यासाठीं मौलिक तत्त्वचर्चा करण्याचें सामर्थ्य त्यांनीं आपल्यात आणलें पाहिजे; ज्याच्यात तें नाहीं त्याची उपेक्षाच केलेली बरी; असें माधवराव म्हणत. सहेतुक विपर्यास आणि अवास्तवारोप याची त्याना अत्यंत चीड असे. हे अपराध त्यांना अक्षम्य वाटत. जेव्हां काहीं काहीं स्वतःस सुशिक्षित, सुसंस्कृत म्हणविणारे साहित्यिक इतके अधम झालेले त्याना दिसत, तेव्हां त्याना फार विषाद वाटे. स्वभावाला शिक्षणाचें औषध लागू पडत नाहीं हें पाहून ते उद्विग्न होत. 'खेळातील खोडकरपणा मला समजतो नि रुचतोहि; परंतु खोडसाळपणा हा मात्र सहनशीलतेचा अंत पाहतो,' असें ते उद्गारीत. त्यांनीं स्वतः टीकात्मक लेखन किती तरी केलें आहे, पण समर्पकता आणि व्यक्तिनिरपेक्षता यापासून ते केव्हाहि ढळले नाहींत. तत्त्वनिष्ठ व अभ्यासु वृत्तीच्या टीकाकाराबद्दल त्यांना नेहमींच आदर वाटे. याबद्दलचें प्रत्यक्ष उदाहरण म्हणजे बाळकृष्ण अनंत भिडे याचें होय. या आपल्या टीकाकाराबद्दल त्यानीं म्हटलें आहे: "श्री. भिडे यानीं आपल्या चटकदार भाषेनें रविकिरणमंडळाच्या पुस्तकाचीं निष्ठुर पण गुणग्राही अशीं परीक्षणें आमरण लिहिलीं. 'सुधारक' काव्याचें 'विविधज्ञानविस्तारा'तील सविस्तर परीक्षण हेंच त्याचें शेवटलें परीक्षण होय. काव्यगुणाला त्यांनीं मोकळ्या मनानें आणि सहृदयतेनें मान्यता दिली, परंतु त्याना समाजविघातक वाटणाऱ्या टुमीवर आणि मतावर त्यांनीं तितक्याच कठोरपणानें प्रहार केले. प्रतिपक्षाची भूमिका ते जिज्ञासु सहृदयतेनें समजून घेत; परंतु स्वतःला पटलेल्या तत्त्वाच्या समर्थनार्थ आवेशानें, चिकाटीनें आणि निकरानें झुंजत असताना ते व्यक्तींची भीड-प्रतिष्ठा ठेवीत नसत. मंडळाचे सदस्य व्यक्तिशः त्याचे मित्रहि नव्हते आणि शत्रुहि नव्हते. त्यांची

टीका तशी व्यक्तिनिरपेक्ष असे; परंतु ती केवळ तत्त्वचर्चात्मक रुक्ष नसे. तिच्यांत मानवता असल्यानें विनोद, उपहास इत्यादिकांशीं त्यांचें वांकडें नसे. पण सहेतुक विपर्यासाचें अस्त्र त्यांनीं कधींहि योजिलें नाहीं. वस्तुतः ते माझ्याहून वयानें, विद्वत्तेनें नि कीर्तीनें कितीतरी श्रेष्ठ होते; पण जशास तसें या न्यायानें मीं जर कोठें उपहास केला तर त्यांनीं ती मानखण्डना मानून घेतली नाहीं. अशी खेळाडू वृत्ति त्यांच्यांत होती. एकाला पाडावें, दुसऱ्याला चढवावें अशी क्षुद्र आकांक्षा त्यांना शिवली नाहीं. ते स्वाभिमानी होते पण अहंमन्य नव्हते. त्याच्यात विद्वत्ता होती; पण त्याना जडता आली नव्हती. ते शेवटपर्यंत मनानें तरुण आणि जिज्ञासु राहिले. त्याच्या मौलिक सौजन्यामुळें त्यानीं केलेली टवाळी मर्मघ्न न होता हृदयंगम होई. 'विरहतरंगा'वरील परीक्षणात त्यानी मला 'प्रणयपंढरीचा वारकरी' म्हटलें, तर मीं ते बिरुद समजून तत्काळ त्याचा साभार स्वीकार केला. जवळ जवळ पाच वर्षे त्याचा आमचा तात्त्विक संग्राम झाला; पण त्याच्या आमच्या परिचयाची परिणति स्नेहात झाली. स्नेह हा स्तुतीवरच जगतो अशी ज्यांची श्रद्धा असेल त्यानीं हा आमचा ऋणानुबंध ध्यानात घ्यावा म्हणजे खेळाडूपणा अंगीं बाणण्याची शक्यता असल्यास तो अंगीं बाणेल."

बाळकृष्ण अनंत भिडे याच्याप्रमाणेंच आणखी एक दुसरें उदाहरण प्र. के. अत्रे यांचें. अत्रे यानीं आपल्या 'झेंडूच्या फुला'पैकीं एक फूल माधवरावावर उधळलें होतें. या 'फुला'चा, कंचनी या कवितेबरोबरच माधवरावाच्या फर्ग्युसन कॉलेजातील प्रतिपक्षानें त्यांच्या विरुद्ध पुरावा उभा करतांना, आजीव सेवकाच्या सभेंत उपयोगहि करून घेतला होता. पण माधवरावाच्या मनात अत्रे याच्याबद्दल द्वेषाची भावना कधींच उद्भवली नाहीं. उलट, 'श्यामलेस' ही अत्रे याची विडंबनात्मक कविता ते स्वतः इतरांना वाचून दाखवीत आणि भोंवतीं खळखळणाऱ्या हसहसाटांत आपल्याहि हास्याची लाट स्वैरपणें सोडून देत. अत्रे यांच्या विडंबनकलेचें, त्याच्या तीव्र विनोदबुद्धीचें, त्यांच्या कुचाळखोर पण मोकळ्या व व्यक्तिद्वेषहीन वृत्तीचें त्यांना नेहमींच कौतुक वाटे. 'अत्रे याच्या कृतीच्या मुळाशीं कुचाळीची हौस असली तरी आपल्या गुणदारिद्र्याची साक्ष देणारी असूया नाहीं,' असें ते म्हणत. त्यामुळें

अत्रे यांना अ-मित्र न मानतां त्यांनीं मित्रच मानलें आणि त्यांच्या गुणांना वाखाणलें. 'झेंडूचीं फुलें' या पुस्तकाच्या द्वितीयावृत्तीचें त्यांनीं 'ज्ञानप्रकाश' दैनिकांतून केलेलें समीक्षण व 'प्रगति' साप्ताहिकांत 'परिटा येशिल कधीं परतून?' या विडंबनगीताची केलेली चिकित्सा हीं, माधवराव आपल्या बाह्यतः कठोर पण मनानें कोवळ्या व तत्त्वनिष्ठ टीकाकारांशींहि किती व्यक्तिनिरपेक्ष वृत्तीनें वागत याचीं उत्तम उदाहरणें आहेत. 'ज्ञानप्रकाशां'तील झेंडूच्या फुलांवरील परीक्षण वाचून अत्रे यांनीं माधवरावांना लिहिलें होतें: "अल्पस्वल्प मतभेदाचे मुद्दे सोडून दिल्यास आपलें परीक्षण एकंदरींत आपल्या समतोल बुद्धीचें, रसिकतेचें व खेळाडू स्वभावाचें निदर्शक आहे असें मला वाटतें व त्याबद्दल—जरी आपणास त्याची अपेक्षा किंवा आवश्यकता नसली तरी—मी आपलें अंतःकरणपूर्वक अभिनंदन करतों." मतभेद असूनहि परस्पराबद्दल आदरभावना ठेवून वागण्याची ही वृत्ति किती टीकाकारांत सापडेल?

* * *

१९३०–३१ या दोन वर्षांत, माधवरावाच्या हातून काव्यचर्चा-चिकित्सा-समीक्षणात्मक लेखन पुष्कळच घडलें. 'प्रगति' व 'अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक' यासाठीं लिहिलेल्या लेखांव्यतिरिक्त 'तांबे यांची कविता', 'बोलींतील शब्दाची छाननी', 'यकारयुक्त व हकारयुक्त व्यंजनें', 'सुकलेलें फूल' (परीक्षण), 'सुकलेलें फूल' (शालीनदत्त शिदोरे यांच्या टीकेस उत्तर), 'महाराष्ट्र-साहित्य-परिषदेची पुनर्घटना' असे लेख त्यांनीं लिहिले. यापैकीं शालिनदत्त शिदोरे यांनीं 'लोकशिक्षण' मासिकांतून पु. य. देशपाडे यांच्या 'सुकलेलें फूल' या पुस्तकावर जी विपर्यस्त व अनुदार टीका केली, त्याचा समाचार घेण्यासाठीं त्यांनीं जो 'यशवंत' मासिकांतून लेख लिहिला त्याचा येथें विशेषत्वानें उल्लेख केला पाहिजे. अन्याय आणि खोडसाळपणा आढळला म्हणजे माधवरावाचें रक्त कसें उसळून उठे आणि ज्याच्याबद्दल तो घडला असेल त्याला नीट न्याय मिळावा यासाठीं ते झगडण्यास कसे पुढें होत त्याचें, हा लेख, हें एक उत्तम उदाहरण आहे. पु. य. देशपांडे यांची 'सुकलेलें फूल' ही कादंबरी माधवरावांना डॉ. केतकर यांच्या 'ब्राह्मण-कन्या'

या कादंबरीचे खालोखाल आवडलेली होती. 'आज फार दिवसांनीं एक जिवंत कादंबरी वाचावयास मिळाली', असे त्यांनीं उद्गार काढलेले होते. या कादंबरीवरील शिदोरे यांचा लेख वाचून, आपल्याला आवडलेल्या एका ललित कृतीवर अन्यायाची टीका झाली आहे असें त्यांना वाटलें, आणि ते स्वयंप्रेरणेनें तिच्या समर्थनार्थ धावून गेले. वास्तविक देशपांडे हे त्यांच्या स्नेह्यात तर राहोतच पण विशेष परिचितांतहि मोडणारे नव्हत. पण जेव्हां त्यांना त्यांच्या बाबतींत बुद्धिपुरःसर अन्याय घडत आहे असें दिसलें, तेव्हां त्यांना स्वस्थ बसवेना. त्यांनीं लगेच लेखणी हातांत घेतली आणि शिदोरे यांच्या विपर्यस्त विधानांची, अप्रागतिक व बुरसलेल्या सामाजिक विचारसरणीची, खोडसाळपणानें केलेल्या हेत्वारोपांची अशी झणझणीत आणि बिनतोड हजेरी घेतली कीं, तशी घेण्याचें खुद्द लेखकालाहि साधलें नसतें. त्यांनीं या लेखाच्या प्रारंभीच सांगून टाकलें होतें कीं, "मराठी वाङ्मयांत कलाकृति आधींच वैरल्यानें निपजते. तशांत तिच्यावर जर विपर्यस्त टीका झाली तर तिची उपेक्षा न करितां एखाद्या त्रयस्थानें स्वयंस्फूर्तीनें त्या टीकेचा योग्य परामर्श घ्यावा यांतच त्या कलाकृतीचें चीज आहे."

अन्याय, मग तो प्रत्यक्ष शत्रूलाहि का होईना, ज्याला दिसतो त्यानें तो दूर करण्याचा प्रयत्न केला पाहिजे, उदासीन राहतां कामा नये. उदासीन राहिल्यानें शिरजोर माणसांच्या कारवायांना निरपराध माणसांना बळी पडावें लागतें, अशी त्यांची विचारसरणी होती.

माधवराव आतां लेखन, वाचन, साहित्यविषयक चळवळी आणि संसार यात पूर्णपणें रंगून गेले होते. कवितालेखन, काव्यपरिष्करण, व्याख्यानें, सभा-संमेलनें याचा कार्यक्रम अखड चालला होता. १९३१ सालीं ते महाराष्ट्र-परिषदेचे चिटणीस म्हणून निवडले गेले. तेव्हांपासून तर त्यांच्या साहित्य-विषयक चळवळींना जोरच चढला; लेखनसुधारणा व भाषाशुद्धि याविषयींच्या त्याच्या प्रचाराला प्रारंभ झाला. त्यांचा आत्मविश्वास वाढला होता; ते आपले विचार निश्चयात्मकपणें लिहून आणि बोलून दाखवूं लागले होते.

# १४

## चढतें वाढतें यश

'कवि कवितेला विटला आतां,' असें माधवराव आपल्या 'सुधारक' काव्यात १९२८ सालीं म्हणून मोकळे झाले होते. पण लोक कांहीं त्यांच्या काव्याला विटले नव्हते; त्यांचें काव्य वाचण्याची व ऐकण्याची उत्सुकता लोकांत वाढतच होती. आणि स्वतः माधवरावहि, 'सुधारकां'त त्यांनीं तसे उद्गार काढले तरी, कवितेला विटलेले नव्हते. त्याची काव्यलता अनेक नवनवीन पुष्पांनीं डवरली जात होती आणि त्यांचा सौरभ सर्वत्र पसरत चालला होता. अनेक रसिक भुंगे त्यांचे भोंवती रुंजी घालून, त्यांतील पराग दूर दूर नेऊन सोडीत होते. मराठी बोलणारा असा कोणताहि प्रदेश राहिला नव्हता कीं, जेथें त्यांचे काव्य वाचलें वा गायिलें जात नव्हतें. 'प्रेम कोणीहि करीना, कां अशी फिर्याद खोटी,' 'एकत्र गुंफून जीवित धागे' हीं 'हिज मास्टर्स व्हॉइस'नें गोविंदराव जोशी याजकडून गावबून तबकडीवर घेतलेलीं गीतें तर शेंकडों मराठी घरांतून ऐकलीं जात होतीं. गोविंदराव जोशी यांचेप्रमाणें कोल्हापूरच्या प्रसिद्ध गायिका अज्जमबाई यांनीं त्यांचें 'प्रेम होईना तुझ्यानें प्रेम माझें राहूं दे,' 'सतेज काळे टपोर डोळे', 'काहूर', 'वेड आधीं लाग कोणी लाविलें', 'तुजवीण सखे मज कोणि नसे', हे गज्जल ग्रामोफोनसाठीं गाऊन सर्वसामान्य जनतेंत त्याबद्दल 'ए तो हमारा है' अशी भावना निर्माण केली होती. मंजीखां-सारखे अव्वल दर्जाचे गायक त्यांचें 'ऐकव तव मधु बोल' हें गीत मोठमोठ्या मैफलींत रंगून गाऊन दाखवूं लागले होते. तरुण मनाला मोहून टाकणारीं त्यांचीं सारीं गज्जलगीतें 'गज्जलांज्जली'च्या रूपानें रसिकांपुढें आलीं होतीं. इतके दिवस पाठमोरी असलेली कीर्ति पुष्पमालांसह

त्यांना सामोरी येऊं लागली होती. १९३३ सालीं नाशिक येथें भरलेल्या कविसंमेलनाचें त्यांना मिळालेलें अध्यक्षपद हें त्याचें पूर्वचिन्ह होय. त्यांच्या कर्तृत्वाचा प्रकटपणें होणारा हा पहिलाच सन्मान होता. त्यांचे त्यानंतर लागोपाठ, १९३४ सालीं बडोदें साहित्यसंमेलनांतील काव्यविभागाचें अध्यक्षपद, १९३५ सालीं विद्वानांचे चाहाते बडोद्याचे महाराज श्रीमंत सयाजीराव गायकवाड यांजकडून संभावना, १९३६ सालीं जळगांव येथील साहित्यसंमेलनाचें अध्यक्षपद, असे एकाहून एक उच्चतर सन्मान होत गेले.

नाशिक येथील कविसमेलनाच्या अध्यक्षपदाचें ज्या दिवशीं त्याना आमंत्रण आलें, त्या दिवशी त्यांना आनंद हा स्वाभाविकपणेंच वाटला, पण जुन्या अनेक आठवणी त्यांच्या मनात जागृत झाल्या. शिंदे यांना त्यांनीं लिहिले होते, "देवाच्या चाळीत जेव्हा कवितामागून कविता मी लिहीं आणि त्या तुम्हाला वाचून दाखवून भंडावून सोडीं, त्या वेळेस कधीं काळी अशा तऱ्हेचा सन्मान — तो तसा असेल तर — होण्याचा योग आपल्या आयुष्यांत येईल असें स्वप्नातसुद्धां वाटलें नाहीं." आपल्याला पूज्य व आदरणीय वाटणारे कवि चंद्रशेखर, याच्या जन्मगांवीं भरणाऱ्या या संमेलनाचे आपण अध्यक्ष होणार आहोंत, या कल्पनेबरोबरच त्यांना वीस वर्षांमागें त्याच्या तोंडून ऐकलेला 'गोदागौरव' आठवला आणि त्यांत वर्णिलेलीं अनेक स्थाने त्यांच्या डोळयांपुढून चलच्चित्राप्रमाणें झरझर सरकूं लागलीं. 'गोदागौरवा'च्या कर्त्याची पवित्र, सोज्वळ, एकान्तप्रिय, चिंतनशील मूर्ति त्याच्यापुढें उभी राहिली; त्यांचें मस्तक तिच्यापुढें नम्र झालें. 'माझ्या पद्यपाइकीचा हा जो गौरव होत आहे त्याचें श्रेय मी तुम्हांलाच अर्पण करतों', ते सद्गदित कंठानें उद्गारले.

संमेलन सप्टेंबरच्या १६, १७ तारखेस भरलें. कवि नारायण वामन टिळक यांच्या पत्नी लक्ष्मीबाई या स्वागताध्यक्ष होत्या. साऱ्या नाशिकच्या त्या आई. नाशिकांतील साऱ्या साहित्यकांना त्या आपलीं लेंकरेंच समजावयाच्या. घरोघरीं त्यांच्या सुना, लेकी आणि नातवंडें! आईची साऱ्यांवर माया आणि साऱ्यांची आईवर निष्ठा. त्यांनीं प्रयोजनाचा संकल्प सोडावा व इतरांनीं तो आत्मीयतेनें पुरा करावा, असे त्यांचे आणि नाशिककरांचे जिव्हाळ्याचे संबंध होते.

# चढतें वाढतें यश

संमेलन भरलें त्या दिवशीं कोण मुसळधार पाऊस! गोदेला नुकताच महापूर येऊन गेला होता. जिकडे तिकडे चिखलच चिखल. आणि वारा इतका चावरा कीं, अंगावर कांटाच उभा राही. पण तशा त्या हवामानाला मुळींच न जुमानतां नाशिककरांनीं सभागृहात दोन्ही दिवशीं गर्दी करून सोडली. आणि त्यातहि पुरुषापेक्षां स्त्रियांचीच संख्या अधिक होती. अपूर्व उत्साह त्यानीं त्या दोन दिवसांत दाखविला. योगायोगानें, सकाळपासून संततधार पडणारा पाऊस संध्याकाळीं जेव्हां अध्यक्षीय भाषण सुरू झालें तेव्हां थाबून सर्वत्र प्रसन्नता पसरलेली होती. सुंदर, स्पष्टोक्तिपूर्ण, मधूनमधून विचाराना चालना देणारे, अस्खलित असें भाषण श्रोतृजन तन्मयतेने ऐकत होते. आज समाज कवींकडे कोणत्या दृष्टीनें पाहतो, त्याचा समाजांत दर्जा कोणता, त्याच्या स्वतःसंबंधींच्या कल्पना कोणत्या आहेत, कोणते भ्रम त्यानीं उरापोटाशीं बाळगले आहेत याचें निर्भीडपणें दिग्दर्शन करून, प्रतिभेला परिश्रमाची जोड मिळाली, स्फूर्ति आणि सहेतुक परिश्रम याचा संगम झाला तरच उत्कृष्ट, भव्य आणि दीर्घायु अशा कलाकृति निर्माण होतील असें त्यानीं सागितलें. जें स्फुरलें आणि कागदावर उमटले, तें कायम ; त्यांत फरक करणें अब्रह्मण्यम्, या खुळचट कल्पनेवर त्यानी वक्रोक्तिपूर्ण असा जो हल्ला चढविला त्यामुळें पुष्कळच कवींचे चेहरे प्रदर्शनीय झाले. ते म्हणाले : "कोणत्याहि महाकवीच्या प्राथमिक कविता बघायला मिळाल्यास त्या कमी-अधिक अनुकरणपर कित्तेगिरवणुकीच्या आहेत असें दिसून येईल. आणि त्याच्या उत्कृष्ट कवितांचीं मूळ हस्तलिखितें बघायला मिळतील तर त्यांत त्यानें मागाहून विचार करून कशा सुधारणा केल्या आहेत हें दिसून येईल. टेनिसनसारखा इंग्रजी कवीच काय, पण 'मी शारदेचाच कानमंत्र अनुवादित आहें' अशी प्रौढी मारणारा केशवसुतहि वारंवार आपल्या कवितांवरून हात फिरवितांना दिसतो. टॉलस्टॉयच्या जगद्विख्यात कादंबऱ्यांच्या हस्तलिखितात मुद्रणापूर्वी कितीतरी फिरवाफिरव व संस्करण होत असे. अनायासें व अनिच्छया सहज स्फूर्तीनें जें बाहेर पडेल तेंच कलायुक्त असा आग्रह धरल्यास, आपल्या चोखंदळ मनाचें पूर्णपणें समाधान होईपर्यंत चित्रावरून कुंचली फिरवीत राहणाऱ्या चित्रकाराच्या चित्रांची कलाभुवनांतून हकालपट्टी करावी लागेल. दुसऱ्याचा हात कितीहि कोमल कौशल्यानें नटला असला तरी त्यानें आपल्या

कवनाला स्पर्श करण्यापेक्षां जीव गेलेला बरा असें म्हणण्यांत स्वाभिमान स्पृहणीय आहे यांत शंका नाहीं; पण अशा स्वाभिमानी कवीनें सर्वांगीण निर्दोष सौंदर्य हें ध्येय पुढें ठेवावें. स्वतःच स्वतःच्या कृतीचे परीक्षण करावे, दुसऱ्यांच्या टीकाचा योग्य तो विचार करावा आणि आपली कृति कलापूर्ण करावी, म्हणजे मूळ कल्पनेची विकृति तर होणारच नाहीं, उलट तिचें स्वरूप अधिक सुदर होईल. एखाद्याच्या कृतींवर दुसऱ्याने हात फिरवूं नये या सर्वमान्य नियमालाहि काहीं प्रतिभासंपन्न लोक अपवाद मानिले पाहिजेत. आदर्शभूत ग्रंथाचेंहि भाषातर करतांना वाटेल तो फेरफार करण्याचे अधिकार जर अनुवादक बजावतात तर ज्याच्या अंगीं वानराचा विनायक बनविण्याचें सामर्थ्य आहे त्यानीं दुसऱ्याच्या सामान्य नीरस कृतीवरून आपली संजीवनी लेखणी फिरवून तीस सुंदर पृथगात्मता कां देऊं नये ? ही ~~आकृति~~ होत नाहीं, ही स्वतंत्र निर्मितीच असते. मागाहून परिष्करण करण्याची आवश्यकताच पडूं नये अशी ज्याची इच्छा असेल त्यानीं आधीच अशी तपश्चर्या करावी कीं, सहजस्फुरित अशी जी कृति निर्माण होईल ती क्षीरसागरकन्ये-प्रमाणें जन्मसिद्ध सौंदर्यानें व निर्दोष वैभवाने युक्त अशीच असेल.''

माधवरावाच्या या भाषणानें श्रोतृसमुदायावर उत्तम प्रकारची छाप तर पाडलीच पण त्याबरोबरच त्याच्या वैशिष्ट्यपूर्ण व्यक्तिमत्वाचे अविस्मरणीय असें दर्शन त्यांना घडवून दिलें. नवोदित कवींपैकीं जे कवि तेथें उपस्थित होते, त्यांना आपल्या उस्तादाचें, नेत्याचे त्या दिवशीं सत्यस्वरूप कळलें; नवी स्फूर्ति आणि दृष्टि घेऊन ते सभागृहांतून बाहेर पडले.

या कविसंमेलनाच्या पाठोपाठ १९३४ सालीं बडोदें येथें ना. गो. चापेकर यांच्या अध्यक्षतेखालीं भरलेल्या मराठी साहित्यसंमेलनातील काव्यविभागाच्या अध्यक्षपदाचा थोर मान त्यांना मिळाला. बडोदें हें त्यांचें जन्मगांव. त्यांचें शिक्षण व संस्करण तेथेंच झालें. अशा या गावीं हा सन्मान अनुभविण्यांत त्यांना विशेष आनंद वाटावा हें साहजिकच होतें. याच सुमाराला त्यानीं 'स्वप्नरंजन' हा आपला स्फुट कवितांचा संग्रह प्रसिद्ध करून, आपल्या या जन्मस्थानांतील 'संस्मरणीय व्यक्तींना आणि घटनांना' अर्पण केला होता. ते अतिशय खुषींत होते. काव्यविभागाच्या अध्यक्षपदावरून त्यांनीं केलेलें भाषण नाशिक

येथील भाषणाहून सर्व दृष्टींनीं वरचढ होतें. आत्मविश्वास, आत्मप्रचीती, दीर्घ चिंतनांतून निर्माण झालेली वैचारिक खंबीरता, आणि अंतःकरणाला जें पटतें तें निःसंकोचपणें बोलून दाखविण्याची निर्भीड वृत्ति त्यांत ठायीं ठायीं प्रत्ययाला येत होती. आधुनिक मराठी कवितेला दिवसेंदिवस जरी लोकप्रियता व प्रतिष्ठा मिळत असलेली दिसत आहे तरी ती एका महान् दोषानें ग्रस्त आहे. हा दोष म्हणजे परपुष्टता, अनुकरणशीलता. भाषणाच्या प्रारंभींच आपलें असें मत व्यक्त करून ते म्हणाले : "तिच्यांत पृथगात्मता नाहीं. तिच्यात ध्वनि नाहीं, प्रतिध्वनि मात्र आहेत. खेड्यांतील जीवन नागर जीवनापेक्षां अधिक निरामय व सुखकर आहे. सृष्टीशीं तादात्म्य पावल्यानें सृष्टि गूढ तत्त्वें शिकविते, बालपणात व्यक्ति स्वर्गाच्या जवळ असल्यानें तिच्या निष्पाप दृष्टीला स्वर्गातील दृश्यें दिसत असतात, रूढिभंजनाविना तरणोपाय नाहीं, स्त्रियांना पारतंत्र्यांत ठेवून राष्ट्र स्वतंत्र व पराक्रमशील होऊं शकत नाहीं, जगभर समता, बंधुता आणि शांतता या त्रयींचें साम्राज्य स्थापिलें पाहिजे इत्यादि कल्पना इंग्रजी वाङ्मयांतून, कित्येक तर जवळ जवळ शंभर वर्षांच्या शिळ्या आणि टाकाऊ झाल्यानंतर, महाराष्ट्रीय कवींनीं ऊन ऊन म्हणून मोठ्या उत्साहानें उचलल्या आणि नव्या जोमानें मराठींत मांडल्या. या कल्पना इंग्रजी वाङ्मयावरून सुचल्या; त्या कवींच्या वैयक्तिक व राष्ट्रीय संसारातून स्फुरल्या नाहींत. त्या कितपत साधार आहेत, मराठी जीवनाशीं कितपत सुसंबद्ध आहेत याचा विचारच झाला नाहीं. आमचे कवि या कल्पनाना भाळले आणि त्यांनीं त्यांचा अनुवाद केला. ही हुरळणूक ज्या मानानें हार्दिक होती त्या मानानें कृति हृदयंगम वठली, परंतु ज्या मानानें ती बहुजनसमाजाच्या प्रत्यक्ष जीवनाशीं अलग व विसंगत राहिली त्या मानानें तिचा प्रभाव मर्यादित राहिला. केशवसुतांची हुरळणूक हार्दिक आहे. ते मूळ इंग्रजी कवितेवर भाळले खरे पण त्यांनीं भोंवतालच्या सृष्टीचें थोडें तरी ममत्वानें निरीक्षण केलें होतें, हें 'नैऋत्य दिशेकडील वारा' आणि 'वातचक्र' इत्यादि कवितांवरून स्पष्ट दिसतें; पण इतरांनीं केशवसुतांचाच अनुवाद करायला आरंभ केला. पाश्चात्य कल्पनांचा हा प्रवाह आमच्या राष्ट्रीय जीवनांत भिनून नवीन जीवनसृष्टि निर्माण होण्याच्या पूर्वींच बाष्पीभूत झाला; आणि

अनुकरणाचीं अनुकरणें होऊं लागलीं. दुथडी समृद्धि पिकविणाऱ्या जिवंत काव्यगंगेच्या ओघाच्या ठिकाणीं मृगजलाचे विलास मात्र दिसूं लागले."

वरील परिस्थितींत बदल होणें किती अगत्याचें आहे, आणि प्रतिभेला विशाल अनुभव, विस्तृत वाचन, दीर्घ परिश्रमशीलता यांची जोड दिल्यानेंच केवळ मराठी कविता निरोगी, निसर्गसुंदर व चैतन्यदायी कशी बनेल याचें मार्मिक विवेचन करून, आदर्श कवि कोण व त्याच्या काव्याचें स्वरूप कसें असलें पाहिजे हें सांगतांना ते म्हणाले: "संसारांतील विविध कलहांकडे योग्य सहानुभूतीनें पाहून जो संसारचित्रें रंगवील आणि कळकळीचे कां होईना पण नुसते उपदेशपाठ न देतां वाचकांना आपली दृष्टि देईल, आणि आपल्या कलाकृतीच्या करवीं सहानुभूतीच्या बळें, वाचकांच्या प्रवृत्तीला नकळत चांगलें वळण देईल त्याची कृति आदर्शभूत व शाश्वत समजावी. तो कवि धन्य होय. खोल ज्ञानामुळें, व्यापक सहानुभूतीमुळे, सूक्ष्म व दूरवर निरीक्षणामुळें आणि एक प्रकारच्या तटस्थपणामुळें अशा कवीची कृति जितकी मनोरंजक आणि हृदयंगम तितकीच ती उद्बोधक आणि वास्तव वठते." या प्रतीचा कवि महाराष्ट्रांत दुर्मिळ आहे. पण तशी स्थिति राहतां कामा नये. मराठीचें मराठपण जोपासून वाढविणारे कवि हवे आहेत. त्यांनीं प्रो. वासुदेव बळवंत पटवर्धन म्हणत त्याप्रमाणें 'महाराष्ट्राचें सामर्थ्य आणि भाग्य ऊर्जित दशेस आणून, महाराष्ट्राचा संसार खरोखर संसार होईल अशीं गीतें गाइलीं पाहिजेत,' असें कळकळीनें त्यानीं कविजनांना सांगितलें.

बडोद्यांतील या संमेलनाला महाराष्ट्रांतील व महाराष्ट्राबाहेरील अनेक नामवंत 'तसेच उदयोन्मुख' कवि हजर होते. या सर्वांशीं, कोणत्याहि प्रकारचा उपचार न बाळगतां, स्वतःचा परिचय करून घेऊन ते त्यांच्यांत समभावनेनें मिसळून गेले. या वेळची एक आठवण सौ. वत्सलाबाई घाटे यांनीं पुढील-प्रमाणें दिली आहे:

"बडोद्याच्या या साहित्यसंमेलनाच्या वेळीं कारे, बोरकर वगैरे बरेच होतकरू तरुण कवि आले होते. त्यांना या संमेलनामध्यें पुढें येण्याची फारशी

संधि मिळाली नव्हती. माधवरावांना हें बरें वाटलें नाहीं. माधवरावांशीं हे तरुण कवि आरंभीं दचकूनच वागत होते; पण माधवराव त्या सर्वांशीं समरस होऊन त्यांच्यांत रंगून गेले. त्यानीं आमच्या कँपच्या दिवाणखान्यांत अनौपचारिक काव्यगायनाचा समारंभ घडवून आणला. आरंभीं थोडींच माणसें होतीं. परंतु काव्यगायनाला जसा रंग चढत चालला तसे अधिकाधिक लोक जमूं लागले आणि खरें साहित्यसंमेलन त्या रात्रीं त्या दिवाणखान्यांत झालें, असेच सर्वांच्या तोंडून उद्गार निघाले. माधवराव त्या सर्व तरुण मंडळीच्या मध्यें बसून त्यांच्याशीं थट्टामस्करी करीत होते, त्यांना कविता म्हणण्यास आग्रह करीत होते व मधून मधून आपणहि कविता म्हणत होते. अशा तरुण कवींच्या जलशामध्यें सुद्धा माधवराव म्हातार्‍या कवींना विसरले नाहींत. चंद्रशेखर, ताबे, टिळक याच्या निवडक कविता म्हणून दाखवून त्यांनीं त्या तरुण कवींना जुन्या पिढींतील कवींच्या काव्याचा रसास्वाद कसा घ्यावा हें दाखविलें. हें सर्व करताना इंग्रजींत ज्याला Condescension (अनुग्रह दाखविण्याची वृत्ति) म्हणतात तसें माधवरावांचें वर्तन नव्हतें किंवा या तरुण पिढीचें पुढारीपण मिळविण्याची त्याची छुपी महत्त्वाकांक्षाहि नव्हती. त्यांचें वर्तन अत्यंत स्वाभाविक व अकृत्रिम होतें."

या बैठकीप्रमाणेंच आणखी एक बैठक, माधवरावांनीं कवि चंद्रशेखर यांच्या घरीं भरविली. त्या ज्येष्ठ व थोर कवीशीं त्यांनीं नवीन कवींचा व त्यांच्या कवितांचा परिचय करून दिला. चंद्रशेखर आणि ते स्वतः नवकवींच्या काव्यश्रवणांत विलक्षण रंगून गेले. सार्‍यानाच त्या रात्रीं धन्यता वाटली.

या संमेलनांत काव्यगायनाचा जो जाहीर कार्यक्रम झाला तो, कोणाचाहि निरुत्साह न करतां व कोणाच्याहि बाबतींत पक्षपात न दाखविता, काळाचें ताजवेतोल बंधन पाळून त्यानीं उत्तम प्रकारें यशस्वी करून दाखविला. 'केसरी' पत्राच्या प्रतिनिधीनें आपल्या वृत्तकथनात याविषयीं पुढीलप्रमाणें लिहिलें होतें: "संमेलनातील काव्यगायनाची प्रथा बडोद्यास १९२१ सालीं जन्मास आली. आणि बडोद्यासच तिची सुधारणा होत आहे हा मौजेचा योगायोग होय, असे समाधानाचे उद्गार काहीं पोक्त कवींनीं काढले. या कार्यक्रमांत एकंदर पंधरा-वीस कवींनीं दोन दोन कविता म्हणून–गाऊन

दाखविल्या. त्या निरंकुश कवींना अंकुश लावण्याचें काम काव्यविभागाचे अध्यक्ष प्रो. माधवराव पटवर्धन यांचेकडे साहजिक होतें! त्यामुळें गायनाला गोंधळाचें स्वरूप प्राप्त झालें नाहीं! संमेलनाच्या यशास्वितेचा हाहि कांहीं लहानसान घटक नव्हे!"

बडोद्याच्या या साहित्यसंमेलनांत त्यांच्या मोहक वक्तृत्वाचा व भावनावश न होतां समतोलपणें प्रतिपक्षाच्या विचारांचा परिणामकारक समाचार घेण्याच्या कौशल्याचा अनेकांना नव्यानेंच परिचय घडला. संमेलनांतील 'अनिष्ट लिखाणा'वरील [1] चर्चेंतील त्यांचें भाषण अविस्मरणीय असें होतें. ठराव नागपूरचे प्रा. शं. दा. पेंडसे यांनीं मांडला होता व त्याला प्रमुख विरोध 'किर्लोस्कर' मासिकाचे संपादक शंकरराव किर्लोस्कर[2] यांचा होता. माधवरावांचें हें भाषण, त्यांच्या वक्तृत्वगुणाबरोबरच प्रेम आणि श्लीलाश्लीलता यांवरील विचारांचें यथार्थ दर्शन घडविणारें असल्यामुळें येथें देतों:[3]

---

[1] चर्चाविषय झालेला ठराव पुढीलप्रमाणें होता: "निर्मल आनंद व उदात्त भावना यांची जागृति हें ललित वाङ्मयाचें ध्येय आहे. हें विसरून कित्येक लेखक क्षुद्र विकारांना चेतविणारें लिखाण कळत नकळत लिहीत असतात. अशा अनिष्ट लिखाणांचा हें संमेलन निषेध करीत आहे."

[2] शंकरराव किर्लोस्कर म्हणाले होते: "क्षुद्र विकारांना चेतविणारें वाङ्मय नको असेंच माझें मत आहे. मलाहि निर्मल आनंद पाहिजे. पण मानवी भावना मी क्षुद्र समजत नाहीं. प्रेम करण्यांत वाईट तें काय आहे? पुरुषांना आकर्षक अशी जर कोणती वस्तु असेल तर ती स्त्री हीच होय. स्त्री-पुरुषांच्या एकमेकांवरील प्रेमांतूनच स्वार्थत्याग व पराक्रम जन्म पावतात. प्रत्येकाला विकाराची आवश्यकता असतांना क्षुद्र विकाराची व्याख्या कोणीं करावयाची? असल्या तऱ्हेच्या ठरावांनीं महाराष्ट्रीय समाजाची नाचक्की होत आहे. हा ठरावच मुळीं क्षुद्र आहे."

[3] पारिजात मासिक, जानेवारी १९३५. 'पारिजातकारां'च्या आग्रहावरून माधवरावांनीं स्वतःच आपल्या व्याख्यानाचा हा सारांश त्यांजकडे लिहून धाडला होता.

"मघांशीं श्री. सौ. अनसूयाबाई काळे यांनीं आपल्या अनुमोदक भाषणांत अशी सूचना केली कीं, कोणतेंहि वाङ्मय प्रकाशित होण्याच्या पूर्वी 'महाराष्ट्र-साहित्य-परिषदे' सारख्या एखाद्या संस्थेकडून तें परीक्षिलें जावें, आणि अशा रीतीनें परीक्षा होऊन ज्या लिखाणाला मान्यता मिळेल त्यालाच प्रकाशनाची परवानगी मिळावी. 'नाहीं!' असें ओरडून मीं त्याच वेळीं या सूचनेचा निषेध केला. वाङ्मयाच्या निर्मितीवर आम्हांला कोणत्याहि संस्थेचें नियंत्रण नको. अशी संस्था कितीहि प्रतिष्ठित आणि निःपक्षपाती असली तरी तिचें कायदेशीर नियंत्रण अनर्थावह झाल्यावांचून राहणार नाहीं. सुसंस्कृत समाजाच्या सदभिरुचीमुळें अप्रत्यक्षपणें जेवढें नियंत्रण होतें तेवढें पुरे आहे."

"श्री. शंकरराव किर्लोस्कर यांनीं आपल्या भाषणांत ज्या प्रेमाचें महत्त्व सांगतलें त्याच प्रेमाच्या कविता मी आजपर्यंत लिहीत आलों आहें. पुढेंहि त्या मी लिहीन अशी आशा आहे. केसरीचे संपादक (वा. कृ. भावे) यांनीं केसरींतील आपल्या एका लेखांत, समाजाला जाणून बुजून अनीतीच्या मार्गाला नेऊं पाहणारा अशा अर्थाच्या शब्दांनीं माझी संभावना केली आहे! अशा रीतीनें अनीतिकारक प्रेमकवि म्हणून माझा बोभाटा झाला असूनहि मी या ठरावाला पाठिंबा देण्यासाठीं उभा राहिलों आहें. दिसायला हें चमत्कारिक दिसतें, पण माझ्या मनात क्रांति अशी मुळींच झालेली नाहीं. केस पांढरे झाले असले तरी मन तरुण आहे. वेष विलायती धर्तीचा हा असा आहे. धाबळी नेसून गोमुखींत हात घालून बसून मी माळ ओढूं लागलों नाहीं."

"आहे या स्वरूपांत हा ठराव मान्य झाला कीं, तेवढ्यानें अनिष्ट वाङ्मयाला तत्काळ आळा बसेल अशी बळकट आशा मला तरी वाटत नाहीं. उलट पक्षीं हा ठराव फेटाळला गेला तर तेवढ्यानें अनिष्ट वाङ्मयाला महापूर येईल आणि समाजांत प्रलय होईल, अशीहि भीति मला वाटत नाहीं. प्रसृत होणाऱ्या वाङ्मयापैकीं काही भागाविषयीं समाजांतील अनुभवी पण रसिक माणसांना काय वाटतें हेंच या ठरावाच्या द्वारें व्यक्त होणार आहे. या ठरावाला मान्यता द्या अशी विनंती करण्यापूर्वी याचें थोडें स्पष्टीकरण करणार आहें. मी आपल्यापुढें युक्तिवादच मांडणार आहें. आपली स्तुति करून मला

आपली सहानुभूति जागृत करावयाची नाहीं. आपण माझ्या म्हणण्याचा शांतपणानें विचार करून योग्य वाटेल त्या पक्षाला मत द्या."

"क्षुद्र विकारांना चेतविणाऱ्या वाङ्मयाची अनिष्टता व्यक्त करून हा ठराव त्याचा निषेध करीत आहे. परंतु क्षुद्रता ही सापेक्ष आहे. काटेकोरपणानें अमुक क्षुद्र आणि तमुक अक्षुद्र अशी वर्गवारी करितां येणें अति कठिण आहे. माझ्या एका वेदान्तप्रिय मित्राला श्री. अत्रे यांचीं विडंबन काव्यें हीं क्षुद्र वाटतात; पण मित्रांच्या सहवासात तीं ऐकत असताना त्याला मनापासून हसूं लोटतें. तथापि तो त्याला कालाचा अपव्ययच समजतो. या दुःखमय जगांत मनमोकळेपणानें घटिकाभर हसविणारें, रिझविणारें विडंबनकाव्य मला मुळींच क्षुद्र वाटत नाहीं. मनुष्याला आनंद देणाऱ्या अशा अनेक क्षुद्र गोष्टी आहेत. त्या साऱ्या मला हव्या आहेत. या ठरावामुळें त्यांचा निषेध होतो असें मला वाटत नाहीं."

"परंतु क्षुद्र विचारांना चेतविणारें वाङ्मय कोणतें हें बहुतेकांना सहज कळतें. हा ठराव अश्लीलतेविरुद्ध नाहीं. अश्लील काय हें काहीं वाक्यांवरून वा एखाद्या प्रकरणावरून ठरवावयाचें नसून साकल्यानें विचार करतां मनावर कोणता परिणाम होतो यावरून ठरवायचें आहे. वाङ्मयांत थोडासा शाब्दिक चावटपणा करावासा वाटणें हा मनुष्यस्वभाव आहे. तेव्हां असा मर्यादित चावटपणा लालित्यानें युक्त असला तर तो केव्हांहि क्षम्यच आहे. कांहीं वाक्यांत चावटपणा आहे वा एखाद्या प्रकरणांत थोडा उत्तान शृंगार आहे, तेव्हां तेवढ्यासाठीं त्या पुस्तकाचा निषेध आणि नाश केला पाहिजे असें मी तरी केव्हांहि म्हणणार नाहीं. अश्लीलता ही केव्हां केव्हां केवळ क्षम्यच नव्हे तर समर्थनीयहि असते, कलादृष्ट्या अपरिहार्य असते. आयोगोच्या तोंडचीं अश्लील वाक्यें काढून टाका, त्याच्या स्वभावाचें मर्मच समजणार नाहीं. शालेय आवृत्तींतून तीं वाक्यें काढून टाका, प्रत्यवाय नाहीं. पण मोठेपणीं शेक्सपिअरच्या कलाकृतींचें पूर्ण स्वारस्य समजायला त्यांची आवश्यकता आहे. अशा दर्शनी अश्लीलतेविरुद्ध हा ठराव नाहीं असें मी समजतों."

"मग हा ठराव आहे तरी कशाच्या विरुद्ध ? तेंच सांगण्याचा मी आतां प्रयत्न करणार आहें. स्पष्टीकरणासाठीं मी एक उदाहरणच आधीं घेतों.

कदाचित् कोणाला ही माझी भाषा अश्लील वाटेल, पण हा शास्त्रीय व स्पष्ट विवेचनाचा प्रसंग आहे. येथें श्लीलाश्लील हा प्रश्न संभवत नाहीं. मी एकदां एका चित्रकाराच्या संगतींत एका बंगाली चित्रकारानें काढलेलें चित्र पाहात होतों. चित्र एका सुंदर तरुणीचें होतें. तिचा तोंडवळा सुंदर, तिच्या शरीराचें ठाणमाण सुंदर व सप्रमाण होतें. ती आपल्या खोलींत हातांत एक पत्र घेऊन सचिंत, एक प्रकारच्या तंद्रेंत पडली होती. तिचा एकच स्तन उघडा, विवस्त्र पडला होता. मीं त्या चित्रकाराला म्हटलें, 'मी पूर्ण नग्नावस्थेचीं चित्रें पाहीन. मी तसा सोंवळा नाहीं, पण आपण पुरुष झोंपेंतल्या झोंपेंत या कुशीवरून त्या कुशीवर होतांना धोतर कसें सांवरून निजतों. स्त्रिया तर आपल्या चोळीवरील पदराला सुद्धां किती जपतात? मग या चित्रांत या स्त्रीचा एक स्तन विवस्त्र ठेवण्यांत कलेचें कोणतें मर्म आहे तें कृपा करून सांगा.' त्या चित्रकारानें प्रामाणिकपणानें सांगितलें कीं, चित्र लवकर खपावें म्हणून ही युक्ति आहे, हिचा कलेशीं कांहीं संबंध नाहीं."

"या फसवणुकीविरुद्ध हा ठराव आहे. साकल्यानें विचार करतां जर एखाद्या पुस्तकाचा उद्देश कामवासनेला मधून मधून गुदगुल्या करून, मन खिजवून, पुस्तक खपवून अर्थलाभ करून घेणें, असा दिसत असेल तर त्याचा निषेध अवश्यमेव केला पाहिजे. प्रेमविहाराच्या, या कलाविलासाच्या केवळ नांवाखालीं लपणाऱ्या नंगेपणाचें समर्थन होऊं शकणार नाहीं."

"टॉलस्टॉयची 'रिसरेक्शन' कादंबरी वाचल्यावर तुमच्या अंतःकरणांत कामवासना राहणारच नाहीं असें टॉलस्टॉय म्हणतो. प्रकाशाबरोबर जशी छाया तसें चांगल्या बरोबर थोडें वाईट असावयाचेंच. प्रेम नको आहे असें नाहीं. वाटेल तितक्या गुलगुल गोष्टी करा! प्रेम करायला आपल्याला मुळींच प्रतिबंध नाहीं. एका काळीं बापाला त्यांचीं वडील मनुष्यें घरांत असतांना आपल्या मुलाचें कौतुक करतां येत नसे, तें अशिष्ट समजलें जाई. त्यांत वडिलांचा अपमान होतो असें वाडिलांना वाटे. तो काळ आतां पार बदलला आहे. प्रेम करूं नका असें मी तरी म्हणत नाहीं. सुखेनैव प्रेमाच्या गुलगुल गोष्टी करा, प्रणयोत्तर विवाह करा; परिणाम धैर्यानें सोसण्याचें ठरवून डोळस-पणानें, प्रामाणिकपणानें कांहींहि करा; परंतु प्रेम म्हणजे स्वैराचार नव्हे. प्रेम

म्हणजे चावटपणाहि नव्हे. कामवासना ही एक महत्त्वाची क्षुधा आहे; मान्य आहे. पण तेवढ्यावरून अष्टौप्रहर ललित शब्दांनीं कामस्मरण करणें स्वाभाविक आणि निरामय ठरणार नाहीं. या वृत्ति पार दडपून टाकणें अशक्य व अनर्थावह होत असेल; पण तेवढ्यानें त्यांचें उच्छृंखल थैमान हें काहीं ललित, नृत्याचें विलसित ठरत नाहीं. आत्मसंयमाचें महत्त्व नष्ट झालेलें नाहीं. या प्रकरणीं इकडील विद्वानांचें मत आपल्याला तितकेंसें ग्राह्य वाटणार नाहीं. म्हणूनच ज्या ड्युरंटसाहेबांच्या ग्रंथाचा अनुवाद किर्लोस्कर मासिकांतील आधुनिक गीतेंत झाला आहे, त्याच ड्युरंटसाहेबांचें मत आपल्याला सांगतों. हें मत या गीतेंत अद्यापि प्रगट झालें नाहीं. ड्युरंटसाहेब म्हणतात: "आम्ही आपल्या सोवळ्या (प्युरिटन) पूर्वजांना हसतों; परंतु जेव्हां कठिण प्रसंग येईल तेव्हां याच सोवळ्या गुणांची आवश्यकता भासेल. ती आणीबाणीची वेळ येऊन ठेपलीच आहे. आधुनिक इतिहासांत लूथरपासून लेनिनपर्यंत जे जे समर्थ कार्यकर्ते होऊन गेले त्यांच्यांत जो निष्ठुर आत्मसंयम, जी श्रमशीलता, चिकाटी आणि तितिक्षा होती, त्यांचीच आज अत्यंत आवश्यकता आहे."

"याप्रमाणें क्षुद्र विकारांना चेतविणारें अनिष्ट वाङ्मय कोणतें व त्याच्या मर्यादा कोणत्या हें मी इतका वेळ सांगितल्यानंतर हा निरुपद्रवी ठराव मान्य व्हावयाला कोणताच प्रत्यवाय नसावा, आपण सर्वांनीं तो मान्य करावा अशी माझी विनंती आहे."

हा ठराव प्रचंड बहुमतानें पास तर झालाच पण त्याबरोबरच उभय पक्षांकडून माधवरावांच्या विवेकपूर्ण वकिलीची वाखाणणीहि खूप झाली.

हें संमेलन भरलें त्याच सालीं मार्च महिन्यांत, बडोद्याचे महाराज श्रीमंत सयाजीराव यांना माधवरावांचा परिचय करून घेण्याची इच्छा झाल्यामुळें मुद्दाम त्यांस बडोद्यास बोलावून घेण्यांत आलें. महाराजाचें त्यांच्याशीं जवळ जवळ दीड तास विस्तारानें बोलणें झालें. त्यांनीं आस्थापूर्वक त्यांची विचारपूस केली व 'पुन्हां बोलावीन तेव्हां अवश्य या' असें ते म्हणाले. महाराजांचा विचार त्यांना खानगीकडे घ्यावयाचा होता. परंतु माधवरावांना किंवा त्यांचे बडोदेकर मित्र श्री. शिंदे यांना तें पसंत नव्हतें; विद्याखात्यांत त्याची चांगल्या

पगाराच्या जागीं नेमणूक होईल तरच त्यांनीं कोल्हापूर सोडणें युक्त असें त्यांना वाटे. पण विद्याखात्यांत त्या वेळेस माधवरावांना योग्य अशी जागा मोकळी नव्हती, त्यामुळें त्या विचारास पुढें चालना मिळाली नाहीं. पण महाराज माधवरावांना विसरले नाहींत. त्यानीं त्यांना पुढल्या वर्षी (१९३५) सन्मानपूर्वक पाचारण करून दरबारकडून त्यांची संभावना केली व त्यांचें एक जाहीर व्याख्यानहि करविलें. महाराज या व्याख्यानास प्रारंभापासून अखेरपर्यंत उपस्थित होते. त्यांनीं मोठ्या आस्थेनें तें ऐकलें व मागाहून त्यांना वाड्यांत बोलावून थोडा सुखसंवादहि केला. आपल्या जन्मग्रामीं लागोपाठ दोन वर्षें झालेला हा सन्मान पाहून त्यांचें अंतःकरण साहजिकच भारावून जाऊन, त्यांच्या डोळयांत समाधानाचीं आंसवें उभीं राहिलीं. इतर कोणत्याहि सन्मानापेक्षां हा सन्मान त्यांना बहुमोलाचा वाटला. गतकाळांत त्यांच्या झालेल्या लौकिकाची हानि, वर्तमानकाळांत अनेक पटींनीं भरून येत होती. १९३६ सालीं जळगांव येथें भरलेल्या साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षपदाचा मान मिळाल्यामुळें तर या लौकिकांत फार मोठी भर पडली. १९२४ सालीं निंदा, नालस्ती आणि वैर यांमुळें त्रस्त झालेले, आयुष्यांत आतां आपण कधींच सुस्थिर होणार नाहीं असे वैतागानें उद्गार काढणारे माधवराव, राजमान्य तसेच लोकमान्य होत चालले होते.

# १५

# जळगांवचें साहित्यसंमेलन

इंदूरच्या साहित्यसंमेलनाचे वेळेस जळगांवकरांनीं पुढील (१९३६) संमेलन आपल्या गांवीं भरविण्याचें आमंत्रण ज्या वेळीं दिलें, त्याच वेळीं जळगांवांतील बऱ्याच मंडळींनीं या संमेलनाचें अध्यक्षपद माधवरावांसच द्यावयाचें असें जवळ जवळ ठरवून टाकलें होतें. अर्थातच साहित्य-परिषदे-कडून, नियमाप्रमाणें सुचविल्या जाणाऱ्या पांच नांवांमध्यें त्यांचें नांव आधीं येणें आवश्यक होतें. त्याप्रमाणें तें आलेंहि. माधवरावांच्या नांवाबरोबरच, रियासतकार गोविंदराव सरदेसाई, लक्ष्मण रामचंद्र पांगारकर, भार्गवराम विठ्ठल ऊर्फ मामा वरेरकर, भास्करराव तांबे अशीं चार नांवें सुचविलीं गेलीं होतीं. हे सर्व साहित्यिक माधवरावापेक्षां वयानें वडील व आपापल्या क्षेत्रांत विपुल ख्याति मिळविलेले असे होते. यापैकीं प्रत्येकजण वाङ्मयक्षेत्रांतील या थोर व स्पृहणीय मानास पात्र होता. पण जळगावकरांना, माधवरावांबद्दल विशेष प्रेम व आत्मीयता वाटत असल्यामुळें त्यांचाच त्यानीं बहुमतानें स्वीकार केला. त्यांना हवा होता तसा अध्यक्ष त्यानीं निवडला. जळगांवाबाहेर अनेकांना ती निवड पसंत पडली नाहीं. रियासतकार सरदेसाई, भास्करराव तांबे किंवा पांगारकर यांपैकीं कोणातरी एकाला निवडण्यांत अधिक औचित्य दिसलें असतें, असे उद्गार वयस्क मंडळींत निघूं लागले. निवडणुकीच्या वादांत सहसा भाग न घेणारे नाटककार यशवंतराव टिपणीस, संतकविचरित्रकार जगन्नाथ रघुनाथ आजगांवकर यासारखे लोक वर्तमानपत्रातून लिहूं लागले कीं: "रियासतकारांचें नांव सुचविण्यात आल्यावर त्यांची निवड एकमतानेंच व्हावयाला हवी होती, इतकी त्यांची साहित्यसेवा श्रेष्ठ प्रतीची आहे. परंतु 'काव्यरत्नावली'मुळें जळगांवकरांचा कवितेकडे जास्त ओढा व कार्यकारी

मंडळाच्या चिटणिसांत एक सुप्रसिद्ध कवि, यामुळेंच निवड करणारांचा कांटा कवि अध्यक्ष निवडण्याकडे झुकला असावा असें वाटतें. वयोवृद्ध व्यक्तींची दीर्घकालीन देशसेवा बाजूला सारून तडफदार तरुणाची निवड अध्यक्ष-पदासाठीं करण्याची प्रथा राष्ट्रीय सभेनें पाडली आहे. परंतु पं. जवाहरलाल यांनीं राजकारणांत जी धडाडी व तडफ दाखविली त्याच्या शतांश तरी धडाडी किंवा तडफ मराठी साहित्यक्षेत्रांत प्रो. माधवराव पटवर्धनानीं दाखविली आहे काय ? प्रो. माधवराव अत्यंत थोर व उदार मनाचे कविसाहित्यिक आहेत. रिसायतकारांच्या बाबतींत आपल्यामुळें संमेलनाकडून अन्याय होत आहे असें जर त्यांना वाटत असेल, तर त्यांनीं अध्यक्षाची जागा रिसायतकारांकरितां मोकळी करावी, यांतच त्यांचा मोठेपणा आहे. प्रत्यक्ष अध्यक्षपदापेक्षांहि शतपट श्रेष्ठ पदाचा लाभ यामुळें त्यांना होईल ; आणि मग मात्र माधवरावांनीं योग्य तडफ दाखविल्याबद्दल त्यांचा साऱ्या महाराष्ट्रभर गौरव होईल !" [1]

" जळगांव येथील मराठी-साहित्य-संमेलनाचें अध्यक्षस्थान माझे मित्र प्रो. माधवराव पटवर्धन यांना देण्यांत आल्याचें ऐकून मला जसा आनंद झाला तसाच थोडासा विषादहि वाटला. प्रो. पटवर्धन हे अध्यक्षत्वाच्या मानास पुष्कळ अंशीं पात्र आहेत असें माझें मत असल्यामुळें तो मान त्यांना इतक्या लवकर मिळाल्याबद्दल मला आनंद झाला. परंतु विषाद वाटण्याचें कारण प्रो. पटवर्धनापेक्षां वयानें, विद्वत्तेनें व योग्यतेनेंहि श्रेष्ठ असे प्रथितयश वाङ्मयभक्त उपलब्ध असतां त्यांना वगळून प्रो. पटवर्धन यांस निवडण्यांत जें अनौचित्य दिसून आलें तें होय. रियासतकार सरदेसाई, संतचरित्रकार पांगारकर, समर्थभक्त देव, कविवर्य तांबे व चंद्रशेखर, दीर्घकालीन वाङ्मयसेवक सोमण ( किरात ) यापैकीं कोणास तरी हा मान मिळावयास पाहिजे होता, परंतु प्रो. पटवर्धन यांच्या निवडणुकीमुळें वय आणि विद्वत्ता याची कदर महाराष्ट्री-यांस आतां उरली नाहीं असें म्हणण्याचा प्रसंग आला आहे. खुद्द प्रो. पटवर्धन हे जरी या गोष्टीचा शांतपणें विचार करतील, तर त्याना देखील वरील ज्येष्ठ व श्रेष्ठ लेखकाच्या बाबतींत झालेला हा अन्याय पटेल अशी माझी खात्री आहे." [2]

---

[1] य. ना. टिपणीस. [2] ज. र. आजगावकर.

अध्यक्षपदासाठीं साहित्य-परिषदेनें सुचविलेल्या पांच व्यक्तींपैकीं एक श्री. वरेरकर यांनींहि थोडासा शिष्टाचार बाजूस ठेवून जेव्हां या वादांत, मुंबईच्या 'मौज'[3] पत्राला मुलाखत देऊन भाग घेतला, तेव्हां तर त्याला विशेषच रंग चढला. श्री. वरेरकर यांची मुलाखत पुढीलप्रमाणें:

प्रश्न १: संमेलनाच्या अध्यक्षाची निवड आपणास मान्य आहे काय?

उत्तर: सदरहु निवड होण्याच्या बाबतींत जळगांवकरांनीं आपली बुद्धि पूर्ण प्रमाणांत वापरली असें वाटत नाहीं. रा. सा. सरदेसाई व पांगारकर यांच्यासारखीं मराठी वाङ्मयाच्या व इतिहासाच्या संशोधनकार्यांत स्वार्थत्यागपूर्वक कार्य केलेलीं साहित्योपजीवि दोन मोठीं माणसें समोर असतां, कविवर्य तांबे यांच्याखेरीज इतरांची निवड होणें हें माझ्या मतें तरी सयुक्तिक वाटत नाहीं.

प्रश्न २: 'मौजे'तील राजिनाम्याची मागणी आपणांस कितपत मान्य आहे?

उत्तर: बऱ्याच पत्रांत आरडाओरड झाल्याप्रमाणें, जर माझी निवड झाली असती तर मीं सरळ राजीनामा दिला असता. साहित्य-परिषदेची जी नवीन घटना या वेळेला मजूर होणें अवश्य आहे, त्या कार्याच्या महत्त्वामुळें मला राजीनामा देणें भाग झालें असतें. इतकेंच नव्हे तर अशी जरी घटना मंजूर व्हावयाची नसती, तरीहि वर्षानुवर्षे कामगिरी करीत असलेल्या साहित्योपजीवि माणसाना बुद्धिपुरःसर असो किंवा इतर कांहीं कारणामुळें असो, ज्या पंचक्रोशींत वगळलें जातें, त्या पंचक्रोशींतल्या अध्यक्षपदावर बसण्यांत मला शरम वाटली असती.

[3] मौज, २८ ऑक्टोबर, १९३६

प्रश्न ३ : माधवराव पटवर्धन यांच्या अभिनंदनार्थ पुण्यांत झालेल्या सभेंत रावसाहेब चापेकरांनीं काढलेल्या परिषद्-घटनाविषयक उद्गारांबद्दल आपणांस काय वाटतें ?

उत्तर : या बाबतींत रावसाहेब चापेकरांशीं माझें एकमत आहे. प्रस्तुतच्या परिषदेच्या घटनेचा खर्डा चर्चिला जाण्यासाठीं महाराष्ट्र–परिषदेच्या आजच्या कार्यकारी मंडळीला जशा अध्यक्षाची आवश्यकता आहे, तशाच अध्यक्षाची ही निवड झालेली आहे. आणि म्हणूनच नव्या घटनेच्या पुरस्कर्त्यांना अध्यक्षाची निवड योग्य झाली आहे असें वाटणार नाहीं.

प्रश्न ४ : ××× यांनीं अधिवेशनांत विरोध करावयाचा दिलेला इषारा तुम्हांस मान्य आहे काय ?

उत्तर : बहुजनसमाजाच्या मतभेदाच्या वेळीं कोणतें धोरण ठेवावें याचें सर्वांत मोठें उदाहरण म्हणजे लो. टिळकांचें होय. कार्याच्या महत्त्वाकडे लक्ष देतांना संस्थेच्या इभ्रतीकडे केव्हांहि पाहूं नये; याचें उदाहरण सुरतेच्या कॉंग्रेसचा इतिहास होय. लोकमान्यांचें अनुकरण करणारी प्रत्येक व्यक्ति मला आदरणीय आहे.

प्रश्न ५ : अभिनंदनाचा हा प्रकार कारवाई आहे असें आपणांस वाटतें काय ?

उत्तर : हा प्रश्न निदान मला आपण करावयास नको होता. ही कारवाई आहे असें जरी मीं म्हटलें तरी पुण्याच्या साहित्यिक कंपूशाहींतील कोणती व्यक्ति तें कबूल करील ?

वरेरकर यांच्या या मुलाखतीचा समाचार अनंत हरी गद्रे यांनीं आपल्या 'निर्भीड' साप्ताहिकांतून पुढीलप्रमाणें घेतला होता :

"गेल्या अंकांत 'मौज'कारांनीं प्रो. पटवर्धनांच्या अध्यक्षपदाबद्दल मामांची मुलाखत प्रसिद्ध केली आहे. या मुलाखतींत बोलण्याच्या भरांत ते

एकदम बोलून गेले कीं ' जर माझी निवड झाली असती, तर मीं राजीनामा दिला असता.... अध्यक्षपदावर बसण्यांत मला शरम वाटली असती.' मामांचे हे उद्गार कोणालाहि निस्पृहतेचे व बाणेदार वाटले असते, पण केव्हां ? ठाण्याला आपल्याबरोबर रावसाहेब सरदेसाई यांचें नांव अध्यक्षपदासाठीं सुचविलें गेलें असतांना ' वर्षांनुवर्षें कामगिरी करीत असलेल्या साहित्योपजीवि सरदेसायांना ' दूर सारून आपण अध्यक्षपदाची माळ आपल्या गळ्यांत घालून घेतली हें ते विसरले नसते तर !"

" प्रो. पटवर्धनाऐवजीं आपली निवड झाली असती, तर रा. सा. सरदेसाई प्रभृती जुन्या विद्वानांना संधि देण्याकरितां म्हणून मीं राजीनामा दिला असता, असे मानभावीपणाचे उद्गार काढणारे मामा ठाण्याच्या मुंबई मराठी साहित्य-संमेलनाच्या अध्यक्षपदाचा राजीनामा देऊन रावसाहेब सरदेसाई यांचेबद्दल असणारा आदर कां व्यक्त करीत नाहींत, असा माझा त्यांस निर्भीड सवाल आहे. ठाण्याच्या संमेलनाच्या अध्यक्षपदासाठीं मामाच्या जोडीला रावसाहेब सरदेसाई यांचेंहि नाव होतें ; असें असूनसुद्धां मामांनीं तें अध्यक्षपद स्वीकारलें यावरून ' मीं राजीनामा दिला असता ' हे त्याचे उद्गार मानभावीपणाचेच वाटत नाहींत काय ? रा. सा. सरदेसाई याच्यासारख्या ' वर्षांनुवर्षें कामगिरी करीत असलेल्या साहित्योपजीवि माणसाला ज्या पंचक्रोशींत वगळलें जातें त्याच पंचक्रोशींतील अध्यक्षपदावर ' बसण्यांत मामांना कांहींच वाटत नाहीं काय ? दुसऱ्यांना ब्रह्मज्ञान शिकवितांना आपल्या पायाखालीं काय जळतें आहे याची जाणीव ठेवावी लागते हें मामांना ठाऊक नाहीं काय ?"

" यंदा जळगांव येथें भरणाऱ्या महाराष्ट्र–साहित्य–समेलनाचें अध्यक्षपद कीर्तिवंत विद्वान् कवि प्रो. माधवराव पटवर्धन यांच्यासारख्या तरुण व तडफदार साहित्यिकाला दिलें गेलें ही गोष्ट बरीच झाली. अध्यक्षपदासाठीं रावसाहेब सरदेसाई, ह. भ. प. पांगारकर, कविवर्य ताबे, मामा वरेरकर याचींहि नावें सुचविलीं गेलीं होतीं. परंतु प्रो. पटवर्धन यांनाच सर्वांत जास्त मतें पडलीं व शेवटीं अध्यक्षपदाची माळ त्यांच्याच गळयांत पडली. प्रो. पटवर्धन यांची विद्वत्ता, निर्भीडपणा, निस्पृहपणा ते अध्यक्षपदाला योग्य असल्याची ग्वाही देत आहेत. प्रो. पटवर्धन हे नुसतेच कवि नाहींत तर

विद्वानहि आहेत ही गोष्ट समाधानाची आहे. कवि लोकांबद्दल माझें प्रो. माटे यांच्याप्रमाणें अगदींच वाईट मत नसलें तरी केवळ कवि असलेल्या साहित्यिकाला अध्यक्षपदावर बसवणें उचित नाहीं असें मला वाटतें."

"प्रो. पटवर्धनांप्रमाणेंच रावसाहेब सरदेसाई, पांगारकर वगैरे विद्वान् व वृद्ध साहित्यिकांचीं नावें अध्यक्षपदासाठीं सुचविलीं गेलीं असतां त्यांना डावलून प्रो. पटवर्धनांचीच निवड करण्यांत जळगांवकरांनीं मोठी चूक करून ठेविली आहे अशी ओरड सध्यां कांहीं विवक्षित लोकांनीं चालविलेली दिसून येते. तौलनिक दृष्ट्या रावसाहेब सरदेसाई, पांगारकर वगैरेंची विद्वत्ता व वयोमान प्रो. पटवर्धन यांच्यापेक्षां जास्त आहे ही गोष्ट जरी बऱ्याच अंशीं खरी असली, तरी प्रो. पटवर्धन हे अध्यक्षपदास सर्वस्वी लायक असतां त्यांच्याविरुद्ध ओरड करण्यांत स्वारस्य काय? तसेंच प्रो. पटवर्धनाची एकदा अध्यक्ष म्हणून प्रचंड बहुमतानें निवड झाल्यानंतर मागाहून त्याला विरोध करणें गैरशिस्तपणाचेंच होत नाहीं काय? रावसाहेब सरदेसाई प्रभृति प्रो. पटवर्धनापेक्षा विद्वत्तेनें श्रेष्ठ असले तरी प्रो. पटवर्धन यांची झालेली निवड अयोग्य नाहीं असेंच मला वाटतें."

"प्रो. पटवर्धन यांच्याविरुद्ध चाललेली ओरड निष्कारण आहे हें मीं वर स्पष्टपणें सांगितलेंच आहे. उगाच काहीं तरी वाद काढून संमेलनाच्या कार्यांत अडचणी उत्पन्न करण्यांत विशेषसा फायदा आहे असें मला वाटत नाहीं. प्रो. पटवर्धन हे आपल्या निर्भीड व निःपक्षपाती वृत्तीनें, यंदा त्यांच्यावर पडलेली महत्त्वाची जबाबदारी यशस्वी रीतीनें पार पाडतील अशी मला खात्री वाटते. पण संमेलन यशस्वी होणें हें पूर्णपणें संमेलनाध्यक्षावर अवलंबून नसतें. सर्व साहित्यिकांनीं आपणांमधील भेदभाव थोडा वेळ बाजूला सारून संमेलन यशस्वी करावें, अशी विनंती केल्यास ती अयोग्य होईल काय?"

माधवरावांना मिळालेल्या या अध्यक्षपदासंबंधीं जें वादंग माजलें त्याचें तटस्थतेनें निरीक्षण केलें असतां, तत्त्वनिष्ठेपेक्षां मात्सर्याचाच भाग त्याच्या मुळाशीं अधिक होता असेंच म्हणावें लागेल. 'प्रतिभा' पाक्षिकांत [४]

[४] ता. १ डिसेंबर, १९३६.

'रामशास्त्री' यांनीं या प्रकरणीं लिहिलें होतें कीं, "या सर्व विरोधकांना रियासतकार सरदेसाई प्रभृतींचा या वेळीं जबरदस्त प्रेमपान्हा फुटला आहे! परंतु गतवर्षी श्रीमंत बाळासाहेब पंतप्रतिनिधी यांची इंदूर-साहित्य-संमेलनाच्या अध्यक्षपदावर स्थापना झाली, त्या वेळीं हे सर्व वीरपुंगव कोणत्या वाघाची शिकार करण्यांत गुंग झाले होते बरें? तेव्हां त्यांनीं राजेसाहेबाच्या निवडणुकीला विरोध का दर्शविला नाहीं? कीं सरदेसाई वगैरेपेक्षाहि राजेसाहेबांची वाङ्मयीन कामगिरी त्यांना अधिक भरदार वाटली? तात्पर्य, सरदेसाई प्रभृतींचा या विरोधकांना एवढ्यांत आलेला पुळका अगदीं दिखाऊ आहे. प्रो. पटवर्धन यांना अपशकून करण्यासाठींच ते त्यांचीं नांवें पुढें करीत आहेत. एरवीं गेल्या सालीं ते असे मूग गिळून स्वस्थ कां बसले असते?"

वृत्तपत्रांतून, निवडणुकीसंबंधीं हे वादविवाद जसे चालू होते, तसेच खासगी बैठकांतूनहि कांहीं प्रवाद निघत होते. माधवरावांना हें कांहीं अनपेक्षित नव्हतें. त्यांना त्याबद्दल विषाद किंवा हर्ष वाटत नव्हता. पण जेव्हां एकदां, असे प्रवाद उठविणाऱ्यांत स्वतःस स्नेही म्हणविणारे प्रो. पंगूंसारखे कांहीं लोकहि असल्याचें त्यांना आढळलें, तेव्हां त्यांना फार वाईट वाटलें. कवि गिरीश यांस कोल्हापुराहून ता. १-१२-३६ रोजीं ते लिहितात: "इथें आल्यापासून मी वर्तमानपत्रांतील लेखी वा इतरत्र तोंडी टीकांचा आस्वाद घेत आहें: 'कांहीं नाहीं हो! सोनाळकरांनीं आपल्या मित्राला वर निवडून आणलें' असें प्रो. पंगू म्हणतात म्हणून इतर सांगतात आणि इतर म्हणतात म्हणून प्रो. पंगू सांगतात. कां, आहे कीं नाहीं गम्मत? आणि नाहींतर शत्रु का निवडून आणणार आहेत? पुन्हां 'नगर वाचनमंदिराच्या विद्यमानें तुमचा सन्मान करावयाचा आहे' असें चिटणीस प्रो. पंगू यांचें सांगणें आहेच. मीं तो सार्वजनिक सन्मान नाकारिला. 'मला कोल्हापुरांत अज्ञात राहावयाचें आहे' असें मीं स्पष्ट कळविलें."

संमेलनाचा दिवस जसजसा जवळ येत चालला तसतसा वादाचा धुरोळा अधिकाधिकच उठत चालला. "आपल्या मनाचा मोठेपणा दाखवून वृद्धांबद्दल आदर व्यक्त करण्याची संधि साधा, असें आम्हीं सांगत असतां पटवर्धन ऐकत नाहींत; अध्यक्षीय स्थानावर चढूं पाहात आहेत. ठीक आहे. जळगांवची

'सुरत' होईल हें त्यांनीं खूप ध्यानीं ठेवावें." अशा तऱ्हेच्या धमक्या देण्यांत येऊं लागल्या. पण या धमक्यांनीं दबण्याइतके, माधवराव काय किंवा जळगांवकर काय कच्च्या कुंवतीचे नव्हते. साऱ्या प्रसंगांना तोंड देण्याची त्यांची तयारी होती. एकाच गोष्टीमुळें ते थोडेसे चिंताक्रांत झाले होते. स्वागताध्यक्ष निवडण्याच्या बाबतींत स्थानिक मंडळींत मतभेद निर्माण झाले होते. स्वागताध्यक्षाच्या जागीं कै. सोनाळकर किंवा कै. तिवारी यांपैकीं कोणाला तरी एकाला निवडण्याऐवजीं सौ. आनंदीबाई शिर्के यांना निवडण्यांत आलें याबद्दल कांहीं मंडळी नाराज झाली होती. विरोधी पक्ष या गोष्टीचा फायदा घेऊन संमेलनांत कदाचित् गोंधळ निर्माण करील अशी त्यामुळें भीति पुष्कळांना वाटत होती. "[५] याचा परिणाम असा झाला कीं, अध्यक्षांच्या निवडणुकीच्या वेळीं अनुचित प्रकार होऊं नये म्हणून अध्यक्षांचें नांव सुचविण्याचा आणि वेगवेगळ्या ठिकाणांहून अनुमोदन देण्याचा जो औपचारिक समारंभ अध्यक्षांचा गौरव करण्याच्या बुद्धीनें करण्यांत येतो, तो या वर्षीं गाळून टाकण्यांत आला! या वेळचें संमेलनाच्या कार्याध्यक्षाचें भाषण त्यांच्या वकिली बाण्याला साजेसेंच होतें. 'ज्या अर्थीं हें संमेलन परिषदेच्या नियमाप्रमाणें भरत आहे व त्या नियमांप्रमाणें स्वागत-मंडळानें ज्या अर्थीं प्रो. माधवराव पटवर्धन यांस अध्यक्ष निवडलें आहे व त्याला मान्यता देऊन ते ज्या अर्थीं उपस्थित झाले आहेत, त्या अर्थीं अध्यक्षस्थान स्वीकारून अध्यक्षीय भाषण करण्याची मी त्यांना विनंती करितों.' अशा निश्चित व निग्रही शब्दात कार्याध्यक्षांनीं अध्यक्षाना स्थानापन्न होण्याविषयीं विनंती करून हार घातला; आणि नेहमींप्रमाणें सूचना व अनुमोदनविधि आतां होईल असें प्रतिनिधि अपेक्षित आहेत तोंच अध्यक्षांनीं भाषणास आरंभहि केला! तेव्हां संमेलनाची 'सुरत' करण्याकरितां आलेल्या प्रतिनिधींचीच 'सूरत' पाहण्यासारखी होती यांत शंका नाहीं. पुढें अध्यक्षांचें भाषण प्रायः संपल्यानंतर कायदेशीरपणाविषयीं प्रश्न उपस्थित करण्यांत आला व नेहमींची निवडणुकीची पद्धति कां सोडली याचा खुलासा विचारण्यांत आला. तेव्हांहि कार्याध्यक्षांनीं आक्षेपकांस सडेतोड उत्तर दिलें."

[५] एकविसावें महाराष्ट्र-साहित्य-संमेलन, प्रो. शं. दा. पेंडसे, लोकशिक्षण.

माधवरावांचें अध्यक्षीय भाषण पूर्वपरंपरेला सोडून झालें. वाङ्मयाचा अहवालवजा आढावा घेण्याची पद्धति त्यांनीं बुद्धयाच मोडली. ज्या एका विषयाच्या चिंतनांत, चर्चेत, तत्त्वप्रतिपादनांत व प्रचारांत त्यांनीं गेलीं कांहीं वर्षें घालविलीं होतीं, त्या विषयावरच – मराठी भाषेच्या सध्यांच्या स्वरूपावर ते बोलले. हा विषय जरी अनेकांनीं 'अनेकदां हाताळलेला' असला तरी ज्या मूलगामी पद्धतीनें माधवरावांनीं त्याची विचिकित्सा केली त्या पद्धतीनें तत्पूर्वी तरी कोणीं केली नव्हती. सांस्कृतिक व सामाजिक ऐक्य दृढ करून तें अबाधित राखण्याचें एक प्रभावी साधन या दृष्टीनें ते भाषेकडे पाहात. तिचें 'माहात्म्य' त्या दृष्टीनेंच त्यांना अधिक वाटे. त्यांनीं आपल्या या भाषणांत म्हटलें आहे कीं, "मराठी भाषा ही दोन कोटि लोकांच्या कौटुंबिक साधर्म्याची साक्ष आहे, आणि त्यांचें जीवन व्यापक, सुसंघटित नि अभ्युदयोन्मुख करण्याचें एक महत्त्वाचें साधन आहे, या दृष्टीनें आपण भाषेच्या नि वाङ्मयाच्या स्वरूपाची पाहणी केली पाहिजे." भाषेकडे आणि वाङ्मयाकडे पाहण्याची त्यांची दृष्टि अशी असल्यामुळें त्यांना 'आधुनिक मराठी वाङ्मय हें सुललित दिसलें तरी एकंदरीनें पाहतां संकुचित दृष्टीचें, थिल्लर, दुबळें, अनुकारी आणि वेषवेडें' वाटे. आज जें मराठींत वाङ्मय निर्माण होत आहे तें एका विशिष्ट सुशिक्षित वर्गानें स्वतःपुरतीच दृष्टि ठेवून लिहिलेलें असल्यामुळें बहुजनसमाजाला त्याबद्दल जिव्हाळा वाटत नाहीं. हा जिव्हाळा निर्माण व्हावयास, त्यांच्या अंतःकरणाचें प्रतिबिंब ज्यांत उमटलेलें आहे असें वाङ्मय निर्माण व्हावयास हवें; अशी त्यांची विचारसरणी होती. "मूठभर इंग्रजी शिकलेल्यांच्या व्यतिरिक्त जो फार मोठा मराठी समाज आहे त्यालाहि रिझवील नि जागवील असें हें वाङ्मय असावयाला पाहिजे, आणि थोड्याशा परिश्रमानें कां होईना, पण त्याला कळेल नि जिव्हाळ्याची, आपली वाटेल अशी भाषा असली पाहिजे, या गोष्टीचा आपल्याला विसर पडतो. हा विसर न पडेल तर भाषा अधिक सुबोध नि जातिवंत होईल; आणि वाङ्मय अधिक व्यापक नि अधिक परिणामकारक होईल." असा विश्वास त्यांनीं या आपल्या भाषणांत व्यक्त केला. मराठी भाषेच्या काळच्या व आजच्या स्वरूपाबद्दल ते म्हणाले, "महानुभावीयांनीं या आपल्या मराठी भाषेत प्राचीन काळीं रचना

करून तिला सजविली इतकेंच नव्हे, तर पंथभाषा म्हणून तिची महती सिंधूपार काबूलपर्यंत पोंचविली. ज्ञानेश्वर-तुकारामादि संतांनीं बहुजनसमाजाची बोधभाषा म्हणून हिच्यांत सकस नि सुंदर वाङ्मय निर्माण करून हिला गौरविली. मराठ्यांनीं आपल्या राजवटींत जरी हिचें महाराष्ट्रीय महत्त्व ओळखिलें नाहीं आणि हिला राजकीय महत्त्व प्राप्त करून दिलें नाहीं, तरी मराठी ही त्यांची मायबोली असल्यानें त्यांच्या पराक्रमाचें क्षेत्र जसजसें वाढलें, तसतसा अप्रत्यक्षपणें हिचा गद्यप्रपंचहि वाढला; आणि ही विविध राष्ट्रीय व्यवहार करण्यास अधिक कार्यक्षम झाली. इंग्रजी राजवटींत परकीयांच्या प्रेरणेनें, पण आपल्याच पूर्वजांच्या कष्टानें, व्याकरण-कोशादि ग्रंथ निर्माण होऊन हिला निश्चित असें रूप आलें. पुढील काळांत ग्रंथकारांनीं, वर्तमानपत्रकारांनीं आणि मासिककारांनीं हिची स्तुत्य अशी सेवा केली आहे."

"या आजच्या मराठी भाषेचें स्वरूप कसें आहे? हिच्या व्याकरणाकडे जसें आपण लक्ष दिलें आहे तसें हिच्या शब्दसंपत्तीकडे दिलें आहे काय? वाङ्मयाचा शब्दसंग्रह हा एकंदर भाषा बोलणाऱ्यांच्या शब्दसंग्रहाचा उत्कृष्ट सामान्यांश असला पाहिजे. हा सामान्यांश जितका मोठा तितकी लेखी भाषा अधिक प्रतिनिधिस्वरूप नि अधिक प्रभावी होते. आजची मराठी भाषा तितकी प्रतिनिधिस्वरूप आणि संपन्न आहे असें मला वाटत नाहीं. भाषेच्या निश्चित झालेल्या व्याकरणाला धक्का अगदीं न लावितां प्रादेशिक बोलींतील शब्दांची चौकशी करून त्यांचा स्वीकार करण्यानेंच मराठी भाषेला प्रतिनिधित्व नि संपन्नता हीं पूर्णपणें प्राप्त होणार आहेत. याला सामुदायिक नि विस्तृत चौकशीची आवश्यकता आहे खरी; परंतु मराठी भाषेच्या धुरंधर लेखकांनीं या प्रश्नाकडे पोचवावें तसें लक्षच पोचविलेलें नाहीं. ते प्रवाहपतिताप्रमाणें वागत आले आहेत; आणि विशेष दुर्दैवाची गोष्ट ही कीं, दाखवूनहि त्यांना वस्तुस्थिति दिसत नाहीं. आम्हां लोकांची मनोवृत्तीच थोडी विलक्षण नि विपर्यस्त झालेली आहे. 'ज्यांनीं तिच्या (म्हणजे मराठी भाषेच्या) अभिवृद्ध्यर्थ निरंतर उत्साहानें झटावें त्यांच्यांत सुस्ती, कृतकृत्यता बुद्धि, पंडितंमन्यता वगैरे दोष असंख्य वसल्यामुळें तिची मोठीच हानि होऊन ती क्षयाच्याच पंथास दिवसेंदिवस लागत चालली आहे,' असें निदान विष्णुशास्त्री चिपळूणकरांनीं

बासष्ट वर्षांपूर्वी केलें. भाषेच्या स्वरूपाच्या दृष्टीनें पाहतां सुधारणेला अद्यापि आरंभ झालेला नाहीं. दिसावयाला ती पुष्ट दिसते परंतु हें सशक्तपणाचें लक्षण नसून हें 'वातमूलक स्थौल्य' आहे असें विष्णुशास्त्र्यांप्रमाणेंच मलाहि वाटतें."

"आपल्या मनोवृत्तींतील कांहीं दोष विष्णुशास्त्र्यांनींच दाखविल्यामुळें त्याची थोडी चिकित्सा केल्यास ती अनाठायीं होणार नाहीं, दोष दाखविण्याचें कार्य अप्रिय असलें तरी परिणामीं पथ्यकर आहे. तेव्हां तें टाळून चालणार नाहीं."

"मराठ्याचा उत्कर्ष होण्याच्या आड जर त्यांच्यांतील कोणते दोष येत असतील तर ते, मोठेपणाची धुंदी, दृष्टिसंकोच, फटकून वागण्याची वृत्ति, 'खेतींत गाडून उभें राहून शिस्तीनें, जुटीनें नि निकरानें झुंजत मरणें वा तसूतसूच हटणें' या प्रकारच्या चिकाटीच्या झुंजाच्या कलेचा अभाव, हे होत. हे दोष दूर करून, आपण सहकार्यानें व स्वकष्टानें स्वभाषेंत व वाङ्मयांत क्रांति घडवून आणण्यास सिद्ध झालें पाहिजे, असा त्यांनीं आपला अभिप्राय व्यक्त करून, ह्या दोषांची सूक्ष्म व विस्तृत चिकित्सा आपल्या भाषणांत केली. आपली भाषाशुद्धीची चळवळ ही, पूर्वी रूढ असलेले शुद्ध मराठी शब्द व वाक्प्रचार यांच्या पुनरुद्धाराची चळवळ आहे; अमुक एक शब्द केवळ परकी म्हणून त्याचें उच्चाटण करावयाचें या धोरणापेक्षां, समानार्थी व सुटसुटीत मराठी शब्द अस्तित्वांत असतां केवळ तो न आठवल्यामुळें परकीय शब्द घुसविण्यांत येऊन जुने शब्द जे नष्ट केले जात आहेत त्या क्रियेविरुद्ध स्वत्वसंरक्षणाची ही चळवळ आहे, अशी आपली भूमिका त्यांनीं स्पष्ट केली. या स्वत्वसंरक्षणाचें सांस्कृतिक महत्त्व व अगत्य समजून न घेतां जे लोक, विशिष्ट अदूर दृष्टीचा अल्पसंख्याक समाज दुखवला जाईल म्हणून वृथा हळवेपणा दाखवितात व या चळवळीला विरोध करण्यास सज्ज होतात, अशाचा अधिक्षेप करून, त्यांनीं स्पष्टपणें आपल्या भाषणाच्या अंतीं बजावलें कीं; "आपण भिऊन जों जों जपतों तों तों कांहीं लोकांच्या भावना अधिकाधिक हळव्या होतात. उद्यां आम्हीं घरीं कोरान्न खाल्लें तरीसुद्धां या लोकांच्या पोटात दुखूं लागेल; आणि आम्हांला केवळ थकव्यानें जरी झोप आली तरी

त्यांचा निद्रानाश होईल! मग या स्वाभाविक क्रियाहि करूं नयेत अथवा केल्या तर दुसऱ्यांच्या डोळ्यांवर येणार नाहींत अशा रीतीनें चोरून कराव्या असाहि उपदेश करावयाला आमचे कांहीं शांतिब्रह्म स्थितप्रज्ञ चुकणार नाहींत! हा भ्याडपणा पार टाकून दिला पाहिजे. सत्याग्रह हा निर्भीड असतो. आपल्या घरांत आपला संसार करावयाला जर चोरी होणार असेल तर मी—

'डुमडुमत डमरु ये, खणखणत शूल ये!
शंख फुंकीत ये येइ रुद्रा!'

असेंच मनोभावानें त्या 'शंकर' लयकर्त्यांचें आवाहन करीन."

माधवरावांचें हें भाषण त्यांच्या नेहमींच्या प्रचारकी हिरीरीनें व झुंजार वृत्तीनें लिहिलें गेलें होतें; वैशिष्टयपूर्ण सावेश आविष्कारामुळें त्याचें वाचनहि परिणामकारक झालें. संस्कृतिनिष्ठ राष्ट्रीय बाण्याच्या मंडळींना तें जिवंत व स्फूर्तिदायी वाटलें तर पुरोगामी मंडळींना 'हरिदासी थाटाचें तें चर्वितचर्वण' वाटलें. मुंबईच्या 'ज्योत्स्ना' [५] मासिकांत एका पुरोगामी टीकाकारानें पुढील उद्गार काढले होते: "अध्यक्षाच्या भाषणांतील धर्म्य, कर्म्य इत्यादि शब्दांनीं आमच्यांतील पुरोगामी सदस्य कांहीं वेळ मूर्च्छित पडले होते; व सनातनी सभासदाच्या अंगातील सात्विक अष्टभाव जागृत होऊन त्यांना समाधि लागली होती. एकंदरींत भाषण बहु उत्तम वाचलें गेलें यांत शंका नाहीं. मतभिन्नता असेल पण नसते कुठें ही भिन्नता? कोणी म्हणत 'भाषाशुद्धि हा प्रो. पटवर्धनांचा हव्यास आहे,' तर उलट कांहींच्या मतें 'प्रो. पटवर्धनांनीं भाषाशुद्धीचें लोण महाराष्ट्र-साहित्य-संमेलनापर्यंत आणून पोंचविलें हा त्यांचा एक प्रकारचा विजय आहे."

जळगांवच्या या संमेलनास काका कालेलकर, म. म. दत्तो वामन पोतदार, भा. वि. ऊर्फ मामा वरेरकर यांसारखी हिंदुस्थानीची जी पुरस्कर्ती मंडळी उपस्थित होती त्यांना माधवरावांचें भाषाशुद्धीचें धोरण कांहीं बाबतींत आत्यंतिक वाटत होतें. असलें धोरण हें संमेलनाचें धोरण असें मानलें

[५] ज्योत्स्ना, डिसेंबर १९३६.

जाण्याचा संभव वाटल्यामुळें असो किंवा अन्य कांहीं कारणामुळें असो, काका कालेलकर यांनीं म. म. पोतदार व मामा वरेरकर यांचा पाठिंबा मिळवून पुढील ठराव संमेलनाच्या दुपारच्या अधिवेशनांत मांडला : “ मराठी भाषेंत चांगले अर्थवाही, सुटसुटीत व रूढ शब्द असूनहि, त्यांचे ऐवजीं त्याच अर्थाचे परदेशी शब्द, परकी भाषेच्या प्रतिष्ठेमुळें, किंवा चालढकलीमुळें, नव्यानें दाखल करण्याची किंवा दाखल होऊं देण्याची संवय आपल्या लोकांत दिसून येते ती अनिष्ट आहे, असें या संमेलनाचें ठाम मत आहे. जुने आणि नवे मराठी रूढ शब्द हाच मराठी भाषेचा खरा पाया आहे ; या शब्दांचा नित्य उपयोग करून त्यांचें जतन करणें हें मराठी बोलणाऱ्या सर्व लोकांचें कर्तव्य आहे. मात्र मराठींत रूढ होऊन, मराठी बनलेल्या व आज प्रचलित असलेल्या कोणत्याहि शब्दाला तो मूळचा परदेशी होता ( उदाहरणार्थ, फार्शी, अरबी, पोर्तुगीझ किंवा इंग्रजी होता ) म्हणून बहिष्कृत करण्याची नीति या संमेलनाला मान्य नाहीं. ”

हा ठराव मांडून कालेलकर यांनीं त्यामागील आपली भूमिका पुढीलप्रमाणें स्पष्ट केली : “ अध्यक्षांनीं काल केलेलें भाषण समाजसेवकाला अगर राष्ट्र-पुरुषाला शोभेल असेंच होतें. न्या. मू. रानडे यांच्याप्रमाणें भाषाभिमान बाळगणारे लोक आतांहि आहेत. या ठरावांत चातुर्य, फसवेगिरी आहे असें काल एका गृहस्थांनीं उघड म्हटलें. येथें जमलेल्या महाराष्ट्रीयांना तसेंच वाटत असल्यास माझें कांहीं म्हणणें नाहीं. परंतु माझा स्वतःचा तसा हेतु नव्हता व असणें शक्य नाहीं. गुजराथी लोक मला परकीय शब्द काढताना त्याऐवजीं कोणता योग्य शब्द घालावा याबद्दल विचारपूस करीत असतात व त्यांना मी योग्य शब्द सुचवितों. अशा रीतीनें सुमारें दोन-तीन हजार मराठी शब्द गुजराथी भाषेंत चालू केले आहेत. या ठरावाबद्दल आपण गैरसमज करून घेऊं नका. या ठरावाचे दोन्ही भाग मला सारखेच जिव्हाळ्याचे वाटतात. तरी त्यांचा तुम्ही स्वीकार करावा. जनता व सर्वसामान्य लोक बोलतात त्या भाषेची प्रतिष्ठा वाढविली पाहिजे. असें करतांना संस्कृत काय किंवा फार्शी अगर इंग्रजी कठिण शब्द काय, त्यांचा उपयोग करता कामा नये. तसें केल्यास सामान्य लोकांना ती भाषा समजणार नाहीं. आपण पुण्याकडील भाषा,

सातान्याची भाषा अगर नागपूरची भाषाशैली तयार करतों. पण खेडेगांवातील लोकांचे शब्द, त्यांचीं कवनें घेऊन त्यांचें प्राधान्य वाढविलें पाहिजे. त्या शब्दांचे पूर्वज अरबस्थानांतून आले यासाठींच केवळ त्यांच्यावर कडक बहिष्कार घालण्यांत येऊं नये असें माझें मत आहे. हिंदी भाषा रुबाबदार अगर प्रभावी आहे म्हणून त्या भाषेंतील शब्द घ्यावेत असें म्हणणारांपैकींहि मी नाहीं. आपल्या मराठी भाषेंत सर्व प्रकारचें सामर्थ्य आपण आणलें पाहिजे. चारित्र्यशुद्धीला आपण जितकें जपतों, तितकें आपण आपल्या शब्दांना जपलें पाहिजे असेंहि मी म्हणेन. परंतु परकीय शब्द येऊन आपणांत मिसळून गेले आहेत, त्यांच्यांत, भावंडांत भांडणें लावूं नका, असें माझें म्हणणें आहे. कोणत्याहि भाषेंत चांगले शब्द दिसले तर ते घेण्याला प्रत्यवाय नसावा अशा मताचा मी आहें."

कालेलकर यांच्या ठरावांत, 'मराठींत रूढ झालेल्या व प्रचलित असलेल्या कोणत्याहि शब्दाला तो परदेशी आहे म्हणून बहिष्कृत करण्याची नीति या संमेलनाला मान्य नाहीं,' अशा आशयाचा जो भाग होता तो गाळण्यात यावा अशी उपसूचना नागपूरचे प्रा. पेंडसे यानीं आणली. ठरावाच्या पूर्वार्धासंबंधीं कोणाचेंच भिन्न मत नव्हतें. पण उत्तरार्धासह ठराव संमत करणें म्हणजे भाषाशुद्धीला आणि पर्यायानें अध्यक्षीय भाषणाला विरोधच करणें होय आणि तसा तो होणें हें थोडेंसें शिष्टाचाराला तिलांजलि दिल्यासारखेंच होईल, असें अनेकाचें मत झालें. ही उपसूचना मतास टाकतां ६५ विरुद्ध ५५ मतानीं ती संमत झाली. काका कालेलकर यांना आपला ठराव जशाचा तसा संमत व्हावयाला हवा होता. प्रा. पेंडसे यांची उपसूचना संमत झालेली पाहून त्यांनीं आपला मूळ ठरावच मागें घेतला. वास्तविक त्यांनीं असें करण्याचें कांहीं कारण नव्हतें. उत्तरार्ध गाळला जाऊन केवळ पूर्वार्ध जरी संमेलनानें मान्य केला असता तरी कांहीं बिघडत नव्हतें. उलट, 'स्वकीय शब्दांच्या जागीं परकी शब्द वापरणे अनिष्ट आहे,' हें संमेलनाचें मत प्रसिद्ध होणें इष्टच होतें. परंतु काका कालेलकर आणि त्यांचे प्रोत्साहक यांना पूर्वार्धापेक्षां उत्तरार्धच अधिक महत्त्वाचा वाटत होता असें दिसतें.

या ठरावावर उभयपक्षांकडून वाग्युद्ध खूप झालें. माधवराव तें अगदीं तटस्थतेनें ऐकत होते. त्यांनीं आपल्या मनाची समता यत्किंचितहि ढळूं दिली नाहीं. संमेलनाचें कार्य आटोपल्यावर त्याचें जें समारोपाचें भाषण झालें त्यांत त्यांनीं बोलूनच दाखविलें कीं, "भाषाशुद्धीसंबंधींचा ठराव या संमेलनापुढें आला ही माझ्या मतें फार चागली गोष्ट झाली. या विषयाबद्दल आतांपर्यंत सार्वत्रिक उदासीनताच दिसत होती; पण ठराव मांडून ही उदासीनता घालविण्याचें श्रेय घेतल्याबद्दल काकाजी कालेलकर यांचें अभिनंदनच केलें पाहिजे. भाषाशुद्धीची चळवळ ही केवळ एक उपेक्षणीय टूम आहे, असें अतःपर कोणाला वाटणार नाहीं. अनिष्ट प्रथेला योग्य वेळीं विरोध केला पाहिजे याची जाणीव लोकांना होऊं लागली आहे ही समाधानाची गोष्ट होय. काकाजी कालेलकर यांनीं मांडलेला भाषाशुद्धीचा ठराव अध्यक्षांच्या भाषणावर निंदाव्यंजक स्वरूपाचा होता असें कांहींनीं सांगितलें. पण मला स्वतःला तसें मुळींच वाटत नाहीं. व्यक्ति व तत्त्वें या गोष्टी मी भिन्न समजतों. काकाजींचा ठराव मला निंदाव्यंजक वाटला नाहीं ; इतकेंच नव्हे तर त्यांनीं तो मांडल्याबद्दल मला उलट आनंदच झाला. प्रतिपक्षाची विचारसरणी नेहमींच उद्बोधक असते, असें मानणारा मी आहें. आणि या दृष्टीनें विरोधी विचारसरणीचा परिचय या वेळीं मला करून घेतां आला ही फार चांगली गोष्ट झाली असेंच मी समजतों. काकाजींचा ठराव जर मान्य झाला असता, तर साहित्यसंमेलनानें आपल्या विचारसरणीला मान्यता दिली असें त्यांना सांगतां आलें असतें. निदान शारदोपासकांच्या सभेंत दोन्ही दृष्टींनीं या प्रश्नाचा सांगोपांग विचार झाला, हीहि कमी समाधानाची गोष्ट नव्हे. माझें तर म्हणणें असें आहे कीं, प्रत्येक देशी भाषेचा व प्रांतिक बोलीचा सांगोपांग अभ्यास जर होऊं लागेल, तर ही भाषाशुद्धीची चळवळ अनावश्यकच ठरेल. या संमेलनांतील चर्चेनें अशा अभ्यासाला चालना मिळावी अशी मी अपेक्षा करतों."

जळगांवच्या या संमेलनांत बरेच दिवस धुमसत असलेला 'परिषद्–संमेलन-वाद'हि उत्तम रीतीनें मिटविण्यांत येऊन परिषदेची नवीन शंभर कलमी घटना संमत करण्यांत आली.

[६] "इंदूर संमेलनापासून परिषद्-संमेलनाभिमान्यांमध्यें जे मतभेद उठले होते व बाहेरची सहानुभूतिशून्य नाकर्ती मंडळी, ज्यांचा बागुलबुवा करून या संस्थाप्रेमी साहित्यिकांवर लागेल ते आरोप करीत होती, ते सर्व जळगांवीं खालीं बसले व बसविले गेले. हीच जळगांवची कीर्ति राहील ......... जळगांवचें संमेलन सुंदर व टुमदार झालें असा सर्वांचाच अभिप्राय पडतो. स्वागताध्यक्षांचें भाषण म्हणजे खानदेशचा डोळ्यांपुढें उभा केलेला मूर्तिमंत इतिहास. खानदेशस्थ वाङ्मयाची पाहणी त्यांत होती व अहिराणी भाषेचें महत्त्वहि सांगितलें होतें. या भाषणांत कोणालाच उणेपणा वाटला नाहीं....... वेळ थोडा, मोठे कार्यकर्ते इतर कामांत व्यग्र व पांगलेले, प्रचंड राष्ट्रसभा याच भागांत थोड्याच दिवसांत भरावयाची, स्थानिक आणि प्रांतिक मतभेद उसळलेले, इत्यादि उत्साहावर विरजण घालणाऱ्या गोष्टी असतांहि जळगांवकरांनीं कंबर कसून, एकमेकांचे स्नेहानें हात दाबून धरून, एकविसावें महाराष्ट्र-साहित्य-संमेलन उत्तम रीतीनें पार पाडलें व आपल्या कर्तृत्वाचा लौकिक केला."

संमेलनाचें कार्य ज्या दिवशीं आटोपलें त्या दिवशीं माधवरावांनीं समाधानाचा निःश्वास टाकला आणि ते उद्गारले, " मी या संमेलनाविषयीं फार चिंताक्रांत होतों. स्वतःविषयीं मी चिंताक्रांत नव्हतों; पण संमेलन कसें पार पडतें, याविषयीं मी फार चिंताक्रांत होतों. तें यशस्वी रीतीनें पार पडलें याबद्दल मला आतां हायसें वाटत आहे."

संमेलनसमाप्तीचा तो दिवस माधवरावांनीं शिर्के व घाटे मंडळींत मनसोक्त गप्पांत व थट्टाविनोदांत घालविला. जबाबदारीच्या जाणीवेनें भारावलेलें त्यांचें मन तिच्या पूर्ततेच्या समाधानामुळें हलकें झालें होतें. साऱ्या त्रासांना आणि दगदगींना दूर भिरकावून देऊन, ते व त्यांचा मित्रपरिवार त्या दिवशीं हास्यनिर्झरणींत यथेच्छ डुंबत होता.

[६] चिं. ग. कर्वे, म. सा. पत्रिका, जानेवारी १९३७

# १६

# डी. लिट्.

साहित्य-संमेलनानंतर महिन्या-दीड महिन्याच्या काळांत माधवरावांचा 'छंदोरचना'[१] हा ग्रंथ प्रसिद्ध झाला. संमेलनाचे वेळींच त्याचें प्रकाशन व्हावें अशी त्यांची उत्कट इच्छा होती. पण ती वेळ प्रयत्न करूनहि प्रकाशकांस साधतां आली नाहीं. मुंबईच्या कर्नाटक प्रकाशन संस्थेचे त्यावेळचे मालक मंगेशराव कुळकर्णी यांनीं, त्यांत अर्थलाभाचा विशेषसा संभव नसतांहि, माधवरावांच्या विद्वत्तेबद्दल त्यांना वाटणाऱ्या आदरामुळें, हा ग्रंथ प्रकाशनास घेतला व त्याचें मुद्रण निर्दोष व सुंदर केलें. माधवरावांना त्यामुळें आपल्या मनांतील कांहीं योजनांना मूर्त स्वरूप देणें सुकर झालें.

'छंदोरचना' या ग्रंथासाठीं त्यांचें, जवळ जवळ सहा वर्षें, सतत वाचन, मनन, संशोधन व लेखन चाललें होतें. या ग्रंथाचा विषय त्यांच्या मनांत 'घर'च करून बसला होता. एखाद्या व्रतधाऱ्याप्रमाणें त्यांची विद्योपासना चालली होती. प्रापंचिक व व्यावसायिक कर्तव्यासाठीं द्याव्या लागणाऱ्या वेळेव्यतिरिक्त त्यांना जेवढा म्हणून वेळ मिळे तेवढा ते या कामीं खर्च करीत. त्यांनीं या विषयाचा विलक्षण ध्यास घेतला होता. आपल्या लेखनांत कोणत्याहि प्रकारचें न्यून राहूं नये यासाठीं संस्कृत, प्राकृत, मराठी या भाषांतील छंदःशास्त्रावर उपलब्ध असलेला प्रत्येक ग्रंथ त्यांनीं वाचला. संस्कृत व प्राकृत या भाषांचें ज्ञान त्यांना प्रारंभीं विशेषसे नव्हतें, तें या कामासाठीं एखाद्या विद्यालयीन विद्यार्थ्याप्रमाणें व्याकरण, कोश इत्यादींचें सहाय्य घेऊन त्यांनीं स्वकष्टानें उत्तम प्रकारें संपादलें. त्यांनीं या विषयासाठीं किती अफाट

[१] नवीन आवृत्ति.

वाचन केलें याची कल्पना, या ग्रंथांत दिलेल्या संदर्भग्रंथांच्या यादीवरून येण्यासारखी आहे.

या ग्रंथाचा विद्वज्जनांकडून गौरवपूर्ण परामर्ष घेण्यांत आला; कांहीं धनिक व संस्थानिक यांनीं द्रव्यद्वारा त्याची संभावना केली; मुंबई विद्यापीठानेंहि मुद्रणखर्चाप्रीत्यर्थ कांहीं रक्कम व तर्खडकर पारितोषिक देऊन ग्रंथाबद्दलची गुणज्ञता व्यक्त केली. पण या सर्वांहून, कुलाबा जिल्ह्यांतील नागांवसारख्या एका आडवळणी गांवीं राहाणाऱ्या भिकाजी वामन जोशी नांवाच्या ऐंशीं वर्षांच्या वृद्ध, पंगु गृहस्थानें, हा ग्रंथ मुद्दाम विकत घेऊन, त्यावरील जें विस्तृत परीक्षण पाठविलें तें वाचून, त्यांना जें समाधान वाटलें तें कांहीं अपूर्वच होतें. या गृहस्थाबद्दल विलक्षण आदर वाटून त्यांनीं त्याची ओळख, 'एक आजीव विद्यार्थी' या मथळ्याखालीं 'ज्ञानप्रकाश' पत्रांत लेख [२] लिहून करून दिली. याच लेखांत 'छंदोरचने'बद्दल त्यांनीं आपल्या परीक्षणांत जे कांहीं मुद्दे उपस्थित केले होते त्यांचा परामर्षहि त्यांनीं घेतला होता. जोशी यांजबद्दल त्यांनीं पुढीलप्रमाणें लिहिलें होतें: "ब्राउनिंगच्या संस्मरणीय वैय्याकरणाची आठवण करून देणारे एक 'आकाल विद्यार्थी' आज महाराष्ट्रांत विद्यमान आहेत. त्यांचा माझा अलिकडेच परिचय झाला आणि त्याचें श्रेय त्यांच्या ज्ञानलालसेलाच दिलें पाहिजे. एके दिवशीं एका आडवळणी गावाहून मला पत्र आलें. 'छंदोरचने'संबंधीं कांहीं प्रश्नांवर चर्चा करावयाची माझी फार इच्छा आहे. परंतु वार्धक्य आणि पक्षाघात यांमुळें मी आपल्याकडे येऊं शकत नाहीं, तरी आपण एकदा मला भेटावें' असा त्या पत्राचा आशय होता. स्वाभाविकपणेंच माझेंहि कुतूहल जागृत झालें, आणि गेल्या उन्हाळ्याच्या सुटींत, छंदोरचनेची दुसरी आवृत्ति प्रकाशित होण्यापूर्वी, मी नागांवीं, महाडपासून दूर आडवळणी अशा त्या गांवीं, त्यांची भेट घेतली. परंतु त्यावेळीं त्यांची प्रकृति फारच बिघडलेली असल्यामुळें फारसें बोलणें न होतां मी निराश होऊनच परतलों; तदनंतर छंदोरचनेची दुसरी आवृत्ति प्रकाशित झाली. ती त्यांनीं मागवून (विकत घेऊन) वाचून पाहून मला परीक्षणाचे हप्ते पाठवायला आरंभ केला. ता. १५।१२।३७ या दिवशीं

[२] ज्ञानप्रकाश, ९ जानेवारी, १९३८

त्यांनीं पाठविलेला हृता पांचवा असून त्यांत ते लिहितात, ‘ माझी प्रकृति दिवसेंदिवस बिघडत जाऊन अगदींच खालावत जात आहे. माझा मलाच आतां भरंवसा नाहीं. कधीं सुटका होईल तें समजत नाहीं. आतां मला बसवतहि नाहीं. आजचे दोन लेख मीं अंथरुणावर उपडा पडून लिहिले आहेत. आणखी बऱ्याच बाबींसंबंधीं माझे विचार कळवावयाचे होते, परंतु आतां ते माझेबरोबरच जाणार. करितां आपलें मत लवकरच कळवाल अशी विनंती करीत आहें. ’ अशा अज्ञात परंतु संस्मरणीय व्यक्तीला सार्वजनिक उत्तर देणें इष्ट म्हणून हा लेख लिहिला आहे......नागांवसारख्या ठिकाणीं छंदोरचनेसारख्या रुक्ष पुस्तकाला चिकित्सक वाचक मिळतो हें पाहून मला जसें समाधान झालें, तसेंच त्यांच्या स्फूर्तिप्रद ‘ आकाल ’ विद्यार्थित्वाची बूज करणारी व्यक्ति महाराष्ट्रांत आहे, हें पाहून त्यांनाहि समाधान वाटेल, अशी आशा आहे. ”

माधवरावांनीं हा ग्रंथ पुनर्लेखनाला घेतला तेव्हां त्यांतील विषयाचें संशोधन व विवरण कडेला नेऊन पोंचवावयाचें, व आपल्या दृष्टीनें तरी त्याला पूर्णता आणावयाची अशी त्यांची एक आकांक्षा होती ; या आकांक्षे-बरोबरच मुंबई विद्यापीठाची अत्युच्च पदवी ‘ डी. लिट्. ’ तीहि या ग्रंथानें संपादावयाची अशीहि त्यांची दुसरी आकांक्षा होती. पहिली त्यांच्या प्रयत्नांवर अवलंबून होती, तर दुसरी विद्यापीठांतील पंडितांच्या मतानुकूलतेनें साध्य होण्यासारखी होती.

‘ छंदोरचना ’ प्रसिद्ध होतांच आपल्या पूर्वसंकल्पाप्रमाणें तो ग्रंथ त्यांनीं मुंबई विद्यापीठाकडे ‘ डी. लिट्. ’ पदवी मिळण्याकरितां सादर केला. विद्यापीठाच्या ॲकॅडेमिक कौन्सिलनें त्याच्या नेहमींच्या रिवाजाप्रमाणें तो मराठी बोर्डाकडे धाडला. या बोर्डाचे त्यावेळेस प्रो. आळतेकर, प्रिं. करमरकर, प्रो. माधवराव परांजपे, प्रो. ना. के. भागवत, असे पांच सभासद होते. बोर्डापुढें अशा तऱ्हेचा ग्रंथ पहिल्यांदाच आला होता, त्यामुळें [3] ‘ बोर्डानें

[3] माधवराव पटवर्धनांच्या डी. लिट्. प्रकरणांतील अंतस्थ भानगडी, प्रो. द. सी. पंगू; झंकार, १६ जून १९४६.

त्यावर अभिप्राय देण्याच्या कक्षा व मर्यादा तितक्याशा स्पष्ट व रेखीवपणें ठरलेल्या नव्हत्या. त्यामुळें सदर ग्रंथ डी. लिट्. या अत्युच्च पदवीस अपात्र आहे, त्याला फार तर पीएच्. डी. पदवी बहाल करावी, सदर ग्रंथाची ही दुसरी आवृत्ति असल्यामुळें ती डी. लिट. या पदवीपरीक्षेस मुळीं सादरच करतां येत नाहीं, असे बरेच फाटे या प्रश्नास फुटून, बोर्डाच्या सभेंतील चर्चेचा वारा थोड्या निराळ्या दिशेनें वाहूं लागला. खुद्द प्रो. आळतेकर व प्रिं. करमरकर माधवरावांच्या ग्रंथाला पदवी देण्याच्या अगदीं मूलतःच विरुद्ध होते, तर प्रो. परांजप्यांनीं अशा कामीं मराठी बोर्डाचें कर्तव्य फक्त ग्रंथपरीक्षकांचीं नावें सुचविण्याचें असून ग्रंथावर अभिप्राय देऊन त्याची पात्रापात्रता ठरविण्याचें त्याचें काम नाहीं अशा नियमाकडे आपलें बोट दाखविलें.” अर्थात् बोर्डाला या बाबतींत ॲकॅडेमिक कौन्सिलकडूनच निर्णय लावून घेणें प्राप्त झालें व त्याप्रमाणें त्यानें त्याजकडे पृच्छा केली. ॲकॅडेमिक कौन्सिलनें कळविलें कीं, ‘तुमचा अभिप्राय आम्हीं अपेक्षित नाहीं, तुम्ही फक्त परीक्षकांचीं नांवें सुचवा.’ बोर्डाला अशा प्रकारें आदेश मिळतांच त्यानें महामहोपाध्याय काणे, रंगाचार्य रड्डी व प्रो. वेलणकर यांचीं नांवें सुचविलीं. पण त्यांपैकीं म. म. काणे यांनीं परीक्षकाचें काम नाकारल्यामुळें, पारीस विद्यापीठांतील मराठीचे प्राध्यापक व मराठी भाषेच्या विकासासंबंधीं लिहिलेल्या ‘La Formation de la Langue marathe’ या फ्रेंच भाषेंतील ग्रंथाचे कर्ते प्रो. ज्युल ब्लोक यांस त्यांचे जागीं नेमण्यांत आलें. या तिन्ही परीक्षकानीं १९३८ च्या जून-जुलैच्या सुमारास माधवरावांना ‘डी. लिट्.’ पदवी द्यावी असा निःसंदिग्ध अभिप्राय विद्यापीठाकडे पाठविला. हा अभिप्राय ॲकॅडेमिक कौन्सिल व तदनंतर सिंडिकेट यांजपुढें रीतसर येऊन त्यांची त्याला संमति मिळावयास बराच वेळ लागला. अखेर ज्या निर्णयासाठीं माधवराव जवळ जवळ दोन वर्षें आतुरतेनें वाट पाहात होते, तो ता. १ डिसेंबर, १९३८ रोजीं विद्यापीठाच्या कार्यवाहाकडून कळविण्यांत आला. ‘डी. लिट्.’ पदवीला ते पात्र ठरविण्यांत आले.

माधवरावांना ही पदवी सहजपणें मिळाली नाहीं. त्यासाठीं त्यांना झगडावें लागलें. त्याच्या जुन्या व नव्या हितशत्रूंनीं अनेक विघ्नें आणलीं, अडचणी

उत्पन्न केल्या, बुद्धिपुरस्सर गैरसमज पसरविण्याचे प्रयत्न केले. पण माधवराव सावध होते, त्यांनीं या आपल्या शत्रूंचा प्रत्येक डाव जेव्हांचे तेव्हां हाणून पाडला. माधवरावांनीं आपल्या एका स्नेह्याला याविषयीं लिहिलें होतें: "डी. लिट्. पदवी मिळाल्याची बातमी ऐकून मला आनंदच झाला. पण त्यांत प्रतिपक्षाचे डाव यशस्वी रीतीनें उलटविल्याचें समाधान अधिक होतें. या झुंजांत मला अपयश आलें असतें तर विश्वविद्यालयाच्या जगांत ती मोठीच अप्रतिष्ठा होती. अभ्यासक्रमसमितीनें (मराठी बोर्डानें) माझ्या ग्रंथाला योग्य तो मान दिला असता तर तें समुचित झालें असतें. असो. ही पदवी मिळाल्यानें आनंद वाटला तरी आपण आतां कोणी अद्वितीय विद्वान् झालों असें मात्र मुळींच वाटत नाहीं." [४]

मध्यंतरीं डी. लिट्. प्रकरण रेंगाळत आहे असें जेव्हां त्यांनीं पाहिलें तेव्हां आपला ग्रंथ 'इंग्रजींत लिहून काढून तो हिंदुस्थानांतील आणि हिंदुस्थानाबाहेरील विविधभाषाकोविदांपुढें ठेवावयाचा' [५] असा त्यांनीं निश्चय करून कामास सुरुवातहि केली होती.

माधवराव डी. लिट्. झाले याबद्दल त्यांचें सर्वत्र अभिनंदन झालें. खुद्द कोल्हापुरांत त्यांचे बऱ्याच ठिकाणीं जाहीर सत्कार झाले. त्याची हकीकत त्यांनीं लीलाबाईस पुढीलप्रमाणें लिहून कळविली होती:

"[६] मी कालच तुला पत्र लिहिणार होतों, पण कालपासूनच सत्कार-समारंभांना आरंभ झाला आहे. येथील शारदामंडळानें पहिला सत्कार केला. प्रो. ना. सी. फडके हे अध्यक्षस्थानीं होते. रात्रौ श्री. उत्तमराव शेणोलीकर यांनीं इंग्रजी पद्धतीचें पण शाकाहारी प्रयोजन दिलें. डॉ. सूर्यवंशी, प्रो. परांडेकर, डॉ. पाध्ये, मि. बाळकृष्ण, श्रीक्षात्रजगद्गुरु, प्रो. फडके,

---

[४] मौज, ६ डिसेंबर १९३९: मूळ पत्राचा ठसा घेऊन तो या अंकांत छापला आहे.

[५] माधवरावांचें लीलाबाईस पत्र, ता. २९ जुलै, १९३८

[६] ता. १२ डिसेंबर, १९३८

प्रो. पंगु, भाऊराव आपटे, इत्यादि मंडळी होती. बेत उत्तम होता. भाषणें एक-दोन वाक्यांपलीकडील लांबीचीं नव्हतीं."

"उद्यां कॉलेजांत प्राध्यापकवर्गाच्या विद्यमानें प्रयोजन आहे. प्राइम मिनिस्टर सुर्वे, मे. दत्तोबासाहेब भोंसले, महमूलाल, इतर कॉलेजाचे वरिष्ठ असा थाट आहे! डॉ. बाळकृष्णांनीं या प्रमाणावर कां अभिनंदन-समारंभ करावयाचें योजिलें आहे कळत नाहीं. मत्सरग्रस्तांना अधिक व्याकुळ व्हायला एक निमित्त सांपडेल!"

"काल मीं पुण्यास प्रयोजनाला उपस्थित असावें असा पुणेकरांचा फार आग्रह होता. प्रो. वाडेकरांनीं दोन पत्रें पाठविलीं, शेवटीं तारहि केली पण माझा निरुपाय होता."

"[१] तुझें पत्र पावलें. तूं म्हणतेस त्याप्रमाणें प्रत्यहीं सत्कारसमारंभ चालू आहेत. कॉलेजांतील सहाध्यापकांनीं दिलेलें प्रयोजन थाटात झालें. प्राइम मिनिस्टरसाहेब, महमूलालसाहेब, क्षात्रजगद्गुरु इत्यादि पाहुणे उपस्थित होते. त्या सर्वांनीं अभिनंदनपर भाषणें केलीं. माझें उत्तरहि समुचित नि सुंदर झालें. मीं आधींच त्याची सिद्धता करून ठेविली होती. कॉलेजांतील वाङ्मयमंडळाचें अभिनंदन काल झालें. प्रो. फडके अध्यक्षस्थानीं होते. प्रो. पंगु होते पण कांहीं बोलले नाहींत. फडक्यांचें भाषण उत्तमच झालें. ते म्हणाले कीं, 'कांहीं लोक पदव्या घेऊन येतात पण कशाच्या आधारावर तें गुप्तच राहतें. प्रो. पटवर्धनांनीं मूठ उघडून ती सव्वा लाखाची आहे. हें सिद्ध केलें आहे. अनेक वर्षांच्या परिश्रमानें सिद्ध केलेल्या प्रसादाचा घास त्यांनीं युनिव्हर्सिटीपुढें केला. तिनें थोडे आढेवेढे घेतले पण शेवटीं घास घेतलाच! या आढेवेढे घेण्यांत मौजच आहे. कारण घास स्वीकारण्यांत येणार याविषयीं शंका नव्हतीच, इत्यादि इत्यादि."

"मंगळवारीं येथील सार्वजनिक वाचनालयाच्या विद्यमानें अभिनंदन आहे. तो समारंभ सार्वजनिक आहे. आणि बुधवारच्या रात्रीच्या गाडीनें मी बुर्शीस तेथील हायस्कूलाच्या समारंभासाठीं जात आहें."

---

[१] ता. १६ डिसेंबर, १९३८

# मा ध व जू लि य न

मुंबई विद्यापीठानें माधवरावांना ' डी. लिट्. 'ची पदवी देऊन सन्मान केला याबद्दल महाराष्ट्रांतील सर्व साहित्यिकाना समाधान वाटलें. या पदवीमुळें माधवरावाचें विद्वन्मंडळींतील स्थान वाढण्यापेक्षां विद्यापीठानें मात्र आपली योग्यता वाढविली, एवढें खरें. माधवरावाना मराठी वाङ्मयक्षेत्रांतील उच्च स्थान यापूर्वींच मिळालें होतें; पदवीच्या पाठिंब्याची त्याला आवश्यकता राहिली नव्हती.

माधवराव हे मुंबई विद्यापीठाचे मराठी भाषेचे पहिले डी. लिट्. त्यांना ही पदवी मिळून आज एक तप लोटून गेलें आहे, तरी ती संपादणारे असे ते अद्याप ' एकमेवाद्वितीय 'च राहिले आहेत.

# १७

# कोल्हापुरांतील अकरा वर्षें

कोल्हापुरांत पाऊल टाकल्याला त्याना अकरा वर्षें झालीं होतीं. हा काळ अनेक वैयक्तिक, कौटुंबिक व सार्वजनिक लहान-मोठ्या घटनांनीं गजबजून गेलेला होता. त्यापैकीं कांहींचें कथन ओघानुसार यापूर्वी येऊन गेलेलेंच आहे.

माधवराव संसारांत तसेंच नोकरींत आतां स्थिर झालेले होते. वैवाहिक आयुष्यातील त्यांचीं पहिलीं एक-दोन वर्षें थोडीशीं मानासिक अस्वस्थतेचीं जरी गेलीं असलीं तरी पुढें पति-पत्नींमध्यें परस्परांविषयीं नीट समज निर्माण होऊन परस्पराच्या हिताची जपणूक होत होती, आपलें सहजीवन सुखी व यशस्वी करण्याचे त्यांजकडून प्रयत्न होत होते. पुढें १९३१ सालीं दिनकर व १९३३ सालीं सुधा या मुलांचा जेव्हां जन्म झाला, तेव्हां तर दोघेंहि त्याच्या कौतुकांत दंग होऊन संसारात अधिकाधिक रमत गेलीं. माधवरावांची तर बाह्य जगापेक्षां आपल्या घरट्याकडची ओढ अधिकाधिक उत्कट होत चालली. आप्त किंवा स्नेही यांच्या सहवासापेक्षा आपल्या खरोखरीच्या जिव्हाळ्याच्या माणसांच्या सहवासांत दिवसाचे कांहीं क्षण तरी निवान्तपणें घालवावयास मिळावे, असें त्यांना वाटूं लागलें होतें. आणि त्याबरोबरच १९१६-१७-१८ सालांतील त्यांच्यातील ‘विद्यार्थीवृत्ति’ पुन्हां जागृत झाली होती. तिला विशेष चेतना एके दिवशीं अकल्पितपणें मिळाली. १९२८ च्या नोव्हेंबर महिन्यांत प्रसिद्ध थिऑसॉफिस्ट डॉ. अरुंडेल हे आपल्या हिंदु पत्नी रुक्मिणीदेवी यांसह कोल्हापुरास आले होते. त्यांचीं तेथें ‘तरुणांच्या चळवळी’संबंधीं दोन व्याख्यानें झालीं. या व्याख्यानांना माधवराव हजर राहिले होते. त्यांपैकीं एका व्याख्यानांत त्यांनीं श्रोत्यांना विचारलें, “तुमची स्वतःची अशी कांहीं

थोर आकांक्षा आहे काय कीं, जिच्याशीं तुमचें जीवन तन्मय झालेलें आहे?" हा प्रश्न ऐकून माधवराव अस्थिर झाले. कित्येक दिवसपर्यंत त्यांच्या मनांत हा प्रश्न सारखा घुमत राहिला होता. त्यांनीं खूप विचार केला, पण त्याचें समाधानकारक उत्तर त्यांना मिळेना. गतकालीन अनेक आकांक्षांचें त्यांना स्मरण झालें. त्यातील कांहीं सफल झाल्या होत्या तर कांहीं भग्न झाल्या होत्या. 'जीवन जिच्याशीं तन्मय झालें आहे,' अशी एखादी महत्त्वाकांक्षा उत्कटत्वानें आपल्यांत आहे, असें त्यांना त्या क्षणापर्यंत तरी वाटत नव्हतें. प्रतिकूल परिस्थितीविरुद्ध झगडून आपला पुढील मार्ग काढण्यांत त्याचें त्या वेळेपर्यंतचें आयुष्य खर्ची पडलें होतें. आपली 'जीवितयात्रा म्हणजे एक कधीं न थांबणारी अशी धडपड आहे,' असेंच त्यांना वाटत होतें. डॉ. अरुंडेल याच्या प्रश्नानें त्यांच्या विचारचक्राला जोराची चालना मिळाली. ते मनाला विचारूं लागले : 'कशासाठीं आहे ही धडपड? काय हवें आहे आपल्याला? आपल्या यात्रेचें कांहीं उद्दिष्ट आहे का?' याचें निश्चित उत्तर त्याना मिळालें किंवा नाहीं कोण जाणे! पण एवढें खरें कीं, त्या दिवसापासून[1] त्याच्या जीवितक्रमांत फरक पडत गेला. त्याचे खासगी, तसेंच सार्वजनिक जीवन काहींतरी निश्चित योजनेनुसार घडत आहे, असें दिसूं लागलें. १९२९ सालापासून त्यांचे लेख काय किंवा भाषणें काय, त्यांत धर्म, भाषा व संस्कृति या विषयांनाच प्राधान्य मिळून त्यासंबंधींचे प्रचारकी वृत्तीनें मांडलेले निश्चित विचार आढळूं लागले. या विषयांच्या बाबतींत जनमनांत जागृती निर्माण करून नवीन दृष्टि देण्याची त्यांना आस लागली आहे, असें दिसूं लागलें. अमळनेरला, १९२५ सालीं, आपलें वाङ्मयीन ध्येय ठरवून तदनुसार त्यांनीं कार्याचा संकल्प सोडला होता व त्याला सहाय्यक होईल असें आपल्या आयुष्याला जें त्यांनीं वळण लावलें होतें, त्याला विशेष रूप या नवीन महत्त्वाकांक्षेमुळें मिळालें.

कोल्हापुरांतील रहिवासांत, आपले सुट्टीचे बहुतेक दिवस ते बाहेर गांवीं धर्म, भाषा व संस्कृति यांपैकीं कोणत्या तरी एका विषयावर व्याख्यानें देण्यांत

[1] ता. २८ नोव्हेंबर, १९२८.

घालवीत असलेले आढळत. सातारा, सांगली, कोल्हापूर व बेळगाव या विभागांतील जवळ जवळ असें एकहि प्रमुख शहर राहिलें नसेल कीं, जेथें त्यांचें व्याख्यान झालेलें नाहीं. अशाच एका व्याख्यानाच्या दौऱ्याबद्दल त्यांनीं आपल्या पत्रात लिहिलें होतें: [२] "या आठवड्यांत माझा ठिकठिकाणीं मोटारीनें मजेचा प्रवास झाला. तासगांव, कागल व चिकोडी येथें व्याख्यानें झालीं. व्याख्यानाला विषय 'धार्मिक दृष्टि' असाच होता. व्याख्यानें उत्तम झालीं; परंतु अशिक्षित समाजाच्यावर परिणाम करायला तीं याहून अधिक सोप्या भाषेंत पाहिजेत." पुष्कळदा त्यांचा हा प्रवास दूरदूरच्या ठिकाणींहि व्हावयाचा. कुठें वर्धा आणि कुठें कोकणांतील एका बाजूला असलेलें शिरोडें–आरवली. पण एका वर्षी त्यांनीं वर्धा, जळगांव, मुंबई, बदलापूर, सावंतवाडी, शिरोडें असा प्रवास केला, आणि त्या त्या ठिकाणीं व्याख्यानें दिलीं. शिरोडें येथें ते खाडेकर यांजकडे उतरले होते. त्यांचेसंबंधीं त्यानीं आपल्या पत्रात पुढीलप्रमाणें लिहिलें आहे:

"शिरोड्याला, वस्तुतः आरवलीला खाडेकरांच्याकडे एक रात्र फार छान गेली. उषाबाईंना पाहुणचाराची मोठी हौस दिसली. त्या अंगानें आतां भरल्या आहेत. परंतु खांडेकरांच्या अंगावरचे चट्टे अजून गेले नाहींत. तथापि ते होते किती प्रसन्न! संभाषण कसें अस्खलित, ज्ञानपूर्ण आणि चटकदार करितात! मोठे प्रेमळ — मांजरें पाळलीं आहेत त्यांची किती काळजी!"



माधवरावांचें वक्तृत्व आकर्षक असे. त्यांचा उपरोधपूर्ण व बिनतोड कोटिक्रम आणि त्यांची व्यावहारिक दृष्टान्त व ऐतिहासिक दाखले देऊन भाषण खुलविण्याची हातोटी इतकी अप्रतीम असे कीं, कित्येकदां विरोध करावयास आलेल्या लोकांनाहि ते मान डोलवावयाला लावीत. "एकदा एका सभेंत एका खांसाहेबानें, 'छावणी, शिपाई, लढाई, पेहेलवान, कुस्ती इत्यादि शब्द उर्दू असल्यानें या विद्या मुसलमानांनींच महाराष्ट्राला शिकविल्या' असें आपलें ज्ञान पाघळलें. त्यावर, माधवरावांनीं हसत हसत 'खुनी, गुन्हेगार,

[२] लीलाबाईंस पत्र, ता. २० सप्टेंबर, १९३१.

बदमाश हेहि शब्द उर्दूच आहेत,' अशी आठवण त्यास करून देऊन त्याचा असा मर्मभेद केला कीं, सभा संपेपर्यंत आपली खालीं घातलेली मुंडी वर करण्याचें कांहीं त्याला धैर्य झालें नाहीं."

त्यांच्या आधींच ओजस्वी असलेल्या वाणीला, अंतःकरणांतील कळकळीमुळें आणि तळमळीमुळें भाषाशुद्धीसारख्या आपल्या जिव्हाळ्याच्या विषयावर ते बोलूं लागले कीं, विशेष आकर्षकता येई आणि श्रोत्याचें मन तदाकार होऊन जाई, कित्येकदां त्यांचें मतपरिवर्तनहि होई. औंधला १९३५ सालीं त्याचें 'मराठी भाषेंतील शुद्धीकरण' या विषयावर व्याख्यान झालें. निजाम आपल्या संस्थानांत उर्दूचे केवढे बडेजाव ठेवतो, त्याच्या राज्यात इंग्रजी नावांच्या पाट्यासुद्धां कशा दुर्मिळ, हें सांगून ते म्हणाले, "जिकडे तिकडे सार्वजनिक मंदिरावर उर्दू नावाच्या पाट्या आहेत आणि येथें आमच्या संस्थानात पाहावें तों — स्पष्टोक्तीची क्षमा असावी — ज्यात राजाज्ञा प्रसिद्ध होतात त्या पत्राला 'स्टेट गॅझेट' म्हटलें जातें. बडोद्यास या पत्राला 'आज्ञापत्रिका' असें नांव आहे; तें युक्त आहे, ग्राह्य आहे." याच व्याख्यानात 'खुद्द श्रीमंतांना,[3] त्यांनीं आपण इंग्रजीऐवजीं मराठी सही करण्यास काय हरकत आहे म्हणून सुचविलें, व श्रीमंतानींहि तें तत्काळ मान्य करून मराठी सह्या करण्यास सुरुवात केली.' निपाणी येथें १९३० सालीं एकदा त्याचें 'हिंदुधर्मा'वर व्याख्यान होतें. राजकीय आदोलन त्या वेळेस जोरात असल्यामुळें खादीच्या चळवळीला उधान आलेलें होतें. निपाणी त्याला अपवाद नव्हती. माधवरावाचें व्याख्यान आहे असें ऐकल्यावर तेथील कांहीं राजकीय चळवळ्यांनीं त्यांना निरोप पाठविला कीं, 'तुम्ही व्याख्यानाला याल ते खादीच्या पोषाखात या. न याल तर तुमच्या आंगावरचे कपडे काढून सभेच्या जागीं त्यांची होळी पेटवूं.' माधवरावांनीं उलट निरोप पाठविला कीं, 'मी माझ्या नेहमींच्याच पोषाखात येणार. पाहूंच माझे कपडे कोणाला जाळायची छाती होते ती!' संध्याकाळची साडेसात वाजण्याची वेळ होती. सभा उघड्या जागेंत भरली असून दोन हजारांचा श्रोतृसमुदाय जमला होता.

[3] औंधचे राजेसाहेब.

माधवराव लिहितात[४] : "तो समुदाय पाहून क्षणभर मी जणूं काय पुढारीच आहें असें मला वाटलें. मी खादी वापरली नव्हती ; एकाद्या इरसाल सुधारकासारखा मी दिसत होतों. ज्या स्थानिक पुढाऱ्यानें माझे कपडे जाळण्याची मला धमकी दिली होती, तो सभेला उपस्थित होता. मी साडेसातपासून पावणेनऊ वाजेपर्यंत धर्मांवर बोललों. आणि गमतीची गोष्ट ही कीं, तो पुढारी अखेरपर्यंत व्याख्यान ऐकत बसला. सभा, अनिष्ट असा कांहींहि प्रकार न घडतां, उत्तम रीतीनें पार पडली."



माधवरावाना प्रवासाचा फार षोक असे. सृष्टीचीं भिन्न भिन्न ऋतूंतील विविध रूपें न्याहाळण्यांत त्याना पराकोटीचें सुख होई. शहरी वातावरणाला ते फार कंटाळत. 'कोल्हापुरांत मला गुदमरल्यासारखें वाटतें. पण बाहेर पडलों कीं, किती प्रसन्न व मोकळे वाटतें!' असें ते म्हणत. त्याना खुद्द कोल्हापूर शहर आवडत नसे, पण त्याचे भोंवतालचा रम्य प्रदेश त्यांना सुखवी, रिझवी, त्यांचें अंतःकरण फुलवून टाकी. आणि त्यांच्या तोंडून उद्गार निघत :

शांत सुखद हें सृष्टितपोवन
निरपेक्षपणें इथें रमो मन,
उपाधि करितिल चित्तीं क्षोभ न,
हवें कशाला स्वर्गीं चंचल जाया कल्पविमान ?

माधवराव जेव्हां दूरदूरचे प्रवास करीत तेव्हां त्यांच्या आवडत्या विषयांचा प्रचार ते करीतच, पण त्याबरोबरच लोकस्थितीचें, समाजव्यवस्थेचें, आचार-विचारांचें, विविध बोलींचें, प्रांतिक वैशिष्ट्यांचें ते सूक्ष्म निरीक्षण करीत. त्यांची विद्यार्थीवृत्ति प्रवासांतहि नेहमींच जागी असे.

प्रवासांत ज्या ज्या गांवीं त्यांचीं व्याख्यानें होत, त्या त्या गांवीं त्यांचें कवितावाचनहि होई. सार्वजनिक ठिकाणीं ते सहसा कविता वाचून दाखवीत

[४] बाबासाहेब गरुड यांस ता. ३ सप्टेंबर, १९३० रोजीं धाडलेल्या इंग्रजी पत्रांतून.

नसत. खासगी बैठकींतील वातावरण त्यांना अधिक मानवत असल्यामुळें, ते अगदीं निवडक लोकांच्या समूहांतच त्या साविर्भाव व सविवेचन वाचीत; तांबे व चंद्रशेखर यांच्या कविता प्रामुख्यानें म्हणत व आग्रह झालाच तर स्वतःच्या व गिरीश किंवा यशवंत यांपैकीं कोणाच्या तरी एकाच्या म्हणून दाखवीत.

अर्वाचीन कवींत तांबे व चंद्रशेखर यांचेविषयीं त्यांना विशेष आदर व भक्ति वाटे. पुण्यास १९२०–२१ सालीं चंद्रशेखरांसंबंधीं त्यांनीं जसा विस्तृत काव्यविवेचनात्मक व व्यक्तिपरिचयात्मक लेख लिहिला, तसाच कोल्हापुरास १९३० सालीं तांबे यांजवर त्यांनीं लिहिला [५] व पुढें १९३५ सालीं तांबे यांच्या कवितासंग्रहाचें परिश्रमपूर्वक संपादन केलें. 'कांहीं गोष्टींच्या निर्णयासाठीं संभाषणाची व विचारविनिमयाची अत्यंत आवश्यकता आहे,' असें आढळतांच, स्वतःचीं कामें बाजूस ठेवून व पदरचा पैका खर्च करून ते कांहीं दिवस ग्वाल्हेरास तांबे यांजकडे जाऊन राहिले. त्यांना हस्तलिखित वाचून दाखवून, शंकास्थलांची पूर्ण चर्चा करून, प्रत्येक गोष्टीचा निर्णय त्यांनीं तांबे यांच्याकडून करवून घेतला. या संग्रहाला विस्तृत विवेचनात्मक प्रस्तावना जोडण्याचा त्यांचा विचार होता, परंतु संग्रहाचे प्रकाशक प्रो. मायदेव यांची त्यास संमति न मिळाल्यामुळें छोटी प्रस्तावना लिहूनच त्यांना काम आवरतें घ्यावें लागलें. [६] तांबे यांच्या कवितांच्या अभ्यासकांची माधवरावांविषयींची त्याबाबतची अपेक्षा त्यामुळें अतृप्तच राहिली. कांहीं टीकाकारांनीं या 'संग्रहा'च्या समालोचनांत तो दोष दाखविलाहि. माधवरावाना त्याबद्दल मुग्ध राहण्याविना अन्य मार्गच नव्हता. त्यांना मनांतून वाईट वाटलें होतें. आपण निरपेक्षपणें एवढे परिश्रम करावेत आणि आपल्या एका वाजवी इच्छेच्या विरुद्ध प्रकाशकानें आपलें मत व्यक्त करून आपला अधिकार चालवावा ही गोष्ट त्यांच्या

---

[५] लोकशिक्षण; सप्टेंबर, ऑक्टोबर १९३०

[६] "तांबेसंग्रहाकरितां मी जी मोठी प्रस्तावना लिहीत होतों, ती मायदेवांना या संग्रहांत देणें इष्ट वाटत नाहीं. तेव्हां तिचें पुढील लेखन मीं थांबविलें; आणि संपादकीय छोटी प्रस्तावना लिहून ती छापावयाला दिली."–लीलाबाईस पत्र, ता. २३ ऑक्टोबर, १९३५.

मानी मनाला फार लागली. लीलाबाईंना लिहिलेल्या एका पत्रांत त्यांची ही दुखावलेली भावना अस्पष्ट अशी व्यक्त झालेली आहे. माधवराव लिहितात: [७]
" तांबे यांच्या कवितांविषयींचें लेखन संपलें. अजून तीन-चार दिवस कच्चीं मुद्रितें तपासून द्यावीं लागतील. ता. १६ नोव्हेंबरला तांबे यांच्या वाढदिवशीं मायदेव एक समारंभ करून पुस्तक प्रकाशित करणार आहेत. बुइक एण्डनें मीं येऊन जावें अशी त्यांची फार इच्छा आहे. इतकें केलें तेव्हां उद्यापनाच्या वेळीं आतां कुरकुर कां, म्हणून मी कदाचित् येऊन जाईन. तांबे यांच्यासाठीं इतके कष्ट घेतले, इतके पैसेहि व्ययित केले, तेव्हां आतां थोडक्यासाठीं नाहीं म्हणूं नये. तसें म्हटलें तर कुटुंबांतील माणसांची कुचंबणा करून पोकळ मोठेपणा मिळविणें मला इष्ट वाटत नाहीं."

तांबे यांच्या कवितासंग्रहाचा प्रकाशनसमारंभ पूर्वयोजनेप्रमाणें ता. १६ नोव्हेंबर, १९३५ रोजीं 'केसरी-मराठा-कचेरी'च्या सभागृहांत 'महाराष्ट्र शारदामंडळा'तर्फें नरसिंह चिंतामण केळकर यांच्या अध्यक्षतेखालीं झाला. एका कवीनें दुसऱ्या एका कवीची कविता आस्थापूर्वक संपादन करावी याबद्दल केळकरांना मोठें कौतुक वाटलें. ते म्हणाले: " प्रो. पटवर्धन यांनी तांबे यांच्या समग्र कविता एकत्रित करून छापल्या यांत त्यांची उदार बुद्धि प्रामुख्यानें दिसते. पटवर्धन यांनीं कांहीं दिवसांपूर्वी कवि चंद्रशेखर यांच्या कविता संकलित केल्या. [८] पण त्या ठिकाणीं गुरु-शिष्य असा थोडासा संबंध तरी होता. पण कविवर्य तांबे यांच्या कविता एकत्रित करण्याच्या पाठीशीं त्यांच्या कवितांबद्दल त्यांना वाटणारा आदर हें एकच कारण सांगतां येईल. कविता आपण रचावी यांत विशेष आनंद होत नाहीं, पण कविता आपल्या इष्टमित्रांनीं वाचून त्यांना बरें वाटलें म्हणजे आपला आनंद द्विगुणित होतो. तांबे हे प्रसिद्धीला हपापलेले कवि नाहींत. 'सर्वः सगंधेषु विश्वसिति' हा शाकुंतलांतील न्याय कविवर्गामध्यें फारसा रूढ झालेला दिसत नाहीं. 'याचको याचकं दृष्ट्वा' हीच मत्सरी बुद्धि पुष्कळ कवींत आढळून येते. पण प्रसिद्धिपराङ्मुख असा

[७] ता. ३० ऑक्टोबर, १९३५.

[८] हें विधान बरोबर नाहीं.

एक कवि आणि त्याचा पुरस्कार करणारा दुसरा उदार कविमित्र हा आजचा योग माझ्या मतें फार महत्त्वाचा आहे."

माधवरावांचें जसें तांब्यांवर प्रेम होतें तसेंच तांब्यांचेंहि माधवरावांवर होतें. एकमेकांच्या वयांत खूप अंतर असूनहि ते त्यांना बरोबरीच्या नात्यानें वागवीत. तरुण कवींनीं कधीं त्यांचा उल्लेख केला म्हणजे ते म्हणावयाचे : "पटवर्धन फार deep आहेत अं! हं! अन् विनयशीलहि किती! माझ्यावर त्याचा लोभहि आहे फार; माझेंहि त्यांच्यावर प्रेम आहे. त्यांच्याविरुद्ध जर मला कांहीं त्यांना सांगावयाचें असलें तर मी उघड उघड त्यांच्यासमोर त्यांना सांगतों व तेहि सारें ऐकून घेतात गुपचुप! एक शब्द बोलत नाहींत. माझ्यावर त्यांचा विश्वास फार! त्याच्यांत खरा 'स्पार्क' आहे."[९] माधवरावांच्या लेखनगुणांबद्दल त्यांना विलक्षण कौतुक असे. ते म्हणत, "माधवरावांच्या स्वभावाप्रमाणें त्यांच्या लिखाणांतहि वैलक्षण्य, अपूर्व मौलिकता, धडाडी, निर्भयता, बंडाळी हे दुर्मिळ गुण आहेत."[१०]

१९३३ सालीं कोल्हापुरास महाराष्ट्र-साहित्य-संमेलन भरलें. त्याच्या काव्यशाखेचें अध्यक्षस्थान तांबे यांनीं त्या वर्षी मंडित केलें होतें. माधवरावां-वरील प्रेमामुळेंच, त्यांचा आग्रह मोडवेना म्हणूनच केवळ, शरीराला प्रवासाचे कष्ट झेपत नसतांहि, ते ग्वाल्हेरहून कोल्हापुरास आले. त्यांच्या कवितेचे कोल्हापुरांतील एक चाहाते श्री. नणदीकर यानीं त्याना एकदा माधवरावांबद्दल पत्रांत कांहीं लिहिलें असतां, त्यानीं त्यांस धाडलेल्या उत्तरांत त्यांजविषयीं लिहिलें होतें, "माधवराव पटवर्धन यांजविषयीं तुम्हीं बरेंच लिहिलें आहे. त्यांच्यासारखीं मजवर अकृत्रिम, निरपेक्ष प्रेम करणारीं माणसें खरोखरच विरळ. त्यांचा माझा एकप्रकारें संबंधहि आहे. त्यांची पत्नी ती माझी 'ताई!' तिला मीं अगदीं लहानपणापासून खेळविलेलें. ती मला माझ्या मुलीसारखी वाटते. तिलाहि 'दादा' (तांबे) म्हणजे तिचे वडील गरुडच वाटतात.

[९] भास्करराव तांबे यांशीं दोन घटका, वि. रा. डोंगरे, 'तांबे व्यक्ति आणि कला', पृ. ८९.

[१०] डॉ. श्रीखंडे यांस पत्र, २ एप्रिल, १९३६.

मी पुण्यास गेलों कीं, स्वागताची एक तांतड तिला व्हावयाची. दूर दादांचा तांगा दिसला कीं, मुलीनें धूम पळ काढलाच ! तिचें लग्न माधवरावाशीं झालें तें ऐकून मला किती आनंद झाला म्हणून सांगूं ! जागच्या जागीं एक हजार आशीर्वाद मीं उभयतांस दिले असतील. असे ते माधवराव माझ्या जिव्हाळ्याचे आहेत. त्याचा माझ्यावर केवढा विश्वास ! खरेंच सांगतों, त्यांचें पत्र आलें नसतें तर मी कोल्हापुरला येण्याची यातायात या वयांत केली नसती. पण त्यांच्या प्रेमापुढें माझी कोणतीहि अडचण टिकाव धरूं शकली नाहीं व आपल्यासारख्या निरामय प्रेमळ मित्रांची कायमची जोड मला लाभली याचें सारें श्रेय माझ्या माधवरावाना आहे. ईश्वर त्यांना उदंड आयुष्य देवो !" माधवरावाचा तांबे यांचेविषयींचा जिव्हाळाहि तितकाच उत्कट होता. नणदीकर यांच्या पत्नी सौ. लीलाबाई यांनीं त्यासंबंधींची पुढीलप्रमाणें एक आठवण 'सह्याद्रि' मासिकाच्या 'पटवर्धन स्मृत्यंकां'त [११] दिली आहे :

"एकदा अशीच कोणाच्या तरी काव्यगायनाची बैठक आमच्या घरीं होती. डॉ. माधवराव व इतर २५-३० मंडळी हजर होती. ज्यांचें काव्यगायन होतें त्या गायकांनीं कवितागायनास प्रारंभ केला. पण कां कोण जाणे, त्यांच्या काव्यगायनाला त्या दिवशीं कांहीं रंग भरेना. शिरस्त्याप्रमाणें कॉफीपान वगैरे झालें. थोडीबहुत मंडळी निघूनसुद्धां गेली. नंतर अगदीं सहज व सर्व मंडळींनीं आग्रह केला म्हणून, माधवरावांनीं कविता म्हणण्यास आरंभ केला. एक दोन स्वतःच्या कविता म्हटल्या. सर्व मंडळी आतुरतेनें ऐकूं लागली ; पण स्वतःच्या कवितेवर स्वतःच नाखूष होऊन त्यांनीं कविवर्य ताब्यांचें पुस्तक मागून घेतलें. अगोदरच तांब्यांच्या कविता, त्यांतून माधवराव म्हणणार. मग काय विचारतां ? 'कुणि कोडें माझें उकलील का ?' पासून प्रारंभ झाला. नंतर त्यांच्या 'महाप्रस्थानां'तील एकाहून एक सरस कविता झाल्या. 'रुद्रास आवाहन'ही कविता तर त्यांनीं अशी म्हटली कीं, त्यांच्या तोंडून निघालेले 'डुमडुमत डमरु ये' हे जोरदार निनाद अजून कानांत घुमतात. श्रोत्यांना, जणूं काय आपल्या खड्गाचा खणखणाट करीत रुद्राची भव्य मूर्ति उभी आहे कीं काय असा

[११] सह्याद्रि, जानेवारी, १९४०.

भास झाला. आणि अशाच कविता म्हणून, श्रोत्यांचीं अंतःकरणें हलवून, शेवटीं त्यांनीं 'रिकामे मधुघट' ही कविता म्हणून पुस्तक खालीं ठेवलें आणि अश्रूंनीं भरलेले आपले डोळे पुशीत, 'आतां नाहीं बुवा माझ्याच्यानं पुढं म्हणणं होणार!' ते उद्गारले. शेवटच्या कडव्यानें आपल्या डोळ्यांबरोबरच त्यांनीं आमचे डोळेहि ओले केले होते."

"तांबे ह्यांच्या काव्याविषयीं तर त्यांना आत्यंतिक आदर होताच. पण तांबे ह्या व्यक्तीविषयींहि त्यांचें अंतःकरण प्रेमानें आणि जिव्हाळ्यानें तुडुंब भरलेलें असे. 'स्वतःच्या कविता म्हणण्यापेक्षां ताम्यांच्या कविता म्हटल्यानें मला जास्त समाधान व आनंद वाटतो,' असें ते नेहमीं म्हणत असत. ताम्यांच्या विषयीं बोलतांना त्यांचे अंतःकरण प्रेमानें भरून येई. 'रिकामे मधुघट' तर त्यांच्या डोळ्यांतून अक्षरशः पाणी काढीत."

"काशीला जावयाचा योग व ताम्यांना भेटावयाचा योग एकदम आले तर मी अगोदर ताम्यांच्याकडे जाईन, असें ते वरचेवर बोलून दाखवीत."



माधवरावांनीं कोल्हापुरांत असताना जें स्फुट लेखन केलें, त्यांत त्यांनीं मद्रास येथील के. रामकोटिश्वर राव यांच्या संपादकत्वाखालीं प्रसिद्ध होणाऱ्या 'त्रिवेणी' या इंग्रजी मासिकासाठीं लिहिलेले लेख व आपल्या कांहीं कवितांचीं केलेलीं भाषांतरें होत. अर्वाचीन मराठी काव्याची पहिली ओळख महाराष्ट्रेतर मंडळीस माधवरावांनींच आपल्या 'Modern Marathi Poetry' या लेखानें १९३१ सालीं करून दिली. तदनंतर त्याच्या 'नावेंतील गाणें,' 'संगमोत्सुक डोह,' 'प्रेमाची वकिली,' 'पापशंकी,' 'ऐकव तव मधु बोल,' 'चल उडुनि पांखरा,' 'अज्ञात वीरास,' 'फकीराचें गाणें' या कवितांचीं त्यांनीं स्वतःच केलेलीं भाषांतरें प्रसिद्ध झालीं. याशिवाय त्यांचे 'The All India Language,' 'The Native Idiom in Marathi,' 'Linguistic Frontiers' हे लेख प्रसिद्ध झाले.

माधवरावांच्या कविता 'त्रिवेणीं'त प्रसिद्ध होऊं लागल्यावर सहाजिकच महाराष्ट्रांतील इतर प्रमुख साहित्यिकांचें निवडक लेखन त्यांत प्रसिद्ध व्हावें असें संपादकांना वाटूं लागलें. त्यांनीं तसें तें मिळवून प्रसिद्ध केलेंहि. गेल्या दहा-बारा वर्षांत प्रो. फडके, खांडेकर, यशवंत, कुसुमाग्रज वगैरेंच्या गोष्टी व कविता 'त्रिवेणीं'तून अनेक वेळा प्रसिद्ध झालेल्या आहेत.

'त्रिवेणीं'त प्रसिद्ध झालेल्या माधवरावाच्या कवितापैकीं दोन येथें नमुन्यादाखल देतों. त्याच्या इंग्रजी भाषाशैलीची त्यावरून चांगली कल्पना येईल. या अनुक्रमें 'नावेचें गाणें' व 'पापशंकी' या कवितांचीं भाषांतरें आहेत.

## THE ROWER TO HIS BELOVED

What shall I sing? Whence can I invoke such melodies as yours? Rather should you, as you hold the rudder-handle sing your refreshing song.

Where the queen of melodies sings her lovely airs, why should my learned self unfold a dry tale? Sing, O Muse, your song of twilight passion. The lamp of evening grows brighter; soar up into the empyrean.

There far away is the west coloured by the kisses of the golden water. On the river the waves have all sunk into silence. The thick clusters of trees on both the banks seem to rest on the river's bosom. Only in the web of your *sari* and of your song there is the glancing of waves.

On such a charming evening, it is but your life to break into a song when the God Varuna sheds from above the light of the roseate feeling. Toil is my life whether peace is mine or not. My greatest fortune it is to mark time with my oars as you sing.

## LOVE'S ANXIETIES

When in the evening, after the day's toil, I hurry home, untold fears rush upon my soul. The impatient soul is all ear to catch any sound of yours, my baby. As my hesitating step falls on the threshold, I hear your sportive voice as you play with your mother, and at once, O darling, with joy I shout your name. And as you look up to offer me such sweetness from your eyes, I lift you up to press you to my heart and to kiss you.

When at home I am absorbed in work, a sudden cry from somewhere startles and drives me to you. And I look into the cradle to find you are in sound peaceful sleep. Lightly I place my hand on your head, and as lightly I kiss you but with a sad, sad tenderness.

The day is gloomy with clouds and rain; and yet, O child, your golden smiles brighten my home.



कोल्हापुरांत, बाह्यत: ते सर्व दृष्टींनीं समाधानांत असलेले जरी दिसत, तरी अंतर्यामीं ते असमाधानीच असत; अन्य कोठें मनाजोगी नोकरी मिळाल्यास कोल्हापुर सोडून जावें असें त्यांना वारंवार वाटे. १९३५ सालीं तशी त्यांना संधीहि आली. रा. वि. मराठे यांस ते लिहितात :[१२] "तुला ठाऊकच आहे कीं, मला येथील नोकरींत समाधान वाटत नाहीं. कोठें दुसरीकडे सोय न झाली तर येथें निमुटपणें राहणें प्राप्तच आहे. दुसरीकडे कोठें सोय होईल अशी आशाहि वाटत नव्हती पण, आयुष्यांत कांहीं गोष्टी अकल्पितपणें घडतात. हिंगण्याच्या मंडळींपैकीं कांहींना मी त्यांच्या कॉलेजांत काम करावें अशी इच्छा झाली. आणि अचानक त्यांनीं माझ्याशीं बोलणें चालू केलें. त्यांचें म्हणणें असें कीं, विद्यापीठ ही आतां सरकारनोंदीव संस्था होऊन ठाकरसी

[१२] ता. १० सप्टेंबर, १९३५.

ट्रस्टशीं झालेली तडजोड हायकोर्टाच्या संमतीनें कायदेशीर झाली असल्यानें संस्थेच्या शाश्वतीविषयीं चिंता नाहीं. ते मला पुणें येथें राहतां येईल असें काम देणार. कदाचित् कांहीं काळ पुढें मुंबईस रहावें लागल्यास २५ रुपये अधिक मुंबईखर्च म्हणून देणार. विद्यापीठाची व्यवस्था यापुढें अनाथ-बालिकाश्रमाकडे नसून विद्यापीठाच्या सिंडिकेटकडे आहे. सिंडिकेट नेमणुकी करणार. सध्याच्या सांपत्तिक स्थितींत सिंडिकेटनें आचार्यांचा पगार १०० – १२५ केला आहे आणि ते प्रॉव्हिडंट फंडाची व्यवस्था करीत आहेत. माझ्या पात्रतेकडे पाहून त्यांनीं मला एकसमयावच्छेदें रु. १२५ पगार आणि २५ रुपये अधिक ( प्रॉव्हिडंट फंडाच्या व्यवस्थेसाठीं ) मिळून १५० देण्याचें योजिलें आहे. माझ्या स्वास्थ्याची व्यवस्था मग मींच करावयाची आहे. मीं मराठीचा आचार्य म्हणून काम करावयाचें आहे. मी माझ्या खात्याचा वरिष्ठ म्हणूनच रहाणार. तिकडे जाण्यानें माझी आर्थिक हानी होत नाहीं असें नाहीं. माझा पगार नुकताच १५५ झाला आहे, तो आणखी दहा वर्षांनी दोनशें होईल. परंतु येथील एकंदर वातावरण — विशेषतः कॉलेजांतील — समाधानकारक नसल्यानें मला पुण्यास जाण्याचा मोह झाला. पत्नी, श्वशुर आणि कांहीं स्नेही यांचा सुविचार घेतां मीं सरकारी नोकरी सोडून पुण्यास जाणें वावगें नाहीं असें ठरलें. स्त्रियांच्या कॉलेजांत सिंडिकेटनें माझी नेमणूक करण्यात माझा मोठाच नैतिक विजय आहे, असेंहि कित्येकांस वाटलें. पूर्वी फर्ग्युसन कॉलेजांत मी विचार करून गेलों होतों त्यामुळें आर्थिक हानीची भीति मला फारशी वाटत नाहीं. पुण्याला जावें आणि आतां स्वस्थलीं स्थायी व्हावें हें बरें."

"तुला हें कितपत आवडेल हें मला सांगता येत नाहीं. एकदां वाटतें कीं, तुला यात थोडासा अव्यवहार दिसला तरी एकपरीनें तें हितकारकच वाटेल. कोठेंतरी मोकळिकीच्या स्थळीं स्थायिक होऊन आयुष्याच्या कर्तव्याला लागावें असें मला वाटतें."

"अजून माझी नेमणूक पुण्यास झाली नाहीं. ती झाली कीं, मी पुण्यास बहुशः ऑक्टोबरच्या १६-१७ तारखेला जाईन. सहा महिने भाड्यानें राहून

त्या अवधींत एखादें टिकाऊ घरटें बाधून मग त्यांत राहायला जावें असा विचार आहे."

महिला विद्यापीठाच्या सिंडिकेटनें योग्य वेळीं माधवरावांची नेमणूक करून त्याप्रमाणें त्यांस कळविलेंहि. परंतु मध्येंच एक भावनेची बाब उपस्थित झाली. माधवराव विद्यापीठात काम करावयास येणार होते, ते केवळ पुण्यास स्थायिक व्हावयास मिळणार या एकाच आशेनें. ही आशा फलद्रूप व्हावयाची म्हणजे प्रो. वामन मल्हार जोशी यांची बदली मुंबईस करणें प्राप्त होतें. वामनरावांस मुंबईस राहाणें मनापासून मुळींच पसंत नव्हतें. त्यांची ही नापसंती माधवरावाच्या कानीं आली. आपल्यामुळें वामनरावांस, त्यांस नको असलेल्या स्थळीं जावें लागत आहे, हें पाहून त्यानीं कोल्हापुर सोडून पुण्यास जावयाचे नाहीं, असें ठरविलें व त्याप्रमाणें विद्यापीठासहि कळवून टाकलें. आपण आपला विचार का बदलला याची, आपल्या पत्नीखेरीज इतर कोणाकडेहि त्यानीं कधींच वाच्यता केली नाहीं. पुष्कळांना त्यांच्या या नकाराबद्दल आश्चर्य वाटलें. अनेकजणानीं त्याना कारणें विचारलींहि. पण त्यानीं आपल्या हयातींत तीं कोणालाहि सांगितलीं नाहींत. विद्यापीठाला आपला नकार कळविल्यानंतर त्यानीं लीलाबाईंना धाडलेल्या पत्रात या प्रकरणासंबंधीं पुढीलप्रमाणें लिहिलें आहे :

"वामनराव जोशी भेटले. त्यांचीच बोलायची इच्छा होती म्हणून बोलणें झालें. त्यांचें म्हणणें असें कीं, 'आपली इच्छा नसतांहि तुमच्या येण्यानें आपल्या हितसंबंधात विरोध येत होता. पुणें मिळालें तर तुम्ही येणार होता आणि पुणें सोडून मुंबईला जायचें माझ्या मुळींच मनांत नव्हतें. मला सरळ विरोध करून माझा हेतु साधतां आला असता, पण तसें करणें मला विद्यापीठाच्या हिताच्या दृष्टीनें इष्ट वाटेना. आणि तुमचा सरळ पुरस्कार करून स्वतःच्या पायावर धोंडा पाडून घेणेंहि इष्ट वाटेना. एकमेकांतील हितसंबंध-विरोध गुप्तपणें का होईना मीं तुम्हाला स्पष्टपणें सांगितला असता, तर तुम्ही आरंभींच येत नाहीं म्हणून सांगितलें असतें. तेंहि मला विद्यापीठाच्या दृष्टीनें इष्ट वाटेना. तेव्हां मीं विरोध न करण्याचा, म्हणजे तटस्थ राहण्याचा निश्चय

केला. तुमचा ठराव मान्य झाला आणि तुम्ही आल्यावर मला जावें लागणार होतें, त्याच्यासाठीं मनाची सिद्धता मी करीत होतों. पण तुम्ही माझ्यासाठीं न येण्याचें ठरवून हें जें श्रेय मला मिळणार होतें तें घालविलें' अशा आशयाचें त्यांचें बोलणें झालें. आतां या गोष्टीवर कोठेंहि बोलायचें नाहीं असें मीं ठरविलें आहे."

माधवरावांना वामन मल्हारांबद्दल फार आदर असे. आणि वामनरावांचाहि माधवरावांवर तसाच लोभ होता. यामुळेंच हीं दोन्ही उदार अंतःकरणाचीं थोर माणसें परस्पराचा हितविरोध निर्माण होताच एकमेकासाठीं त्याग करावयास सिद्ध झालीं. असें सौजन्य आणि असा त्याग दुर्मिळच!

वामनराव जोशी कोल्हापुरास एकदां माधवरावांकडे गेले असतां, त्याच्या भेटीबद्दल माधवरावांनीं लीलाबाईंस लिहिलें होतें: "वामनराव जोशी एकदा माझ्याकडे येऊन गेले. मी कॉलेजातून घरीं आलों नव्हतों. दुसऱ्या दिवशीं दुपारीं ते आले. तासभर बसून चहा घेऊन, गप्पा मारून गेले. थोर माणूस! मला आपलें घर धन्य झालें असें वाटलें—पण किती साधा निरभिमानी मनुष्य!"

प्रो. वामन मल्हार जोशी यांच्याकरितां, महिला विद्यापीठातील नेमणूक नाकारून, कोल्हापुरातच राहण्याचें जरी त्यांनीं ठरविलें तरी, स्वतःला आयुष्यातील कांहीं दिवस जेथे निवान्तपणें सुखासमाधानांत घालवितां येतील असें 'घरटें' पुण्यांत बांधण्याचा विचार मात्र त्यांनीं रद्द केला नाहीं. त्यांनीं कांहीं वर्षांपूर्वी आपल्या श्वशुराच्या बंगल्याच्या मागें जागा घेऊन ठेवलीच होती. त्या ठिकाणीं लहानसेंच का होईना घर बांधण्याचा बेत त्यांनीं पक्का केला. व पुढें १९३७ सालीं तो अमलातहि आणला. डेक्कन जिमखाना वसाहतींत प्रभात रस्त्यावर त्यांनीं 'निवान्त' नांवाची एक छोटीशी बंगली बांधली. त्यांची पुष्कळ दिवसांची मनीषा पूर्ण झाली.



**महिला विद्यापीठांतील नोकरी नाकारल्यावर त्यांनीं मनाशीं एक खूणगांठ बांधून ठेवली कीं, आपला कोल्हापुराशीं जडलेला अन्नऋणानुबंध तुटण्याचा**

योग जवळपास तरी कांहीं दिसत नाहीं. तेव्हां आहे त्या परिस्थितींतच समाधान मानून व शक्य तितकी अलिप्त वृत्ति बाळगून, कोल्हापुरांत व्यवसायापुरतेंच राहावयाचें असें त्यांनीं मनाशीं ठरविलें. आणि त्याप्रमाणेंच कोल्हापुरांतील पसारा आवरता घेऊन, मुलें व पत्नी यास त्यानीं पुण्यासच ठेवलें. पूर्वींची नणुंद्रेकराच्या घरातील मोठी जागा सोडून ते चौगुले रस्त्यावरील टेबे याच्या घरीं बेताचीच जागा घेऊन राहूं लागले. या घरांत राहावयास आल्यावर त्यांनीं १९३८ साली 'तुटलेले दुवे', 'भाषाशुद्धि-विवेक', 'पद्यप्रकाश' व १९३९ सालीं 'नकुलालंकार' हीं पुस्तकें प्रसिद्ध केलीं. कोल्हापुरच्या ससाराप्रमाणेंच त्यानीं आपल्या साहित्यसंसाराचीहि जणूं काय आवराआवर चालविली होती ! त्याच्या मनोवृत्तींतहि झपाट्यानें बदल घडून येत होता. बाह्य जगापासून दूर राहून स्वतांःतच गढून जाण्याची वृत्ति त्यांच्यात बळावूं लागली होती. साहित्यिकाला अभिमानास्पद वाटणारे सारे मानसन्मान त्यांना त्याच्या आयुष्याच्या या उत्तरार्धांत उपभोगावयास मिळत होते, पण त्यात त्याना विशेषसा आनंद वाटत नव्हता. तो आनंद उपभोगण्याचा काळ निघून गेला असल्यामुळें त्याच्या दृष्टीनें त्यांत कांहीं स्वारस्य राहिलें नव्हतें. त्यानीं आपल्या एका 'कणिकें'त म्हटलें आहे :

"कां करिशी, म्हणती, शोक असा संभ्रमें ?
हेमन्तामागुनि वसंत येई क्रमें.
    पण काय तयाचें समाधान त्याजला
ग्रीष्मांत जलाविण मासा मेल्यावरी
ओढ्यास पूर जरि वर्षा आणी तरी ?"

# १८

## सखे, सोयरे व साहित्यिक मित्र

माधवरावांचा इष्ट-मित्रांचा परिवार फार मोठा होता. या मित्रांत तीन प्रकार होते. वैयक्तिक, साहित्यिक व समव्यवसायिक. पहिल्या प्रकारात मोडणाऱ्या मित्रांची संख्या अल्प, तर दुसऱ्या दोन प्रकारांतील विपुल होती. वैयक्तिक मित्रांत भाटे, मराठे, शिंदे व घाटे या चौघांचीच गणना करतां येईल. आपल्या जिवींचें हार्द ज्यांच्याकडे माधवराव मोकळेपणानें व्यक्त करू शकत अशी ही मित्रचौकडी होती. माधवराव ज्या विशिष्ट निरपेक्ष, निर्हेतुक प्रेमाची अपेक्षा करीत ते प्रेम या चौघांहि मित्राकडून त्यांना मिळालें. माधवरावांच्या सुखदुःखांत, अडीअडचणींत, आयुष्यांतील अनेक वादळी प्रसंगांत त्यांचें प्रेम, त्यांचा विश्वास, त्यांची सहानुभूति व निष्ठा अविचलित राहिला. साधारणतः, मित्र म्हणविणाऱ्यांत सदान् कदा खासगी आयुष्यांत डोकावून पाहण्याची विकृत वृत्ति त्यांच्यांत चुकूनसुद्धां कधीं उद्भवली नाहीं. माधवराव म्हणत: “ किती उदार अन् निरपेक्ष माझे हे मित्र ! माझ्याबद्दल, आयुष्यांत किती वंड्या अन् प्रवाद उठले पण यांनी एकदा सुद्धां कधीं त्याबद्दल जिज्ञासा दाखविली नाहीं. मी होऊन त्यांना कधीं सांगेन तेव्हांच ते काय बोलतील, विचारतील तेवढेंच. अशा वृत्तीचे हे माझे मित्र आहेत म्हणूनच तर त्यांच्या-माझ्यामधील ऋणानुबंध अतूट राहिले. नाहींतर आयुष्यांत किती व्यक्तींनीं स्नेह जोडला आणि तोडला. काहीं विशिष्ट अपेक्षांनीं प्रेरित होऊन हा स्नेह जोडलेला असे, आणि त्या आपल्या मनाप्रमाणें सफल झाल्या नाहात कीं, साहजिकच स्नेह तुटे. कित्येकदा बाह्यतः तो तुटल्यासारखा दिसला नाहीं, तरी अंतःकरण स्नेहशून्यच असे. ही स्थिति मोठी दुःखद असते. आणि म्हणूनच मी म्हणत असतों कीं, एक वेळ मित्राचा मृत्यु पुरवेल पण

मैत्रीचा मृत्यु ही कल्पनाहि दुःसह आहे." आणि तसे अनुभव माधवरावांना त्यांच्या आयुष्यांत कितीतरी आले होते. पण त्यामुळें त्यांनीं आपल्या जीवनांत कधीं कटुता येऊं दिली नाहीं. इतकेंच नव्हे तर त्यांनीं अशा व्यक्तींचें यावज्जीव भलेंच इच्छिलें. याचें एक उत्कृष्ट उदाहरण म्हणजे बडोद्याच्या त्यांच्या सहाध्यायिनी मैत्रिणीचें होय. या मैत्रिणीविषयींचें कित्येक वर्षांचें आपलें अप्रकट मुग्ध प्रेम तिच्यापुढें प्रत्यक्ष शब्दांनीं प्रकट केल्यावर व त्याचा अल्प काळ का होईना स्वीकार झाल्यावर जेव्हा त्यांना तिच्या तोंडून, 'आहेस प्रिय तूं, अशक्य परि मी होणें तुझी अंतुरी,' हे उद्गार ऐकण्याची वेळ आली, तेव्हां त्या क्षणीं व पुढेहि कांहीं काळ भग्नाश होऊन दावानलांत होरपळून निघावें त्याप्रमाणे त्यांची जरी स्थिति झाली, तरी त्यांनीं आपल्या मनाला असूयेची भावना कधीं शिवूं दिली नाहीं, उलट

हो माझीच असें तुला विनविलें कां मी मनें उद्धट ?
घाली तो मजलाच हार म्हणुनी कां घातलें संकट ?
राहूं देच अपारदर्शक अतां दोघांत अन्तःपट,
न स्वाभाविक हा, असेंहि म्हण जा, प्रेमांतला पालट.
प्रीतीच्या धनसंपदेंत भरुनी त्यागात्मता राहिली
देतां प्रीति मिळेच ती, स्थिति अशी कोणी कधीं पाहिली ?
स्वार्थाची कुसुमांजलि प्रिय हिला ती पाहिजे वाहिली,
कर्तव्याचरणीं मनास मग हो वा शांति वा काहिली,
तूं मैनाच मनांतली म्हणुनि का कोंडूं तुला पंजरीं ?
तूं आहेस सदा स्वतंत्र ललिते जा चारुतामंजरी.
मांगल्यप्रद माळ घाल कुणिही श्रेष्ठाचिया कंधरीं.
होतां सूख तुला मला परतुनी पावेल तें अंतरीं.

असेंच म्हटलें. पुढ कांहीं वर्षांनंतर त्यांनीं फर्ग्युसन कॉलेजला उद्देशून 'प्रेम होईना तुझ्यानें' या गज्जलांत ज्या भावना व्यक्त केल्या त्याच त्या वेळींहि प्रकट केल्या आणि आपल्या पुढील वर्तनांत त्या उतरविल्याहि. अपेक्षा लाभ झाला नाहीं म्हणून त्यांनीं डोक्यांत राखहि घातली नाहीं किंवा मनोमंदिराला स्मशानाची कळाहि आणली नाहीं.

प्रेम होईना तुझ्यानें, प्रेम माझें राहुं दे!
आचरूं ये धर्म तूझा तूं नि मी माझा मुदें.

असेंच म्हणून निरोप घेतला. ही सहाध्यायिनी पुढें तिच्या दुसऱ्या एका सहाध्यायाशीं विवाहित होऊन आयुष्यांत स्थिर झाली; तिला उच्च दर्जाची नोकरी मिळून समाजांत तिचा चांगला नावलौकिक झाला. विवाहोत्तर जवळ जवळ अकरा वर्षे ती संसारांत व सार्वजनिक कार्यांत पुरी गुंगून गेली. आपल्या विद्यालयीन मित्राला ती जवळ जवळ विसरल्यासारखीच होती. माधवराव मात्र तिला विसरले नाहींत. ते दूर राहिले असले तरी तिची स्मृति त्यांच्या चित्तांत कायम होती. पूर्वीची भावनेंतील तीव्रता व आसक्ति राहिली नव्हती; त्या जागीं भक्तीनें प्रवेश केला होता. आपल्या या बदललेल्या अवस्थेचें त्यांनीं 'निर्माल्य-समर्पण' या गज्जलांत खालीलप्रमाणें वर्णन केलें आहे:

स्फूर्ती दिली तूं, गाइलीं मी फार पूर्वीं गायनें,
पायीं तुझ्या मी वाहिलीं तीं प्रेमगीतोपायनें,
 पिवळी जुनी कविता-वही ही पाहुनि वाटे अतां
सायंतनीं स्मरतां उषा वाटे जसें हासताननें!

दृष्टींतुनी चुकती न हे जरि सांप्रदायिक मायनें
गवसे अकल्पित अर्थही नवसूक्ष्मभावरसायनें,
 माझीच मात्र न हो मला जाणीव राजस मानिनी,
कवनांत माझ्या ऐकतों तव मागलीं मधुभाषणें.

माझ्या-तुझ्यामधिं सांचलें कित्येक वर्षांचें धुकें,
विसरून गेलों गान तें कीं जाहलों दोघे मुके,
 ती तीव्रता, आसक्ति ती गेली, अहंता लोपली,
भक्तीच केवळ राहिली, न हिचा जिवंत झरा सुके.

 बदलूनि मंत्र जुना पुन्हा निर्माल्य हा तुज वाहिला.
 दिन संपला, कृष्णांबरीं ध्रुव मात्र तेवत राहिला.

१९२९ सालीं, माधवरावांची व या सहाध्यायिनीची त्यांच्या एका आप्ताच्या घरीं एकदा आकस्मिकपणें गांठ पडली. एकमेकांनीं एकमेकांचें कुशल

विचारलें. त्यांत त्यांना कळून आलें कीं, आपण समजतों तितकी आपली मैत्रिण सुखी नाहीं. त्यांनीं तिला आपल्या घरीं आस्थापूर्वक बोलावून घेतलें. अकरा वर्षांनंतर त्यांची भेट होत होती. कांहीं वर्षे सुखानें संसार केल्यानंतर पति–पत्नींत बेबनाव होऊन संसार उध्वस्त होण्याच्या मार्गाला लागला होता, असें माधवरावांना अ ढळून आलें. तिच्या तोंडून तिच्या त्या भग्नसंसाराची करुण कहाणी ऐकत असतां माधवरावांचें अंतःकरण अनंत वेदनांनीं भरून गेलें. ते कळवळले आणि म्हणाले, " मी तुमचा भाऊ आहें. तुमच्या पाठीशीं मी राहीन माझी सहानुभूति तुम्हाला पूर्णपणे मिळेल. तुम्ही हताश होऊ नका. धीरानें वागा " दुसरा एखादा मनुष्य बाह्यतः सहानुभूति दाखवून अंतरात आनंदला असता, आणि म्हणाला असता, 'भली जिरली. चांगलें प्रायश्चित्त मिळालें.' पण माधवरावांच्या प्रेमाची जातच वेगळी. १९३० सालापासून या सहाध्यायिनींचा आणि त्यांचा पत्रव्यवहार होऊ लागला, जुने स्नेहाचे तुटलेले धागे पुन्हा जोडले जाऊ लागले. माधवरावांनीं आपल्या भावनांवर आतां पूर्णपणें विजय मिळविलेला होता; ते त्यांचे करडे स्वामि झाले होते. कसलाहि मोह त्यांना त्यांच्या निग्रही वृत्तीपासून विचलित करणे शक्य नव्हता. आपली अलिप्तता राखून, समतोलपणें व स्वच्छ दृष्टीनें आपल्या सहाध्यायिनींच्या जीवनविषयक प्रश्नाचा विचार करून, त्यांनी आपला अभिप्राय व्यक्त केला व इष्ट वाटल्या त्या व्यावहारिक सूचनाहि तिला केल्या. तिच्या मनाची अस्थिरता पाहून त्यांनीं तिला एका पत्रांत[१] लिहिलें होतें :

" हो ! तुमच्याकडून मजवर सारखा पत्रांचा वर्षाव होत होता. आणि तीं सारीं आज तारखेपर्यंत अनुत्तरीतच राहिलीं. तीं तशीं अनुत्तरीत ठेवल्याशिवाय गत्यंतरच नव्हतें मला. 'तीं सारीं धमक्यांनीं, असंतोषानें, कागाव्यांनीं, आत्मसमर्थन करण्याच्या प्रयत्नांनीं भरलेलीं होतीं' असें तुम्हीच लिहितां आणि त्या साऱ्या दौर्बल्याबद्दल आता तुम्हीच दिलगिरी व्यक्त करीत आहात, हा तुमचा चांगुलपणा आहे. पण अस्वस्थ प्रकृतीच्या रोग्याकडून, त्याच्या उतावळ्या वागणुकीबद्दल दिलगिरी व्यक्त व्हावी अशी कोणाचीच कधी

---

[१] कोल्हापूर, ता. २३ जुलै, १९३१ ; मूळ पत्र इंग्रजींत आहे.

अपेक्षा नसते. मला आज तुमच्या व्यथेचें विश्लेषण करून आज तुमच्यापुढें मांडावयाचें नाहीं. मनुष्य, वाढतें वय व अनुभव यामुळें बदलणें अपरिहार्य आहे, अशी माझी समजूत आहे पण तुम्ही मात्र एवढ्या वर्षांत बदललेल्या दिसत नाहीं. तुमचा स्वभावधर्म पूर्वी जसा होता तसाच आजहि आहे. १९१८ ते १९२९ पर्यंत तुमचें नाव काय तें मजकडे शिल्लक राहिलें होतें. आणि गेल्या दोन वर्षांत तुमच्या माझ्या भेटीगाठी झाल्या खऱ्या, पण त्या अधून मधून व अल्प क्षणाच्या. त्यामुळें तुमच्याबद्दलचा माझा हा समज चुकीचाहि असण्याचा संभव आहे. पण, गेल्या दोन महिन्यात तुम्ही मला जीं पत्रें लिहिलींत तीं वाचून, १५–१६ वर्षांपूर्वी तुमच्या मनाचें मी जें विश्लेषण केलें होतें तेंच बरोबर होतें, असें आजहि मला वाटते. जाऊ द्या त्या गोष्टा."

"टॉडचें 'मॅन्युअल' वाचा असें मी तुम्हाला लिहिलें. तुम्हाला वाटलें, 'काय क्षुल्लक उपाय!' पण तुम्हाला हें ठाऊकच असेल कीं, त्या पुस्तकानेच मला एका काळीं सर्वनाशातून वाचविलें आहे. तें पुस्तक श्रद्धापूर्वक वाचून व त्यांतील विचार पचनीं पाडून ते प्रामाणिकपणे तुम्ही जर कृतींत आणाल तर तुम्हीहि खात्रीनें वाचाल."

"आज ह्याच्याकडे जावें, उद्यां त्याच्याकडे जावें, आणि आपल्या परिस्थितीची चर्चा करीत बसावें, ह्यांत काहीं अर्थ नाहीं. चर्चा आणि वादविवाद हे ह्या प्रकरणीं निरुपयोगी आहेत. कशाची जर अत्यंत आवश्यकता असेल, तर ती निग्रही आणि नियमबद्ध अशा आयुष्यक्रमाची. त्यानेंच तुम्हाला शांति, सामर्थ्य व निर्भयता हीं प्राप्त होतील."

"तुम्ही आपल्या प्रत्येक पत्रात मला लिहीत असतां कीं, 'माझीं पत्रें लीलाबाईंना वाचावयाला द्या.' त्याच त्याच सूचनेचें तुणतुणें वाजवीत बसण्याची आवश्यकता तुम्हाला का वाटावी हें मला कळत नाहीं. लीलाबाई जर मत्सरी असतील अन् त्यांना जर माझ्यावर विश्वास नसेल तर तुमचीं कितीहि पत्रें मी त्यांना वाचावयाला दिलीं तरी गृहसौख्य अबाधित ठेवावयाला तीं असमर्थच ठरतील. वस्तुस्थिति अशी आहे कीं, लीलाबाईंना तुमचीं पत्रें जेव्हां वाचावींशीं वाटतात तेव्हां त्या तीं वाचतात, मात्र एका स्त्रीनें आपल्या नवऱ्याला 'असें काय लिहिलें आहे,' हें जाणण्याच्या कुतूहलानें नव्हे."

"XXXX यांची, माझी भेट घेणें किंवा माझ्याशीं भाषण करणें या बाबतींत आपल्याला भयंकर भीति वाटते, तेव्हा परस्परानीं परस्परांशीं पत्रव्यवहार करूनच संबंध ठेवावे असें तुम्ही लिहितां. ते तसे ठेवावयालाच हवेत कशाला? आणि हें पहा, पत्रव्यवहार करण्यात जर काहीं भीति वाटत नाहीं तर भेटी-गांठी घेण्यात, बोलणें-भाषण करण्यांत भीति कशाला बाळगायला हवी? मला नेहमीं शौर्य-धैर्यानें वागणेंच अधिक आवडतें. तुम्हींहि तसेंच वागावें असें मला वाटते. **Clear eyed freedom is generally a saviour.**"

दुसऱ्या एका पत्रांत[२] ते या सहाध्यायिनीला लिहितात: "मला वाटलें होतें कीं, तुम्हीं आतां भयंकर संतापून लिहाल. पण आजच्या पत्रांतील तुमचें समधात व शांत वृत्तीचें लिहिणे वाचून, तुमच्यांत नवें मनःसामर्थ्य गोळा होत आहे असें वाटतें. तुमच्या 'ॲटर्नी केस'चा, तुमची तशी इच्छाच असेल तर मी आनंदानें स्वीकार करीन. तुम्हीं मला १६ वर्षांपूर्वी दिलेलें XXX व XXX हीं आजहि तुम्हांला माझ्या टेबलावर आढळतील. या वस्तु मला दिल्याचें तुमच्या कदाचित् स्मरणातहि नसेल. या वस्तूंत या 'केस'ची आणखी एक भर पडेल. पण या वस्तूंपेक्षां शात, सोज्ज्वळ अशा मैत्रीचा पुनर्लाभ होत आहे, ही गोष्ट मला अधिक मोलाची वाटते. पण त्याबरोबरच तुम्हाला मी हेंहि सांगू इच्छितों कीं, तुम्हाला जर गमावलेले वैवाहिक सौख्य पुन्हां मिळत असेल, तर तुमच्या माझ्यामधील हे स्नेहाचे धागे कायमचे तुटले व नष्ट झाले तर त्याबद्दल मला यत्किंचितहि खेद वाटणार नाहीं. तुमचा वाढदिवस XXXX शीं तुम्हीं कसा घालविला याचें जें वर्णन तुम्ही पत्रांत केलें आहे ते वाचून, तुमचें वैवाहिक सौख्य तुम्हाला पुन्हां मिळेल अशी मला आशा वाटू लागली आहे. ती फोल ठरली तर मोठे दुर्दैवच ओढवलें म्हणावयाचें! तुम्ही आज मोठ्या चमत्कारिकच परिस्थितींत सापडला आहां. मला पुष्कळदा वाटतें कीं, तुम्हीं अगदीं धुंद, बेहोष बनून, व अंतःकरणातील

---

[२] कोल्हापूर, ता. २३ सप्टेंबर, १९३१. हेंहि पत्र इंग्रजींत आहे. त्यांतील काहीं भाग गाळून तें येथें उद्धृत केलें आहे.

सारी उत्कटता एकवटून त्यांजवर प्रेम केलें असतेंत, तर गोष्टी या थराला आज येऊन पोंचल्या नसत्या. नाहीपेक्षां, तुम्हीं इतक्या समर्थ, स्वावलंबी व आत्मसंतुष्ट तरी बनावयाला पाहिजे होतात की, सध्याची नको असलेली परिस्थिति निर्माणच होती ना! पण प्रस्तुत परिस्थितीसारख्या नाजुक परिस्थितींत मूक राहून, कधीं ना कधीं तरी मंगलच घडेल अशी आशा करीत राहणें हेंच अधिक श्रेयस्कर ठरेल."

त्याच्या या सहाध्यायिनीचें वैवाहिक आयुष्य पुढें कधीं सुधारलेंच नाहीं. पति-पत्नी एकमेकांपासून दूर झाली ती कायमचीच. माधवरावांना त्याबद्दल फार हळहळ वाटे. आपल्या या मैत्रिणींतील मानसिक दौर्बल्य जाऊन, तिच्यांत स्वावलंबन, सामर्थ्य व समाधान वृत्ति हीं कशी बाणतील याची त्यांना यावज्जीव काळजी वाटत असे.

माधवरावांची प्रीति आणि भक्ति हीं अशीं उदार, उदात्त व असामान्य होतीं. केवळ काव्यांतच वर्णन करून ते थांबले नाहींत, त्यानीं ती आपल्या प्रत्यक्ष आचरणांत आणून दाखविली. उक्ति आणि कृति यांची संगति त्याच्या आयुष्यात कधींच तुटली नाहीं.

माधवराव, आपणावर अपार प्रेम करणाऱ्या व आपणाकडून करून घेणाऱ्या थोड्याच व्यक्ती का असतना, आपल्याला लाभल्या हेंच आपलें भाग्य असें समजत.

माधवरावांचे साहित्यिक स्नेही बहुत होते. पण त्यातल्या त्यांत त्यांना विशेष जवळचे असे वाटणारे म्हणजे गिरीश, द. ल. गोखले व श्री. के. क्षीरसागर. रवि-किरण-मंडळ स्थापन झालें तेव्हा व तदनंतर कांहीं वर्षे त्यातील सर्व सदस्यांशीं त्यांचे जिव्हाळ्याचे संबंध होते, एककुटुंबीय वृत्तानें ते वागत. पण या वृत्तीला १९२५ सालीं तडा पडला. मंडळातील सदस्यापैकीं श्रीधरपंत रानडे यांजवर त्यांचे सर्वांहून—विठ्ठलराव घाटे वगळून—अधिक प्रेम होतें; आदरमिश्रित असें तें प्रेम होतें. श्रीधरपंतांची बुद्धिमत्ता, संग्राहकता, व प्रयोगशील वृत्ति याबद्दल त्याना विशेष कौतुक वाटे. आणि दहाव्या प्रकरणांत वर्णिलेला प्रसंग न घडता तर परस्परातील स्नेह अबाधितहि राहिला

असता. श्रीधरपंतांनीं फर्ग्युसन कॉलेजांतील त्या मुलीच्या बाबतींत जी 'नसती ढवळाढवळ केली' तीमुळें आपलें फार मोठें नुकसान झालें, असें त्यांचें म्हणणें असे. १९३१ सालीं कोणा एका प्रकरणीं त्यांनीं मला धाडलेल्या पत्रांत[3] पुढील उद्गार अगदीं तळतळून काढले होते: "मिस ××× च्या बाबतींत सद्हेतूनेंच काही व्यक्तींनीं तिच्या जाणिवीनें पण मला अगदीं थाग लागू न देता व्यूह रचिला आणि झालें काय, मला लोकांतून उठविलें! लौकिक मंशयाचें जे पिशाच्च माझ्या मानगुटीस बसलें आहे ते मी हा देह खालीं ठेवीपर्यंत मला सोडणार नाहीं, अशी माझी दिवसेंदिवस खात्री होत चालली आहे. ज्यांनीं सद्बुद्धीनें हा अव्यापारेषु व्यापार केला त्यांचें काय वाईट झालें आहे? मी त्यांना केवळ शब्दांनीं नव्हे तर वर्तनानें क्षमा केली आहे. पण मी कायमचा बुडालों. ज्या जनतेचा मी भुकेला तिला मी कायमचा अंतरलों. ही माझी हानि या जन्मांत भरून येणें शक्य आहे काय?" श्रीधरपंतांबद्दलची माधवरावांच्या मनांतील तेढ आमरण कायम राहिली. मात्र ती अगदीं निकटवर्ति मंडळींखेरीज कोणाचाहि कधीं त्यांनीं उमगू दिली नाहीं. १९२६ सालीं श्रीधरपंतांच्या पत्नी सौ. मनोरमाबाई वारल्या. त्या वेळीं श्रीधरपंतांबद्दल साहजिकच एकप्रकारची सहानुभूति त्यांच्यांत उत्पन्न झाली, पण पूर्वींची प्रेमभावना मात्र उद्भूत झाली नाहीं. रा. वि. मराठे यांस ते लिहितात:[4] "मनोरमाबाई वारल्या. मंडळी शोकांतच आहेत. रानड्यांच्या मनावर अर्थातच फार परिणाम झाला आहे. परवां त्यांचें मला अकस्मात् पत्र आलें. त्यांत त्यांनीं 'Your friend in past and future' असें लिहिलें आहे! परंतु माझ्या कोळपलेल्या हृदयांत आतां प्रेम लौकर उद्भूत होऊं शकेल असें मला वाटत नाहीं. हा माझा दोष आहे. पण परिस्थितीचा दोष अधिक आहे. माझी सहानुभूति ग. रानडे यांना तात्काळ मिळाली आणि मिळेल परंतु माझ्या हृदयाला त्यांनीं केवढा धक्का दिला होता याची त्यांना जाणीव नाहीं. ती होईल त्या दिवशीं त्यांना अतिशयित दुःख होईल यांत शंका नाहीं." १९२९ सालीं श्रीधरपंतांचा द्वितीय विवाह माधवरावांच्या मानलेल्या आई काशीताई हेलेंकर यांच्या कनिष्ठ कन्या गीताबाई ऊर्फ पिलुताई यांच्याशीं

[3] १७ जुलै, १९३१.     [4] अमळनेर, ता. ९-२-१९२६.

झाला. त्यामुळें त्यांचें रानडे कुटुंबांत पुन्हा जाणेंयेणें सुरू झालें. सौ. पिलुताई माधवरावांना आपल्या वडील बंधूप्रमाणें मानीत व पटवर्धन कुटुंबाच्या मोठ्या आस्थेनें परामर्ष घेत. श्रीधरपंतांचेंहि माधवरावांशीं तितकेंच आस्थेचें व आदराचें वागणें असे. माधवराव आपल्याशीं पूर्वीइतक्या मोकळेपणानें वागत नाहींत हे दिसत असतांहि त्यांनीं मनात विकल्प बाळगला नाहीं. माधवरावांच्या थोर व्यक्तित्वाची त्यांना पुरेपुर जाणीव होती. माधवराव थोडसे दूरत्वानें जरी वागत असले तरी श्रीधरपंतांनीं आपली पूर्वींचीच आत्मीयतेची भावना कायम ठेवली.

रविकिरणमंडळांतील दुसरे दोन सदस्य कवि यशवंत व गजानन त्र्यंबक माडखोलकर यांच्याशीं मंडळाच्या पहिल्या चार वर्षांच्या काळांत माधवरावांचा जो घनिष्ट संबंध होता, तो तितकासा पुढे राहिला नाहीं विशेषतः माडखोलकर यांच्याशीं १९२७ सालापासून त्यांचे स्नेहाचे संबंध कांहीं वैयक्तिक कारणांमुळें तुटले ते तुटलेच.[५] यशवंतरावांना माधवरावांबद्दल आदर विशेष, परंतु श्रीधरपंत किंवा माडखोलकर यांच्याविषयींच्या त्यांच्या भावना अधिक उत्कट, आणि त्यांजकडील ओढहि फार ! मंडळात अनेकदां वादळें उठलीं. मंडळ मोडतें किंवा काय असें वाटण्याचे प्रसंगहि आले. परंतु यशवंतराव या सर्व प्रसंगांत समतोल राहिले. कोणालाहि आपल्या कृतीनें किंवा वाचेनें त्यांनीं केव्हांहि दुखविलें नाहीं. त्यांचा थोडासा मिश्कील व मितभाषणी स्वभावहि त्या दृष्टीनें उपकारकच ठरला.

रविकिरणमंडळाचे सदस्य नसलेले पण त्यांजबद्दल आपुलकी बाळगणारे श्रीकृष्ण केशव क्षीरसागर यांच्याशी माधवरावांचा स्नेहसंबंध मंडळांतील इतर सदस्यांइतकाच जवळचा होता व पुढे तो अधिकाधिक दृढतर होत गेला. क्षीरसागरांनीं परस्परांतील या संबंधांविषयीं लिहितांना आपल्या एका

[५] "मंडळाची एकजूट पूर्वींची राहिली नाहीं. स्वतःपुरतें म्हटलें म्हणजे रा. माडखोलकर यांच्या अहंभावी कुटाळकीला कंटाळून त्यांना परिचयाची सोडचिठ्ठी दिली. या काळात असा प्रसंग येणें वाईटच, पण काय करावें !" रा. वि. मराठे यांस पत्र. ता. १५-८-१९२७.

आठवणीत, [१] 'जाणून आदर हें भक्तीचें लक्षण असेल तर मी त्याचा भक्त होतों. नकळत ओढा म्हणजे भक्ति असेल, तर ते माझे भक्त होते.' असें म्हटलें आहे. क्षीरसागरांचें विविध विषयावरील वाचन; वाचलेल्या विषयावर स्वतंत्रपणे विचार करण्याची त्यांची पद्धति; स्नेही असला तरी आपले मतभेद, त्याजबद्दलची आदरभावना ठेवून, स्पष्टपणे बोलून दाखविण्याचा त्यांचा निर्भीडपणा; ज्ञानाच्या भिन्न भिन्न क्षेत्रात सतत जिज्ञासू वृत्तीनें संचार करीत राहण्याचा त्यांचा हव्यास; या व इतर अनेक गुणामुळ माधवराव त्यांजकडे अधिकाधिक ओढले गेले. माधवराव पुण्यास असले म्हणजे क्षीरसागरांच्या 'तुकारामाश्रमा'त बहुधा प्रतिदिनी त्यांची बैठक ही व्हावयाचीच आणि कोणत्या तरी विषयावर चर्चा, संवाद चालू असावयाचा. आपलें नवीन लेखन क्षीरसागरांना वाचून दाखवून त्यांचे त्यावरील विचार समजून घेण्यास माधवराव नेहमीच उत्सुक असत.

समकालीन, पण वयानें वडील अशा साहित्यिकांपैकी वैजनाथ काशीनाथ राजवाडे, ना. गो. चापेकर, नरसिंह चिंतामण केळकर, डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर, प्रो. वामन मल्हार जोशी, महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदार व कानेवर्य तांबे यांच्याशीं त्यांना स्नेह विशेष असे. या प्रत्येकाचा आयुष्यक्रम व त्यांची विचारदृष्टि हीं भिन्नभिन्न असतांहि त्या सर्वांबद्दल माधवरावांना आदरयुक्त प्रेम वाटे. ही सारी मंडळी माधवरावांचें कौतुक करी, त्यांच्या-विषयीं नेहमीं सहानुभूति दाखवी. माधवरावांच्या व्यासंगी वृत्तीवर या मंडळीच्या सहवासाचा बराच परिणाम झालेला होता.

समव्यवसायिक अशा स्नेह्यांत फर्ग्युसन कॉलेजातील प्रो. त्रि. ब. नाईक, प्रो. वि. आ. आपटे, प्रो. चिं. ग. देवधर, प्रो. माधवराव जोशी व डॉ. बा. गो. परांजपे यांचा प्रामुख्यानें उल्लेख केला पाहिजे. या मित्रपंचकाची राजकीय व सामाजिक विचारसरणी माधवरावांहून पुष्कळशी भिन्न असलेली, पण व्यक्ति या दृष्टीनें परस्परांना परस्परांबद्दल गाढ आदर असलेला, असा कांहीं विलक्षण प्रकार त्यांच्या मैत्रीचा होता. फर्ग्युसन कॉलेजातील वादळांत

[१] माधवराव—प्रेम आणि मरण, सह्याद्रि, जानेवारी १९४०.

व पुढेंहि अनेक अडीअडचणींत या पाच मित्रांचें अनेक परीनें त्यांना सहाय्य झालें आहे. माधवरावांना या आपल्या फर्ग्युसन कॉलेजांतील स्नेह्यांबद्दल केवढा तरी अभिमान वाटे.

माधवरावांना मुलें फार प्रिय असत. मुलांच्या सहवासांत त्यांचें अंतःकरण आनंदानें उत्फुल्ल होई. त्यांच्याशीं विनोद करण्यांत, त्यांना गाणीं म्हणून दाखविण्यांत ते कित्येकदां इतके रंगून जात कीं, स्वतःचें वयहि त्या वेळेस ते विसरत. ते स्वतःच त्या वेळेपुरते बालक बनत. आणि त्यांच्या मोकळ्या हास्यानें सारें घर निनादून जाई, सर्वत्र सुखदायी उल्हासाचें कोवळें तजेलदार ऊन पसरे. मुलांवरील त्यांच्या अनेक कवितांचा जन्म अशा या वातावरणांत झालेला आहे. माधवरावांचें आगमन म्हणजे त्यांच्या मित्रांच्या मुलांना तीं एक पर्वणीच वाटे.

माधवरावांचे आपल्या सर्व मित्रांच्या मुलांशीं फार मायेचे संबंध असत. आपल्या दिनु-सुधाप्रमाणेंच तीं त्यांना वाटत व त्यांच्या आईबापांच्या त्यांजविषयींच्या सुखदुःखांत ते समभागी होत. माझी थोरली मुलगी प्रभावती १९३४ सालीं विषमज्वरानें वारली, त्या वेळीं त्यांनीं मला लिहिलेलें पुढील पत्र त्यांच्या या वृत्तीची थोडीशी ओळख करून देईल :

"तुमचें पत्र वाचून फार वाईट वाटलें. चि. विद्याधर गेला असावा असें मीं अनुमान केलें तेव्हां जो शोक वाटला तो याच्या मानानें काहींच नाहीं. चि. प्रभशीं माझा किती तरी संबंध आला होता! आज आम्ही दोघें सारखा तिच्या आठवणी काढत आहों! आणि तिला शिस्त लावण्याचा माझा काय निकडीचा प्रयत्न असे! आपुलीक होती म्हणून तो प्रयत्न होता आणि आपुलीक आहे म्हणूनच आतां फार विषाद वाटत आहे. मुंबईत मी घरीं पोचल्यावर तिनें मला पाहिलें आणि ती धावत लाडिकपणानें माझ्याजवळ आली नाहीं असें कधीं झालें नाहीं. तुम्हाला आणि उपासवहिनींना काय काय वाटत असेल याची मला चांगली कल्पना होते. कारण मला आतां स्वतःचीं मुलें आहेत. आणि मुलें जायाच असहाय, मोहक आणि संवादी असतात. त्यांतून आपल्या मुलांशीं जे क्षणोक्षणीं बहुविध संबंधाचे धागे उत्पन्न होत जातात, आपण ज्या खस्ता खातों, ज्या आशा त्यांच्या ठायीं ठेवितों,

त्यामुळें बंधनास विलक्षण दृढता येते. मुलाच्या मरणाची कल्पनासुद्धां असह्य होते; प्रत्यक्ष मरण कसे हृदयाचे हाल करीत असेल याची कल्पना नीटशी होणार नाही. असो."

"एकंदरीत तुम्ही सध्यां संकटांत आहां हें खरें; पण तुम्ही यांतून निभावून जाल अशी मला बळकट आशा वाटते. आमची पूर्ण सहानुभूति तुमच्यासगें आहे हे ध्यानात असूं द्या. अधिक आज काय लिहूं? हेच पत्रीं आमचे उषा-बहिणींस नमस्कार व चि. विद्याधर व चि. शाम यास अनेक आशीर्वाद."

माधवराव जसे मित्राच्या किंवा त्यांच्या मुलाच्या दुःखानें दुःखी होत तसेच त्यांच्या सुखानेंहि सुखावत व त्यांच्या साऱ्या सहानुभूतीचा, जिव्हाळ्याचा, आपलेपणाचा ओघ त्याजकडे वळे. बापूराव शिंदे यांची मुलगी सरला हिला, तिचा विवाह झाल्यावर त्यांनीं लिहिलेलें पुढील पत्र त्या दृष्टीनें वाचण्यासारखें आहे. ते लिहितात[७]:

"तुझे कार्ड मिळालें. बातमी आधींच कळलेली होती. पण आता 'सरला बागवे' अशी सही असलेलें कार्ड वाचून फार कौतुक वाटलें, समाधान झालें. मी पूर्वीच पत्र लिहून तुझे अभिनंदन करायला हवें होतें; पण मी पडलों निष्काळजी (म्हणजे ज्याला चिंता नाहीं असा नव्हे हां!) मनुष्य. तेव्हां तुझ्या काकाच्या या दिरंगाईबद्दल क्षमा कर. कालच मी पुण्यहून इथें[८] परीक्षेच्या कामासाठीं आलों आणि माझीं पत्रें जींत होतीं ती छोटी पेटी तिथेंच राहिली. आता दोन-तीन दिवसानीं ती येथें येईल. पण तोपर्यंत तुला पत्र लिहिणें लांबणीवर टाकणें बरें नव्हे, नाहीं का? तुझ्या लग्नाचा मुहूर्त ठरल्याचें मला खानदेशात कळलें. लीलाबाईंना नागपुरास पोंचवून मी परत येताना जळगांवीं थांबून रा. शिवरामराव शिर्के यांच्याकडे गेलों. बोलतां बोलतां रा. बागवे यांच्या बहिणीचें व त्याचेंहि लग्न ठरल्याचें त्यांनीं सांगितलें. तेव्हां मी चौकशी केली कीं, हे बागवे कोण व लग्न कोणाशीं ठरलें? त्यांनीं निमंत्रणपत्रिका मला पहायला दिल्या. बागव्यांच्याकडल्या त्या होत्या. आत पाहतों तों तुझें नाव! माझा जीव खालीं पडला. मनात आलेली कुशंका दूर पळाली. तथापि मला

[७] ता. १६ एप्रिल, १९३०. [८] मुंबईस.

आश्चर्य वाटलें कीं, पंधरा दिवसांपूर्वी नियोजित वधूचें पत्र येतें आणि त्यांत मुहूर्तनिश्चयाच्या विचाराचासुद्धां उल्लेख नाहीं आणि आतां पाहतों तो लग्न ठरलें, छे, होऊनहि गेलें! आम्ही ९ तारखेला कोल्हापूर सोडलें आणि पत्रें पुण्याच्या पत्त्यावर मागविलीं. त्यामुळें बाबाचें हस्तलिखित निमंत्रण मला २० तारखेला पुण्याला परत गेल्यावर मिळालें."

"असो, जाऊं दे ती कथा. तुझें लग्न झाल्याचें ऐकून मला किती सुख वाटत आहे म्हणून सगू! रा. बागव यांची महत्त्वाकांक्षा जर मध्यम असली, ते जर समंजस असले (आणि ते तसे असावेत अशी मला आशा आहे) तर त्यांनीं संसारसुखाचा विमाच उतरवून ठेवला आहे यांत शंका नाहीं. तुम्हांला दोघांना तें सुख उदंड व अखंड लाभो अशी माझी ईश्वराजवळ प्रार्थना आहे. काय सगू! ही वेळ अशीच आहे कीं, वडीलकीच्या व आपुलकीच्या नात्यानें चार शब्द उपदेशाचे सांगितल्याशिवाय राहवत नाहीं. तूं धीरानें आणि प्रसन्नतेनें दिवस काढ. साधारणपणें असें म्हणायला हरकत नाहीं कीं, सौजन्याचा, चांगुलपणाचा प्रभाव जितका टिकाऊ असतो तितका इतर कशाचाहि नसतो. तू कष्टाळू आहेस तशीच ममताळू आहेस. तेव्हां तुला अधिक तें काय सांगायला पाहिजे? बापूरावांची-बाबांची तूं मुलगी आहेस हें ध्यानांत ठेवून तूं चाललीस कीं पुरें आहे."

"या प्रसंगाची भेट म्हणून एक वस्तु मी तुला देणार आहें. तिचें मोल तूं किंमतीवरून करणार नाहींस अशी आशा आहे. तथापि ती वस्तु मी तुला पहिल्या तारखेनंतर पाठवीन. आजहि पाठवूं शकेन, पण ऋण काढून सण करणें बरें नव्हे. लीलाबाईनीं मला डोक्यांतलें सोन्याचें तऱ्हेदार फूल घेऊन द्यायला लिहिलें आहे. तें नाजूक असतें. मला केसांची क्लिप किंवा गळ्याची लांबट पिन बरी वाटते. तुला काय आवडतें तें तूं कळव. मी येथें मेच्या ५-६ तारखेपर्यंत आहें. त्या सुमारास तूं येथें येणार असलीस तर तुला दाखवूनच खरेदी करूं."

"असाच पत्रोत्तरीं परामर्श घेत जा. यापुढें मी बडोद्यास आलों म्हणजे तुझी गांठ पडेलच असें नाहीं. मानवी आयुष्यांत कित्येक प्रसंग असेच

विलक्षण असतात. पुढे पाहणारा एक डोळा आनंदाश्रु ढाळतो तर मागे पाहणारा दुसरा डोळा दुःखाश्रु ढाळीत असतो. पण पुढे जायचें आहे, तेव्हां पुढेंच पाह्यलें पाहिजे. तेव्हा जा, सुखी हो बेटा. ”

माधवराव स्नेहसंबधांच्या बाबतींत जितके भाग्यवान् होते, तितकेच कौटुंबिक सबंधाचे बाबतींत काहींसे अभागी होते. विशेषतः आई व वडील यांचें प्रेम असें त्याना कधींच मिळालें नाहीं. एकाच गावात तीन ठिकाणीं ही तीन मंडळी असावयाची. परस्पराना परस्पराचा ओढा असा कधींच वाटला नाहीं. पण माधवराव आपल्या कर्तव्यांत कधीं चुकले नाहींत. आई काय किंवा वडील काय, त्याच्यासंबधींची जबाबदारी त्याना ज्या ज्या वेळीं घेणें प्राप्त झालें, त्या त्या वेळीं त्यानीं ती बिनतक्रार पत्करली. आपला अलिप्तपणा राखूनहि त्यानीं कर्तव्यांत कधीं कसूर केली नाहीं. त्रिंबकरावांना—वडिलांना—अखेरच्या दिवसात वेड लागून, त्याना येरवड्याच्या इस्पितळांत ठेवण्याची जेव्हां पाळी आली तेव्हां त्यांची सारी आर्थिक जबाबदारी त्यानीं स्वतः पत्करली व त्यांचें काहींहि उणें पडूं दिलें नाहीं. आपल्या वडिलांच्या तऱ्हेवाईक, स्वार्थी व हट्टी स्वभावाबद्दल त्याना चीड येई. पण त्याबरोबरच आपल्या आईच्या तटस्थ व सहानुभूतिशून्य वृत्तीमुळें त्रिंबकरावांच्या आयुष्यात जो भकासपणा निर्माण झाला होता, त्यामुळें त्यांचें अंतःकरण विव्हळे व ते त्यांच्याकडे सहानभूतीनें पाहूं लागत. आपल्या वडिलाचे अखेरचे दिवस वेड्याच्या इस्पितळात जावे या विचित्र घटनेबद्दल त्याना राहून राहून वाईट वाटे. ते पुण्यास आले म्हणजे न चुकतां येरवड्यास जात व त्याची भेट घेऊन आस्थापूर्वक नीट विचारपूस करीत, त्यांना दिलासा देत. अशाच एका भेटीचें वर्णन लीलाबाईंनीं बाबासाहेब गरुडास लिहिलेल्या एका पत्रांत [१] पुढीलप्रमाणे केलें आहे : “ती० आण्णाना ( मामंजी ) येरवड्याला जाऊन भेटून आलों. अर्धवट शुद्धींत व अर्धवट बेशुद्धींत, पण पुष्कळ व चांगलें बोलले. माधवरावांना थोडेंसें ओळखलें. माझ्या व बाळाच्या डोक्यावर हात ठेवून, ‘बेटा, तुमचें कल्याण होवो’ म्हणून आशीर्वाद दिला. माधवरावांच्याहि पाठीवर हात

[१] ता. १९ नोव्हेंबर, १९३०.

फिरविला. तो सर्व देखावा मला नवीनच असल्यामुळें करुणास्पद व हृदयस्पर्शी वाटला. पांच–सहा दिवस तरी तो माझ्या डोळ्याआड झाला नाहीं."

माधवरावांचे वडील येरवड्याच्या इस्पितळांत सहा-सात वर्षें होते व तेथेंच त्यांचा १९३७ सालीं मृत्यु झाला. त्रिंबकरावाच्या मृत्यूच्या आगेंमागें माधवरावांच्या आई उमाबाई माधवरावाकडे 'निवान्त' मध्यें राहावयास आल्या. पण आपली चूल मात्र त्यांनीं स्वतंत्रच ठेवली.

माधवरावांना, केशवराव[10] व विनायकराव[11] हे दोन भाऊ व यमूताई ही बहीण, अशीं तीन भावंडें. हीं सर्व त्याचेपेक्षां वयानें लहान असून, त्यांचेविषयीं आदरभाव बाळगणारीं आहेत.

माधवरावाची कुटुंबीय मंडळी त्यांच्या आयुष्याच्या उत्तरार्धांत त्यांच्याजवळ हळूहळू येऊं लागली होती. लीलाबाई 'आमचीं अकरा वर्षें' या पुस्तकात लिहितात : "शेवटच्या दोन-चार वर्षांत त्याचे नातेवाईक त्यांच्याकडे येऊं जाऊं लागले होते. बडोद्याचे मामंजी (माधवरावाचे मामा[12]) आमचा संसार पाहायला मुद्दाम कोल्हापूरला आले होते. ते माधवरावाचे जवळ कांहीं दिवस राहिलेहि. पुढें १९३९ साली आमच्या दिनूची[13] मुंज झाली. तेव्हाहि ते आपल्या भाच्याजवळ येऊन महिनाभर राहून गेले. जाताना

---

[10] हे गोरेगांव (कुलाबा) येथील गोखले घराण्यांत दत्तक गेले असून त्या गावचे खोत आहेत. हे वकीलीहि करतात.

[11] हे हल्लीं मलायात इपो येथें असतात. एम्. बी. बी. एस्. झाल्यावर ते तिकडे गेले व खाजगी दवाखाना काढून स्वतंत्रपणें तेथें आपला व्यवसाय सुरू केला व त्यात चांगलेंच यश मिळविलें.

[12] यानाच माधवरावानीं आपला 'छंदोरचना' ग्रंथ अर्पण केला आहे.

[13] माधवरावांचा थोरला मुलगा. यानें आपलें डफरीनवरील नाविक शिक्षण सन्मानासह पुरें केलें आहे. हल्लीं हा परदेशांतून मालवाहतुक करणाऱ्या आगबोटीवर असतो.

माधवरावांनीं मामांना मनगटावरचें एक चांदीचें घड्याळ त्यांच्या आवडी-प्रमाणें दिलें. सासूबाई (माधवरावांची आई) मधून मधून येऊन राहात असत. लहानपणीं जीं माणसें त्यांना दुरावलीं होतीं, तीं सर्व पुढें त्यांच्या-जवळ आलीं. सर्वांच्याकडून माधवरावांनीं चांगलेंच म्हणवून घेतलें. दिनूची मुंज म्हणजे माझ्या सासरच्या व माहेरच्या सर्व मंडळींचें एक संमेलनच होतें. त्या सर्व स्त्री-पुरुषांना आपल्या शक्तीप्रमाणें माधवरावांनीं आहेर दिले. माधवरावांनीं जणू काय त्या निमित्तानें आपले इतके दिवसाचें ऋण फेडलें. या सर्वांत त्यांना व मला जास्त सहवास घडला यमूताईंचा. यमूताई सर्व भावंडांत लहान. माधवरावांच्या व त्यांच्या वयांत पुष्कळ अंतर. माधवरावांना त्या मुलीसारख्याच होत्या. माधवराव लहानपणींच घरातून बाहेर पडले होते, त्यामुळें त्या दोघांचा संबंध फार थोडा आला. यमूताईंना समजूं लागल्यावर त्या आपण होऊन माधवरावांच्याकडे येत. पुढें माधवरावांनींच त्यांचें लग्न मोहनरावांशीं[१४] करून दिलें. यमूताईंचें लग्न झाल्यावर त्यांचें आमचें संघटण वाढलें."

माधवरावांच्या सर्व आप्तांत त्यांचे श्वशुर बाबासाहेब गरुड यांच्याशीं त्यांचे संबंध विशेष जिव्हाळ्याचे व मोकळेपणाचे होते. श्वशुर-जामात यापेक्षा मित्र-मित्र या नात्यानेंच ते परस्परांशीं वागत. बाबासाहेबांच्या सुसंस्कृत, सौंदर्यभोजी व संयमी वृत्तीचें त्यांना मोठें कौतुक असे; त्यांचा सहवास त्यांना नेहमींच प्रिय व सुखदायी वाटे. स्वतःच्या 'निवांत' बंगल्यांत स्वतःसाठीं अभ्यासिका[१५] राखून ठेविली असतांहि त्यांना आपलें लेखन बाबासाहेबांच्या अनेक सुंदर व निवडक वस्तूंनीं सजविलेल्या नीटनेटक्या खोलींतच करीत बसणें अधिक आवडे. बाबासाहेबांच्या शांत, सहनशील व प्रेमळ स्वभावाचा माधवरावांच्या वृत्तीवर बराच अनुकूल परिणाम झालेला होता. कुटुंबाच्या स्वास्थ्यासाठीं, वैयक्तिक सोयीगैरसोयी व आवडीनिवडी बाजूला ठेवून

[१४] मोहन ज्ञानेश्वर शहाणे — कांहीं काळ मध्यप्रांत सरकारच्या प्रसिद्धी-खात्याचे मुख्य अधिकारी.

[१५] अभ्यासाची जागा — Study.

आनंदाने झीज सोसण्याच्या, त्याच्यात अलीकडे अलीकडे दिसून येणाऱ्या प्रवृत्तीला बव्हंशीं हा सहवासच कारण होता.

माधवरावांनीं, स्नेही काय किंवा कुटुंबीय काय, त्या सर्वांवर निर्हेतुकपणें प्रेम केलें. त्याच्याजवळून कोणताहि स्वार्थ त्यांनीं साधला नाही, इतकेंच नव्हे तर तो साधण्याची कल्पनाहि त्यांनीं आपल्या मनाला शिवूं दिली नाहीं; केवळ सहवासावरच, स्नेहाच्या सहज देवघेवीवरच ते पूर्ण संतुष्ट राहिले. ही त्यांची वृत्ति जितकी असामान्य तितकीच अमोल होती. पण त्याची जाणीव स्नेही किंवा कुटुंबीय यापैकीं फारच थोड्याना आली; त्यांच्या निरपेक्ष प्रेमाच्या सादाला प्रतिसाद फारच थोड्याकडून मिळाला.

माधवरावांच्या प्रेमाच्या कसोटीला उतरणे ही गोष्ट सहज शक्य नव्हती. ज्या थोड्या व्यक्ती त्या कसोटीला उतरल्या त्याना त्यांचे प्रेम अपार मिळालें, त्यांचें भावजीवन सुखाचे झालें, धन्य झाले.

# १९

# सुधारक माधवरावांचे कांहीं विचार

“ सत्य म्हणजे केवळ बुद्धीनें ग्रहण करून मान्य करण्याची गोष्ट नव्हे. ती जेव्हां आपोआप कृतींत उतरेल तेव्हांच सत्यग्रहण झालें असें म्हणतां येईल. आपण सुधारणेचे, सत्याचे सेवक आणि प्रचारक होऊं या. सत्याचा तोंडपुजेपणा आपल्या उपयोगीं पडणार नाहीं. . . . ” [1]

माधवराव हे कोण होते, काय होते असें जर कोणीं विचारलें, तर तें एका सुटसुटीत वाक्यात सागता येईल. ‘ ते सुधारणेचे, सत्याचे सेवक आणि प्रचारक होते, ’ हेंच तें वाक्य. त्यांचा सारा आयुष्यक्रम, ‘ मी सुधारणेचा, सत्याचा सेवक आणि प्रचारक आहें, ’ या एकाच भावनेवर आधारलेला होता. मग ती सुधारणा, तें सत्य साहित्यक्षेत्रातील, शिक्षणक्षेत्रांतील, सामाजिक वा सास्कृतिक क्षेत्रांतील असो, तें स्पष्टपणें जनतेसमोर माडून त्याच्या प्रचारासाठी, कधीं एकाकी तर कधीं सामुदायिक असे प्रचंड प्रयत्न त्यांनीं केले. प्रशंसा किंवा हेटाळणी यांची फिकीर त्यानीं कधीं केली नाहीं. दीर्घ विचाराअंतीं त्याना जें सत्य आणि न्याय्य वाटलें त्याचा त्यानीं स्वीकार केला आणि त्याबद्दल यावज्जीव अभिमान बाळगून झुंजार वृत्तीनें त्यांनीं त्याचा प्रचार केला. ‘ विद्वत्ता, तर्ककुशलता, प्रतिष्ठित वादसरणी व ठाशीव वाणी ’ याचा जो सुदर संगम त्याच्यात झाला होता, त्याच्या बळावर त्यांनीं आपलीं अनेक झुंजें जिंकलीं.

[1] विधवाविवाह कायद्याच्या ऐशींव्या वाढदिवसानिमित्त पुणें येथें माधवरावानीं केलेलें भाषण.

# सुधारक माधवरावांचे कांहीं विचार

१९२६ सालापासून त्यांच्या विचारांचा प्रवाह एका निश्चित दिशेनें वाहूं लागला होता. आयुष्यातील गतानुभव आठवून आणि वर्तमानकालीन परिस्थिति पाहून त्याच्या मनांत जीं आंदोलनें होत त्याची, प्रयोगशाळेंतील संशोधकाच्या वृत्तीनें, ते सूक्ष्म चिकित्सा स्वतःशीं करूं लागले. आणि या चिकित्सेनतर त्याना जे निर्णय ग्राह्य वाटले त्याचा पुरस्कार व प्रसार त्यानीं आपल्या आयुष्याच्या अंत्य पादात मोठ्या आवेशानें व हिरीरीनें केला. 'माधवराव प्रतिगामी होत चालले आहेत; त्यांच्या विचाराचा लंबक एका टोकाकडून दुसऱ्या टोकाला भिडूं पाहात आहे' अशा तऱ्हेच्या ओरडीकडे ढुंकूनहि न पाहता ते आपल्या नियोजित मार्गाने पुढेपुढेंच चालले होते. जे तत्त्व स्वीकारलें तें आचरणात आणावयाचें हा त्याचा बाणा होता. सोंगे-ढोंगे त्याना करावयाचीं नव्हतीं. ज्या सुधारणा त्याना पटल्या, त्या प्रत्यक्षात आणण्याच्या कामीं ते अंतरींच्या उमाळ्याने पडले. समाजापुढे त्याना केवळ देखावा उभा करावयाचा नव्हता, तर कार्य उभें करावयाचे होते.

१९२७ सालीं अहमदनगर येथील गणेशोत्सवात 'हिंदु धर्माची सद्यःकालीन स्थिति' या विषयावर त्यानीं एक व्याख्यान दिलें होतें. हें व्याख्यान म्हणजे त्या वेळेस त्यांच्या अंतःकरणात उफाळत असलेल्या असंतोषाचा पहिला स्फोट होता. हिंदु समाजाच्या भवितव्यतेसंबंधीं त्यांच्या मनात जी विचाराची खळबळ उडाली होती तिची ही पहिली तुफानी लाट होती. यानंतरच्या बारा वर्षांच्या काळांत त्याच्यात जी एक विशिष्ट धर्मविषयक दृष्टि आढळूं लागली होती तिचें प्रथम प्रगटन याच व्याख्यानात झालें, असें म्हटलें तरी चालेल. ही दृष्टि काय होती तें त्याची धार्मिक विचारसरणी समजून घेण्याच्या दृष्टीनें फार महत्त्वाचें आहे. ते या व्याख्यानांत म्हणाले:

"इस्लाम धर्माशीं व इस्लामी संस्कृतीशीं माझा परिचय आहे असें आपणांस आपल्या चिटणीसानीं सांगितलें. यामुळें हिंदुधर्माच्या सद्यःकालीन स्थितीवर व्याख्यान देण्याचा अधिकार मला कसा प्राप्त होतो, असें आपण विस्मयपूर्वक साहजिकच विचाराल. परंतु धर्मसिंधूचें मीं मंथन केलें नसलें तरी मी आपल्यासारखाच एक हिंदु आहें; आणि धर्माचा जिव्हाळा व्युत्पन्न शास्त्रीपंडितासच असावा किंवा असतो असें नाहीं. भगवद्गीतेपलीकडे माझें

फारसें धार्मिक वाचन नसलें तरी प्रयत्नातीं अपेश, प्रिय वस्तूचा नाश, समाजस्थितीचें अवलोकन, आणि इतिहासाचे वाचन इत्यादि अनेक गोष्टी मनुष्याला धर्माचा—या जीवितकोड्याचा—विचार करावयाला भाग पाडतात. आपण हिंदु आहों हे मला अमान्य नाहीं. परंतु हिंदु धर्म म्हणून काहीं शक्ति जीवंत आहे किंवा नाही याविषयीं मात्र मी साशंक आहें."

"गझनीच्या महमुदानें हिंदुस्थानावर स्वारी करून सोरटी सोमनाथाच्या मूर्तीचा विध्वंस करून बुत्‌फरोश म्हणजे मूर्तिविक्या होण्यापेक्षा बुत्-शिकन् म्हणजे मूर्तिभंजक होणें अधिक श्रेयस्कर होय, असें अवनत हिंदु समाजास बजावून, शिवाय वर अलोट लूट मिळवून स्वदेशास गेल्याला नऊशें वर्षे होऊन गेलीं. हिंदु धर्माच्या पचनीं न पडता जिगीषु इस्लाम धर्माच्या प्रसारास हिंदुस्थानात चांगलें क्षेत्र आहे हे महमुदाने मुसलमानास पटवून दिलें. या नऊशें वर्षांचा इतिहास हिंदु लोकांविषयीं आणि हिंदु संस्कृतीविषयीं काय सांगतो हें विचार करण्याजोगे आहे. संस्कृतात आपल्या पूर्वजांनीं नाटक, काव्य, तर्क इत्यादि नाना क्षेत्रात अभिनंदनीय कामगिरी करून ठेविली आहे, परंतु सखेदाश्चर्याची गोष्ट ही कीं, राष्ट्रीय अनुभवाचा व संस्कृतीचा रक्षणकर्ता जो इतिहास त्याच्याकडे मात्र त्यांनीं अक्षम्य दुर्लक्ष केलें. क्षुद्र देवतांचे व तीर्थांचें माहात्म्य सांगणारीं पुराणें रचिलीं गेलीं, परंतु राष्ट्रीय जीवनाचा इतिहास नाहीं, ही उणीव विचारणीय आहे."

"या नऊशें वर्षांत हिंदूंनीं राजकीय स्वातंत्र्य गमाविलें इतकेंच नव्हे तर बुद्धीच्या विविध क्षेत्रातहि ते मागसले. मूठभर मुसलमानांनीं असंख्य हिंदूंवर स्वाऱ्या करून राज्ये स्थापिलीं आणि तीं दीर्घकालपर्यंत हाकिलीं. दिल्लींत मुसलमान पादशाही ६००–७०० वर्षे जोरात नांदली; परंतु मराठ्यांच्या महाराष्ट्रात मराठशाही २०० वर्षे सुद्धा तगली नाहीं. बहुसंख्या असल्याकारणानें हिंदु समाज नामशेष होऊं शकला नाहीं याची फुशारकी त्यानें खुशाल मारावी. परंतु हिंदुस्थानचा इतिहास म्हणजे हिंदूंच्या अप्रतिष्ठेचें, नालायकीचें प्रदर्शन आहे, असें मला वाटतें. 'धर्मो विश्वस्य जगतः प्रतिष्ठा' हें तत्त्व जर खरें असेल तर आपल्या अवनतीचें, अप्रतिष्ठेचें कारण धर्माचा अभाव हेंच असलें

पाहिजे हें उघड आहे. आणि हिंदु हे प्रगत व सुसंपन्न व्हावे अशी आपली इच्छा असल्यास धर्माची प्राणप्रतिष्ठा केल्यावांचून गत्यंतर नाहीं."

"मग, व्रतवैकल्यें, कुलधर्म, मूर्तिपूजा, उत्सव, पुराण, कीर्तन इत्यादि प्रकार अजून आपल्यात आहेत. भक्तिविषयक कवितेचें लेखन, पठन आणि आध्यात्मिक प्रश्नाचें चर्वितचर्वण अजून चालू आहे; त्याचप्रमाणें गुरुभक्ति अजून भरभराटींत आहे. या गोष्टींत धर्म नाहीं कीं काय, असा प्रश्न उद्भवणें स्वाभाविक आहे. 'आचारः प्रथमो धर्मः' हें तत्त्व खरें असेल तर कर्मठपणा सोळा आणे राहिला नसला तरी आचार आणि पर्यायानें धर्म अगदींच सुटलेला नाहीं, ही गोष्ट खरी आहे. परंतु धर्माचें हें बाह्य स्वरूप दिसायला निर्मळ, सुंदर परंतु मज्जातंतु हतबळ झाल्यामुळें निरुपयोगी झालेल्या डोळ्यां-सारखें आहे. पुष्कळसे आचार आपण केवळ संवयीमुळें पाळतों. त्याच्या बुडाशीं तत्त्वनिष्ठा आहे काय? तत्त्वनिष्ठा असती तर आपद्धर्माच्या फटींतून सवडशास्त्राचा वड फोंफावून धर्माचें मंदिर उध्वस्त करूं शकता काय? मूर्तिपूजा हवी तर देवळेंहि हवींत, परंतु जाज्वल्य श्रद्धा असती तर देवळें उध्वस्त झालेलीं पाहून वा ऐकून आपले भोजनपानादि व्यवहार सुखात चालते काय? तत्त्वतः ईश्वर एक आहे हें पटल्यावर मूर्तिभेदामुळें इतर पंथीयाच्या मूर्ति परधर्मीयांना फोडताना पाहून गुप्त आनंद वाटला असता काय? समारंभामुळें उत्सवप्रियतेचा परिपोष होऊन समाजातील व्यक्ति एकत्र होऊन त्याचे स्नेह-संबंध निगडीत व्हावेत. परंतु धर्मभावना असती तर स्वकीय सुधारकांच्या गलिच्छ नालस्तीला प्रतिष्ठित पुढाऱ्याकडून राजरोसपणें उत्तेजन मिळणें शक्य होतें काय? मन सुसंस्कृत व सुदृढ होऊन त्यानें मोहावर जय मिळवावा, जें वाईट त्याचा त्यानें राजदंडाच्या व समाजदंडाच्या भयाने नव्हे, तर पारलौकिक हानीच्या भयानें त्याग करावा, आणि जें चागले तें करण्यास त्यानें—ऐहिक लाभ वा प्रतिष्ठा याच्या आशेनें नव्हे तर कर्तव्य म्हणून—प्रवृत्त व्हावें, हा वैयक्तिक आचाराचा हेतु आहे. तो कितपत साध्य होत आहे याचा आपणच विचार करा. पूजेच्या वेळींहि जो व्यवहारासाठीं बिनदिक्कत खोटें बोलतो त्याच्या पूजेंत धार्मिकताच नाहीं."

" आध्यात्मिक चर्चेचे ग्रंथ अजून निर्माण होत आहेत. महामहोपाध्याय वासुदेवशास्त्री अभ्यंकर यांनीं सर्वदर्शनसंग्रहावर टीका लिहून अलीकडेच एक-दोन वर्षांमागें प्रसिद्ध केली, हें आपणास विदित असेलच. ही बौद्धिक मेहनत हवीच आहे. बुद्धि कुशाग्र व तार्किक होणें जरूर आहे. परंतु या मेहनतीचा उपयोग वादविवादांत अजिंक्यपत्र मिळविण्यापुरताच होत असला, विचारांचा परिणाम आचारांच्या परीक्षणावर आणि संस्करणावर झाला नाहीं, तर धर्माच्या दृष्टीनें हीं भाष्यें, या दीपिका व प्रकाशिका याना काडीचीहि किंमत नाहीं. एखाद्या मताचें युक्तिप्रयुक्तीनें मंडन करून इतर मताचें येनकेन प्रकारानें खण्डन करून श्रोत्यांस चकित करून सोडणें म्हणजे तत्त्वनिष्ठा नव्हे. तत्त्व स्वाभाविकपणें आचारांत उतरलें, किंवा कांहीं कारणानें उतरूं न शकल्यास मनाची सारखी तळमळ होत राहिली तर त्या ठिकाणीं तत्त्वनिष्ठा आहे, हें निश्चयेंकरून जाणावें. आपल्या विद्वद्वर्यांच्या परंपरेंत ही तत्त्वनिष्ठा कितपत आढळते याचा आपणच विचार करा. "

" तत्त्वाचा विजय तें जिवंतपणानें पटून ओघानें कृतींत उतरण्यातच आहे. हाच धर्म होय आणि यानेंच व्यक्तीची व समष्टीची उन्नति व प्रतिष्ठा हीं सिद्ध होतात. तत्त्वनिष्ठा असली कीं, त्या तत्त्वाचा प्रसार करणें – प्रतिष्ठेसाठीं नव्हे तर तत्त्वाकरिताच कित्येकदा भयंकर संकटांसहि न जुमानता त्या तत्त्वाचा प्रसार करणें हें आद्य कर्तव्य होतें. तत्त्व मान्य झालेले लोक साहजिकच एकत्र येऊन विरोधकाना तोंड देण्यासाठीं सुसंघटित होतात. क्रिया-प्रतिक्रिया होऊन तत्त्व कसोटीस उतरलें तर त्याचा जय होतो. परंतु हौतात्म पत्करण्याची तयारी असल्याशिवाय तत्त्वाचा विजय होत नाहीं. तत्त्व मान्य तपशील अमान्य या परिचयाच्या द्विसूत्रीनें प्रगतीस गळफास मात्र बसतो. तत्त्वनिष्ठा पवित्र ज्ञानाला सोंवळ्यांत दडवून ठेवीत नाहीं, त्यामुळें ज्ञानाचा सामाजिक संस्कृतीवर परिणाम झाल्यावाचून रहात नाहीं. अलीकडील राजकारणांतील समेटाप्रमाणें अत्युच्च व अतिनीच अशा आचारविचाराची दिखाऊ एकवाक्यता दाखवून सांस्कृतिक व सामाजिक भिन्नता धर्माच्या नांवाखालीं कायम ठेवण्यांतच बुद्धीचा आजपर्यंत अपव्यय झालेला आहे. तत्त्वनिष्ठा नाहीं, म्हणून कर्मनिष्ठा नाहीं. समाजांतील घटकांत सपिण्डी ममत्व नाहीं. शरीराच्या कोणत्याहि

अंगावर निखारा पडला तर सर्वांगास जाणीव होऊन ज्या ममत्वानें हात तो निखारा झाडून टाकतो त्या ममत्वाचा हिंदु समाजांत अभाव आहे. लोकसंग्रहाच्या दृष्टीनें धर्माचें परीक्षण अजून झालेलें नाहीं. ममत्वाच्या अभावामुळेंच स्वदेशभक्ति, स्वधर्मभक्ति, स्वभाषाभक्ति इत्यादिकांची आमच्यांत वाण आहे. स्वार्थासाठीं स्वकीयास लोटून परकीयाला घरांत घेऊन शिरजोर होऊं द्यावयाचें हा समाजघातकी वर्तनाचा जो कित्ता संजीवनी विद्या जाणणाऱ्या असुरगुरु शुक्राचार्यांनीं घालून दिला, तो आम्ही अजून गिरवीत आहों. ख्रिस्ती, मुसलमान हे परधर्मीय स्पृश्य, परंतु देवब्राह्मणांना श्रेष्ठ मानणारे कांहीं हिंदु मात्र अस्पृश्य. हिंदु सत्यशोधकसमाजाला ब्राह्मणांचा द्वेष वाटतो तो तत्त्वासाठीं असल्यास इष्टच आहे. परंतु ब्राह्मणाना हाणून पाडण्यासाठीं मुसलमान वगैरे मात्र जीवलग वाटतात, ही तत्त्वानिष्ठा नव्हे. तत्त्वनिष्ठेच्या अभावीं कोणत्याहि समाजांत ममत्व बाणणार नाहीं, कोणताहि समाज उन्नत होणार नाहीं. ममत्व बाणण्यास व्यक्तीच्या योग्य विकासास समाजानें पूर्ण म्हणजे इतर कोणाच्या विकासास बाधक न होईल इतकें, स्वातंत्र्य दिलें पाहिजे, तरच व्यक्तीस समाजाविषयीं पोटतिडीक वाटून समाजाच्या शाश्वतीसाठीं ती आत्मदान करण्यास सिद्ध होईल. व्यक्तिस्वातंत्र्याचें हिंदु समाजास फार वावडें दिसतें. ही स्थिति बदलणें अत्यंत आवश्यक आहे."

"लोकसंग्रहाच्या, समाजाच्या अभ्युन्नतीच्या दृष्टीनें धर्माचा विचार केल्यास आपणाला मोठमोठे दोष आढळतील. मीं फक्त आज विचाराची दिशा दाखविली आहे." [२]

माधवरावांत हिंदुत्वाचा आणि महाराष्ट्रीयत्वाचा ज्वलन्त अभिमान होता. पण तो आंधळा, अविचारी, संकुचित नव्हता; तो तर्कशुद्ध व डोळस होता. तो 'हिंदु राष्ट्राच्या'च्या जातीचा नव्हता. धर्म ही व्यक्तीची खाजगी बाब समजून त्याप्रमाणें आचरण ठेवण्यास त्याला पूर्ण स्वातंत्र्य असावें, पण त्याची राष्ट्रकारणांत लुडबुड उपयोगाची नाही. राष्ट्राचा कायदा हा सर्वांना सारखा लागू असला पाहिजे, त्यांत अपवाद कामाचे नाहींत. केमाल पाशाच्या

[२] दैनिक ज्ञानप्रकाश, पुणें, ता. २२ सप्टेंबर, १९२७.

तुर्कस्थानानें या बाबतींत जें धोरण ठेवलें व यशस्वी करून दाखविलें, तेंच आम्हींहि करून दाखविलें पाहिजे; एकराष्ट्रीयत्वाची जोपासना त्यामुळेंच होईल. राष्ट्र कोणत्याहि एका विशिष्ट धर्माचे अभिमानी राहूंच शकत नाहीं, तें नेहमीं धर्मातीतच असणार व असावयासहि पाहिजे. "True national unity can never be achieved until the people of a country discipline themselves to adhere to certain non-religious principles and adopt a strict impartiality towards different communities."[3] त्याची विचारसरणी ही अशी होती.

आपण आपल्याला हिंदु का म्हणवितों व आपली भूमिका काय यासंबंधींचें त्याचें स्पष्टीकरण पुढीलप्रमाणें असे :[४] "हिंदु लोकाना आणि त्याच्या प्राचीन परंपरेला आणि इतिहासाला मी आपलीं मानतो म्हणून मी हिंदु आहें. हिंदुधर्मांतील सारेंच मी मानतों असें नव्हे. हिंदु धर्मांत सुधारणेलाच काय, पण क्रांतीलाहि वाव आहे. धर्माचे आणि पूर्वजाचे दोष न्यायानें दाखविले तरी त्या दोषदिग्दर्शनात आपुलकीची सौम्यता पाहिजे. धर्माचें वैयक्तिक महत्त्व जाणून त्या ठिकाणीं सामुदायिक महत्त्व स्थापित झाले पाहिजे. इतर धर्मांशीं वैर नाहीं पण स्वधर्मावर, स्वधर्मीयावर आपलें प्रेम असलें पाहिजे." माधवराव आपल्याला 'हिंदु मराठा' असे म्हणवीत. 'सुधारक' काव्यांतील नायक वासु राजे याचे

वासु म्हणे "मी हिंदु मराठा !
सोडुन दें मी ज्ञातीला निज,
उपनयनानें कुणीहि हो द्विज,"
वासु होय नव यागीं ऋत्विज
धरुन देशभाषेचा ताठा.

असे त्यानीं केलेले वर्णन हे एकपरीने आत्मवर्णनच आहे. आणि —

[3] The All India Language; Triveni, November 1938.

[४] प्रो. पटवर्धन यांची विचारसरणी (एक मुलाखत), साप्ताहिक विजय, सांगली, २५ नोव्हेंबर, १९३६.

हवा चतुर्भुज मराठा गडी ;
अवश्य नांगर एक्या हातीं
दुज्या करीं तल्वार पहा ती,
श्रुतिपोत हवा काळ्या रातीं,
आणिक चौथ्या करीं तागडी.

ही भावि मराठ्यासंबंधींची अपेक्षाहि त्यांच्याच अंतःकरणांतील आहे.



आजकालचा मराठा प्रत्येक क्षेत्रात मागें पडत आहे हें पाहून त्यांना वैषम्य वाटे. इतर क्षेत्रांची गोष्ट सोडाच, खर्डेघाशीसारख्या क्षेत्रांतहि मराठ्यांनीं मागें पडावें हें पाहून ते उद्विग्न होत आणि विद्यार्थ्यांसमोर बोलण्याचा प्रसंग आला म्हणजे ते म्हणत: "जीवनकलह तीव्र आहे. त्यांत तुम्हीं टिकलें पाहिजे. मागसता कामा नये. खर्डेघाशे व्हावें लागलें तरी चिंता नाहीं, पण उत्कृष्ट आंकडेमोडे कारकून व्हा. मुंबईवर मद्रासी लेखणी-बहादुरांचें जें परचक्र आलें आणि त्यांनीं माटुंग्याला जी वसाहत केली, ती म्हणजे मराठी शिक्षणसंस्थांच्या नि मराठी कारकुनांच्या पराभवाची साक्ष आहे. हा डाग तुम्हीं धुवून टाकला पाहिजे आणि आपल्या अमूल्य गुणांनीं नवे नवे प्रदेश जिंकून टाकिले पाहिजेत. तुम्ही वाटेल तो धंदा करा, स्वकष्टानें भाकर मिळवा, त्या धंद्यांत तुमचा हात कोणी धरणार नाही अशी कीर्ति मिळवा. तुमच्यापुढें शिकंदराची थोरवी कांहींच नाहीं! तुमच्यासारखे अनेक झाले कीं, आपलें राष्ट्र स्वतंत्र, समर्थ, संपन्न व्हावयाला वेळ लागणार नाहीं."

"पण दिशाभूल होऊं देऊं नका. ज्यांच्याशीं आपल्याला झगडावयाचें आहे ते ( इंग्रज ) असुर असतील ; पण त्यांच्याजवळ जी संजीवनी आहे ती हस्तगत केल्यावांचून आपला तरणोपाय नाहीं. आपण देव आहोंत या भावनेनें सर्वनाशच झालेला आहे. तेव्हां सेवा करा, परिप्रश्न करा, प्रसंगीं मरणालाहि तोंड द्या. पण ही संजीवनी मिळवा — नुसत्या देवयानीच्या पाशात पडला तर देवांना पारखे व्हाल नि देवत्वालाहि मुकाल." [५]

[५] पुणें येथील म. ए. सोसायटीच्या हायस्कूलच्या ३२ व्या संमेलनांतील अध्यक्षीय भाषण, ता. २७ नोव्हेंबर, १९३८.

महाराष्ट्र ज्या शौर्य-धैर्याबद्दल, लढाऊ व जिगीषू वृत्तीबद्दल, कणखरपणाबद्दल आजवर ख्यात असे, ते त्याच्यांतील गुणहि लोपूं लागलेले पाहून त्यांचें मन उदासीन बने. एखाद्या विजयादशमीच्या उत्सवप्रसंगीं केव्हांतरी एखादी स्वयंसेवकसेना रस्त्यांतून शिस्तशीर जातांना दिसली म्हणजे त्यांचा ऊर अभिमानानें भरून येई आणि ते उद्गारत :

रांगेनें किति शिस्तशीर पुढुनी जाती स्वयंसेवक,
पोशाखी दिसती न केवळ, पहा झुंजार हे वेचक.
यांचा निर्मम कर्मयोग भगवा येथें उभारी ध्वज,
सांगे मंत्र शिलंगणांत 'शरणं हिन्दुत्वमेकं व्रज.'
दावी हा गणवेष एक समता लोकांत जी ये नव,
येती भाव उचंबळूनि बघुनी ऐसें चमूवैभव.

माधवराव शिस्तीचे व शिपाईगिरीचे मोठे चाहाते होते. इंग्रज, या एवढ्या गुणाकरितांच त्यांना आवडत. ते म्हणत, " इंग्रजांना या देशांतून वाटेल तेव्हां हांकून लावा, पण त्यांची शिस्त व त्याचा शिपाईबाणा आपल्यांत कायम राखा. या गुणांच्या अभावीं देश स्वतंत्र होऊनहि तो देशोधडीला लागेल." शास्त्रज्ञान आणि शस्त्रविद्या याची जोड शिक्षणाला नसेल तर तें व्यर्थ आहे, असें इतिहासाचार्य राजवाड्याप्रमाणेंच त्याचेंहि मत होतें. "वाटे सैणच हा सुशिक्षितपणा त्या क्षात्रतेजाविणें!" असे उद्गार त्यांनीं आपल्या एका सुनीतात काढलेले आहेत.

इंग्रजांप्रमाणेंच जपानी लोकांबद्दल त्याना कौतुक असे. त्यांची उद्योगप्रियता, नव्या नव्या विद्या आत्मसात करण्याची प्रवृत्ति, सुधारणांचे कामीं नेहमींच आघाडीवर राहण्याची धडपड, भोवतालच्या जगाबद्दल जागरूक राहून, स्वराष्ट्र सतत समर्थ व स्वावलंबी राहील याबद्दल बाळगण्यांत येणारी दक्षता, या साऱ्या गुणाचे अनुकरण आपल्या राष्ट्रानें केलें पाहिजे, असें ते म्हणत. पण परकी सत्ता त्या गुणांचें बीजारोपणहि करूं देणार नाहीं, हीहि गोष्ट त्याना पटे. आणि मग त्यांना केव्हां केव्हां वाटे कीं, जपान्यांना हाताशीं धरून आमच्या राजकारण्यांनीं इंग्रजी सत्ता उखडून कां लावूं नये! इंग्रज

परके, जपानी कांहीं झाला तरी आपला शेजारी. तो आपला तारक होईल, मारक होणार नाहीं. पण, पुढें शेजारच्या चीनवर आक्रमण करून त्यानं आपलें जें राक्षसी साम्राज्यवादी स्वरूप प्रगट केलें तें पाहून, त्याना धक्काच बसला. ते आपल्या एका सुनीतांत म्हणतात :

होती आस उषःप्रभा जिकडुनी येईल ती मंगल
चैतन्यें नव राष्ट्र जागृत अतां होईल ऊर्ज्वस्वल,
आतां ये तिकडून काळढग हा त्या टोळधाडीपरी
अन् वाटे प्रलयांधकार पडतो शेजारराष्ट्रावरी.
आम्ही मागसले अशस्त्र दुबळे, चित्तीं उदासीनता
डोळ्यांना पुढती दिसे अवदशा ती सर्वनाशी अतां.



माधवराव शिक्षणक्षेत्रांत जेव्हां शिरले तेव्हां, पूर्वीच्या अनेक पुढाऱ्याप्रमाणें देशाची शिक्षणप्रसारानें सुधारणा होईल आणि तिच्या प्रभावानें आपला देश सुखी व स्वतंत्र होईल असा विश्वास बाळगणारापैकीं एक होते. पण प्रत्यक्ष अनुभवानें तो सारा भ्रम होता, असें त्यांना कळून आलें. ते अखेरपर्यंत जरी त्या क्षेत्रात होते, तरी त्याचें यत्किंचितहि आकर्षण त्याना नव्हतें. उलट त्याच्या मनात तीव्र असंतोषच साचलेला होता. तो शाळांच्या सभा-संमेलनात ते अनेकदां व्यक्त करीत. अशाच एका संमेलनात ते एकदा म्हणाले : " गेली २५ वर्षे निरनिराळया ठिकाणीं नि निरनिराळ्या संस्थातून मी शिक्षणाचें कार्य करीत आहें ; आणि पुढेंहि कांहीं वर्षेपर्यंत हें कार्य करीत राहिल्यावाचून मला गत्यंतर नाहीं. मी एका पवित्र कार्याला स्वतःला वाहून घेतलेलें आहे म्हणून एका काळीं मला अभिमान वाटत असे. हा अभिमान आता पार लयाला गेला आहे. मी मजुराइतकाच पोटार्थी आहें याची मला जाणीव होऊं लागली आहे. इतकेंच नव्हे तर आपण एका देशव्यापी कपटनाटकांत भाग घेऊन आपली नि देशाची निवळ फसवणूक करीत आहों असे वाटून खेद वाटूं लागला आहे. ही फसवणूक थांबवावयाची असेल तर शिक्षणसंस्थाचें पुनरुज्जीवन केलें पाहिजे. किरकोळ वरकरणी रंगरंगोटी करून भागणार नाहीं. पालक,

शिक्षणसंस्था नि विद्यार्थी सारेच एका नव्या दुर्दम्य प्रेरणेने सचेतन झाले पाहिजेत. जेणेंकरून व्यक्ति स्वावलंबी नि कार्यक्षम, या जीवनकलहात स्वतःचें संरक्षण करण्यास समर्थ, आणि स्वार्थासमवेत परमार्थाची म्हणजे पारलौकिक स्वार्थाची नव्हे तर समष्टीच्या, अन्य लोकाच्या अर्थाची चिंता वाहाणारी होईल तें तें आपल्याला हवे आहे, याविषयीं दुमत होणार नाही. मग तें प्रचलित शिक्षणास धरून आहे कीं नाहीं, असल्यास कितपत धरून आहे हा विचार करावयाचा. आपल्याला कोठें जावयाचें आहे नि काय व्हावयाचें आहे हें कधींहि न विसरतां आपली प्रगति होत आहे कीं नाहीं आणि ती होत असल्यास योग्य दिशेनें होत आहे की नाहीं याचा विचार सारखा व्हावयाला हवा."



मराठी भाषा व वाङ्मय यांची उन्नति होऊन त्याचे वैभव वाढावयास, तिभंगलेला महाराष्ट्र–नागपूर, विदर्भ, मराठवाडा आणि कारवार-गोमंतक हे प्रदेश–एकत्र येऊन एकसंध होऊन एकछत्राखालीं येणे अत्यावश्यक आहे, असें त्यास वाटे. अखंड महाराष्ट्राचे ते तळमळीचे पुरस्कर्ते होते. साऱ्या मराठ्यानीं फुटीर वृत्ति सोडून एकजीव बनलें पाहिजे आणि आपल्या हिताचें डोळ्यांत तेल घालून रक्षण केलें पाहिजे, कोणाहि परक्या भाषेचें वा संस्कृतीचें अतिक्रमण होत असेल तर तें एकजुटीनें परतवून लावण्यास सदा सज्ज असलें पाहिजे, असें त्याचें आग्रहाचें म्हणणें असे. लोकाच्या हातीं सत्ता जाऊन तिचा स्वकल्याणार्थ नीट उपयोग व्हावयास हवा असेल, त्यांचा कारभार त्याना समर्थपणें करतां यावा अशी प्रामाणिक इच्छा असेल, तर भाषावार प्रातरचना होऊन त्यातील लोकास स्वभाषेंत सर्व व्यवहार करण्याचें पूर्ण स्वातंत्र्य राहिलें पाहिजे, असे त्याचें स्पष्ट मत होतें. भाषावार प्रातरचना करताना त्या त्या प्रांताच्या सरहद्दी ठरविण्याचा अति कठीण असा प्रश्न उभा राहील, तेव्हां तो अत्यंत निःपक्षपाती वृत्तीनें न्यायाची व परस्पर सहकार्याची दृष्टि ठेवून, कोणाचेंहि अनहित होऊं न देता सोडविण्याचा आमचा आम्हींच प्रयत्न केला पाहिजे, तिसऱ्या माणसाला त्यात हात शिरकवूं देता कामा नये, असे त्याचे त्यासंबंधींचे विचार होते. मद्रास येथील 'त्रिवेणी' या मासिकात

( डिसेंबर १९३७ ) त्यांनीं 'Linguistic Frontiers' या नांवाचा जो लेख लिहिला आहे, त्यांत त्यांनीं या प्रश्नाचें विस्तृत विवेचन केलें आहे.

प्रांतिक भाषांना दुय्यम दर्जा देऊन, त्याची आबाळ करून एकभाषेच्या भ्रामक कल्पनेमागें आजचे राष्ट्रशासक लागतील तर, देशात अनवस्था प्रसंग निर्माण होऊन सांस्कृतिक अभ्युदय न साधतां सर्वनाश मात्र होईल, अशी धोक्याची सूचना ते वारंवार देत. प्रांतिक भाषांना विकास पावावयास पूर्ण वाव देऊन, आंतरप्रांतीय व्यवहाराच्या सोयीसाठीं सोपी, सुटसुटीत, सर्वांना सहज आकलन होणारी आणि अल्पकाळांत अवगत होऊं शकणारी अशी भाषा अवश्य तयार करण्यांत यावी, पण तिचें अधिराज्य मात्र उपयोगाचें नाहीं, असें त्यांचें स्पष्ट मत होतें आणि याकरितां हिंदुस्थानीला इंग्रजी भाषेचें स्थान देऊन तिचें जें प्रस्थ माजविलें जात होतें, त्याला त्याचा कसून विरोध होता. आणि ती दुय्यम शाळातून आवश्यक भाषा म्हणून विद्यार्थ्यांच्या माथीं मारणें हा एक प्रकारें अन्याय घडत आहे असें त्याना वाटे. राष्ट्रभाषा शिकण्यासाठीं काळाचा आणि शक्तीचा एवढा व्यय नको. राष्ट्रभाषेचे ज्ञान जर व्यवहारापुरतेंच संपादावयाचें आहे तर तें संपादावयाला एक वर्षाचा काळ पुष्कळ झाला. दुय्यम शाळांत शेवटच्या वर्गांत ती शिकविली म्हणजे झालें. जसें बेसिक इंग्लिश अल्पकालांत शिकतां येतें, तशीच ही राष्ट्रभाषा शिकता आणि शिकविता येणें शक्य आहे, असें त्यांचें मत होतें. त्यानीं 'त्रिवेणी' मासिकात, या प्रश्नावर 'The All India Language' या मथळ्याखालील एक विस्तृत निबंध लिहिला आहे. त्यात राष्ट्रभाषेच्या प्रश्नाच्या केलेल्या चर्चेइतकी खोल व दूर दृष्टीनें केलेली चर्चा आजहि क्वचितच वाचावयास मिळते.

भाषेप्रमाणेंच लिपी व लेखन याच्या सुधारणेकडे त्याचें बरेंच लक्ष होतें. त्यानीं त्यासंबंधीं वेळोवेळीं अनेक लेख लिहून मतपरिवर्तन घडवून आणण्याचा प्रयत्न केला. लिपींत सुधारणा घडवून आणणें हे एकट्या व्यक्तीला शक्य नव्हतें, पण लेखनपद्धतींत सुधारणा घडवून आणणें शक्य होतें. ती सुधारणा त्यांनीं आपल्या लेखनांत कटाक्षानें अमलांत आणली.

## माधव जूलियन

माधवराव स्वतःला सुधारक व सत्याचा सेवक म्हणवीत. ही त्यांची सुधारणा व सेवा संकुचित क्षेत्रापुरती नव्हती. जेथें जेथें त्यांची नजर पोंचली व जेथें जेथें त्यांना सुधारणेची आणि सेवेची आवश्यकता भासली तेथें तेथें त्यांनीं प्रामाणिकपणें, कष्टांना न कंटाळतां, अंतरींच्या तळमळीनें आणि निष्ठेनें ती केली.

# २०

# अखेरचें झुंज

डी. लिट्.च्या पदवीसाठीं माधवरावांना जें झुंज द्यावें लागलें, तें त्याच्या आयुष्यांतील अखेरचेंच ठरेल, असें त्यांच्या अनेक स्नेह्याना वाटे. त्याच्या इच्छेप्रमाणें त्याचें आयुष्य सुखाचें, शांतीचें, समृद्धीचें जाईल अशीच सर्वांची कल्पना. पण तो एक भ्रमच ठरावयाचा होता. नियति त्याना एका नव्या झुंजांत लोटूं पाहात होती.

१९३९ साल. माधवराव अनेक वर्षांनंतर मुंबई विद्यापीठांत परीक्षक नेमले गेले होते. केवळ पराक्रमाच्या जोरावरच त्यांना त्या वर्षी एम्. ए.च्या मराठी विषयाच्या परीक्षकाची जागा मिळाली होती. वर्षानुवर्षें उच्च पदव्यांच्या परीक्षकगिरीसाठीं त्यांजकडून आलेले अर्ज झिडकारून टाकणाऱ्या विद्यापीठाला या सालीं तसें करणें शक्य नव्हतें; डी. लिट्.सारखी अत्युच्च पदवी धारण करणाऱ्या व्यक्तीचा अर्ज नामंजूर करणें नामुष्कीचें ठरलें असतें.

जूनमध्यें उत्तरपत्रिका तपासून ते मुंबईस परीक्षकाच्या सभेसाठीं १८ तारखेस आले. नेहमींप्रमाणें विठ्ठलराव घाट्याकडे त्यानीं मुक्काम केला. माधवरावाना आतां आपण नव्या उमेदींत पाहूं, त्याचे नवे नवे संकल्प ऐकूं, त्याच्या सुखसंवादाची आणि विनोदी उक्तींची कांहीं नवी लज्जत चाखूं अशी कल्पना घाटेमंडळी करीत होती, पण —[1] "माधवरावानी नेहमीप्रमाणें जरी या खेपेस घरांत हसतमुखानें प्रवेश केला, तरी ते किंचित् थकले भागलेले दिसले." सौ. वत्सलाबाई घाटे आपल्या 'आठवणीं'त लिहितात: "त्यावेळीं माझ्याकडे कांहीं स्त्रिया आलेल्या होत्या. त्यांची मी माधवरावांशीं ओळख

[1] कांहीं आठवणी, सौ. वत्सलाबाई घाटे, सह्याद्री, जानेवारी १९४०.

करून दिली. त्यांच्याशीं थोडेंसें औपचारिक बोलून माधवराव आंत गेले. काहीं वेळानें माझ्याकडे आलेल्या स्त्रिया गेल्यावर मी आंत जाऊन पाहतें तों माधवराव स्नान आटोपून कॉटवर पडलेले दिसले. मला जरा चमत्कारिकच वाटलें ; कारण माधवरावांना दिवसा अंथरुणावर पडलेले मीं कधींच पाहिलें नव्हतें. मला ते किंचित् जास्तच थकलेले व फिकट दिसले. त्यांना कावीळ झाली असावी, असा तात्काळ मला संशय आला व तो मीं त्यांना बोलूनहि दाखविला. चागल्याशा डॉक्टरांना प्रकृति दाखविण्याविषयीं आम्हीं त्यांना सुचविलें. आणि त्यानी कबूलहि केलें. परंतु त्यांची प्रकृति विशेष काळजी करण्यासारखी असेल, असें त्यावेळीं त्यांनाहि वाटलें नाहीं व आम्हांलाहि वाटलें नाही."

"त्या दिवशीं माधवरावांनीं आपलीं सारीं कामें व्यवस्थित केलीं. रात्रीं जेवण झाल्यावर ते आपल्या एका बालमित्राला[२] भेटण्यास निघाले. त्या वेळीं बाहेर धो धो पाऊस पडत होता आणि गार वारा सुटला होता. तशा पावसांत त्यानी बाहेर जावें हे आम्हाला बरे वाटेना. मी त्यांना म्हटलें सुद्धां, 'अंमळ थांबा. पाऊस कमी झाल्यावर मग जा.' 'माझा रेनकोट आहे ना, मग कसली काळजी ! शिवाय रामभाऊ वाट पाहात असेल. मला गेलेंच पाहिजे' असें हसत म्हणून ते निघून गेले."

माधवरावानी आपल्यातील थकव्याबद्दल घाटेमंडळीकडे थोडीशी बेपर्वाईच दाखविली. पण ती फार वेळ टिकूं शकली नाहीं. ते कोल्हापुरास गेले तेव्हां त्याचें त्यांनाच, 'आपल्या शरीरात काहीं तरी बिघाड होत आहे ; त्याबद्दल बेपर्वा राहणे ठीक होणार नाहीं,' असें वाटूं लागलें. त्यानीं आपली प्रकृती डॉक्टरांना दाखविली. घाटेमंडळीने व्यक्त केलेली शंका खरी ठरली. 'कावीळ झाली आहे' असें डॉक्टरांचें मत पडलें. औषधोपचार सुरू झाले. पथ्य कडकपणे पाळण्यात येऊं लागलें. नेहमीचा आहार सुटला. मोसंब्याचा रस आणि ताक यावरच ते राहू लागले. पावसाळ्याचे दिवस असल्यामुळें यकृत् मंद झालेलें. क्षीणता वाढूं लागली. बी. ए. च्या विद्यार्थ्यांचें नुकसान होऊं

[२] रामचंद्र विनायक मराठे.

नये म्हणून ते त्याचेकरितांच केवळ कॉलेजांत जात. तीन महिने असें चाललें होतें. पण पुढें क्षीणतेबरोबरच आगांत तापानें ठाण माडलें. तशा स्थितींतहि त्याचें लेखन-वाचन, 'छंदोरचने'चें इंग्रजीत भाषातर, चाललें होतें; आपल्या विद्यार्थ्यांना आरामखुर्चीवर पडल्या पडल्या ते शिकवीत होते.

कॉलेजातील पहिली सहामाही संपत आली तेव्हां एक दिवस वि. स. खाडेकर यांनीं त्यांना आग्रहानें मिरजेस डॉ. भडकमकर याजकडे नेलें. त्यानीं बारकाईनें तपासणी केली. लिव्हर कॅन्सरचा त्याना संशय आला, पण त्यानीं त्या वेळेस तो माधवरावाकडे बोलून दाखविला नाहीं; खाडेकराकडे मात्र त्याबद्दल ते थोडेंसें बोलले. त्यानंतर माधवराव पुन्हां एकदां मिरजेला जाऊन आले. डॉक्टरानीं त्याना काहीं औषधें सुचवून पुण्यास तावडतोब जाऊन पूर्ण विश्राति घेण्याचा सल्ला दिला, "त्याच्या पावलावर सूज दिसूं लागली. माधवरावाचें तेज तर कधींच लुप्त झालें होतें. त्यांचा आतां हाडाचा नुसता सापळा राहिला होता. घरीं (पुण्यास) आल्यावर दसऱ्याच्या सुमारास माधवरावाचें दुखणें जास्त झालें. पावलांवरची सूज पावलावरच न राहतां छातीपर्यंत वाढली." त्याना पलंगावरून उठून बाहेर जाणें अशक्य झालें. ते बेचैन होऊं लागले. रोग बळावत होता. माधवरावाचें त्याचेशीं झुंज चालू होतें. आजवरच्या झुंजांप्रमाणेंच आपल्या दुर्दम इच्छाशक्तीच्या जोरावर याहि झुंजातून आपण यशस्वी रीतीनें बाहेर पडूं असें त्यांना वाटत होतें; पण दैव निराळाच डाव खेळत होतें.

माधवरावाच्या दुखण्याची वार्ता ऐकून त्याचे ठिकठिकाणचे स्नेही व आप्त त्याच्या कुशलसमाचारास येऊं लागले. माधवरावाना पाहून त्याना धक्का बसे. त्याच्या रूपाचें बेरूप झालें होतें. त्याचे सारें शरीर पिवळें धमक व शुष्क झाले होते, त्याचा चेहरा न ओळखता येण्याइतका बदलला होता. परंतु तशा स्थितीतहि माधवराव ओंठावर स्मित आणून आपल्या भेटीला येणाऱ्यांचें मूक स्वागत करीत. त्यामुळें भेटीला आलेल्या व्यक्तींनाहि, त्याचें अंतःकरण चरकलें तरी, बळेंच स्मित करून त्याच्याशीं थट्टा-विनोद करावा लागे; आजाराबद्दल न बोलता निराळाच कांहींतरी विषय काढावा लागे.

पण हें असें किती दिवस चालणार! माधवरावांचा या जगातील रहिवास आतां आटोपत आला हें त्यांच्या निकटवर्ति स्नेह्यांनी केव्हांच ओळखलें होतें. आज ना उद्यां त्यांचें येथून प्रयाण घडणार हें ते जाणून होते. आशावादी माधवराव आपल्या इच्छाबळाच्या जोरावर जरी आजवरच्या झुंजांत विजयी झाले असले तरी या झुंजातून ते सुखरूप बाहेर येतील असें कोणालाच वाटेना. आणि अखेर तसेंच घडलें.

दिनाक २९ नोव्हेंबर, १९३९ च्या रात्रीं ११॥ वाजतां त्यांचें झुंज संपून त्यानीं आपला देह धरणीवर ठेवला. अगदीं शांत मनानें व उत्सुक अतःकरणानें त्यांनीं, 'मृत्यो, सुंदरता तुझी तरि बघूं दे, हो सखा शेवटीं' असें म्हणत, मृत्यूच्या हातांत हात घालून परलोकीं प्रयाण केलें.

# २१

## प्रयाण

" पुत्रांश्च कीर्तिं च वधूं च मित्रान् त्यक्त्वा प्रविष्टोसि चितां सुविद्य ।
शोचाम्यहं त्वत्सुगुणप्रकर्षान् प्रसादपांडित्यसुशीलयुक्तान् ॥ "

माधवरावांना अखेरची श्रद्धांजलि अर्पण करावयास आलेल्या प्रत्येक व्यक्तीच्या मनांत त्या दिवशीं वरील श्लोकांतील विचार आल्याशिवाय राहिले नाहींत. अवघें पंचेचाळीस वर्षांचें आयुष्य, पण तेवढ्या अल्प काळांत त्यांनीं किती विविध प्रकारचें कार्य केलें ! आणि तेंहि चिरंतन स्वरूपाचें ! त्यांच्या एका वृद्ध विद्वान् स्नेह्यानें "आपल्या अमदानींत माधवरावांनीं एक जाडा विद्वान्, अभ्यासू कोशकार, भावनाप्रधान कवि, सच्चा मित्र, व थोर सद्‌गृहस्थ इत्यादि अनेक नात्यांनीं चमकून आपलें नांव चिरंजीव केलें" असे त्यांजविषयींचे काढलेले उद्गार किती यथार्थ आहेत !

त्या दिवशीं त्यांना अखेरचा प्रणाम करण्याकरितां सारें साक्षर पुणें त्यांच्या चितेकडे लोटलें होतें. सद्गदित अंतःकरणानें आणि साश्रु नयनांनीं, उंच उंच भडकणाऱ्या ज्वाळांकडे पाहात प्रत्येकजण उद्गारत होता, "केवढा झुंजार गडी ! केवढा मर्द ! शत्रूंची त्यानें कधीं कदर केली नाहीं; प्रतिकूल परिस्थितीची पर्वा बाळगली नाहीं. तत्त्वासाठीं, ध्येयासाठीं अखेरपर्यंत झुंजला आणि विजयी झाला. वीरमरण आलें त्याला ! मित्रा, तूं कृतविद्य झालास, कृतार्थ झालास ! "

कांहीं वर्षांपूर्वी, ते रस्त्यांत दिसल्याबरोबर ज्या पुण्यांत 'हेटाळणीचें हसें' कानावर पडे, त्याच पुण्यांतील रस्त्यांत त्या दिवशीं माधवगुणकीर्तन-

ध्वनि कानांवर पडत होता. आणि कुणी तरुण कवि * शोकाकुल होऊन आपल्या हृद्वीणेवर आर्ततेचे सूर छेडीत होता:

“ हिम उडे जरेचें शिरीं स्मित मुखीं तरुण
तव मूर्ति उभी ती पुढें दिसतसे अजुन !
तोलिलास वीरा, ध्वज रुधिरांहि ओकून
तव रक्त पसरलें अरुणोदय होऊन !
हा त्रुटित ताल तव आपण काळ धरील
नव नवयुग-गीतें शारदाहि गाईल.
—परि आज तुझ्याविण दीन मराठी वाणी
मधुचषक भंगला खिन्न उभी मधुराणी. ”

काव कान्त.